


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन









अनुक्रमणिका

2

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



दलित साहित्य विशेषांक

ऑक्टोबर–डिसेंबर १९८७

अंक - २४३

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २४३ □ दिवाळी १९८७ ❁ ऑक्टोबर-डिसेंबर १९८७

दलित साहित्य विशेषांक □ मूल्य दहा रुपये

## अनुक्रम





संपादक : वसंत स. जोशी □ संपादन समिती : ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवंत
सल्लागार : राजेन्द्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी □ मुखपृष्ठ : अनिल अवचट
प्रकाशक व मुद्रक : म. वि. गोखले, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय / स्मिता प्रिंटर्स, पुणे

■

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत

# संपादकीय

## ६१ वे मराठी साहित्य संमेलन

६१ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन ठाणे येथे जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात घेण्याचे आता निश्चित झाले आहे. या संमेलनाच्या अध्यक्षपदी सुप्रसिद्ध साहित्यिक प्रा. वसंत कानेटकर यांची बहुमताने निवड झालेली आहे. म. सा. परिषदेच्या चौथ्या विभागीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी केलेले भाषण अनेकांच्या स्मरणात असेल. पाचव्या विभागीय साहित्य संमेलनाचा यशोदायी अनुभव ठाणेकरांना असल्यामुळे तेथे भरणारे हे संमेलनही यशस्वी होईल, यात शंका नाही. म. सा. परिषदेच्या ठाणे शाखेने ही जबाबदारी स्वीकारली आहे. ठाण्याचे महापौर श्री. वसंतराव डावखरे, ठाणे शाखेचे अध्यक्ष श्री. चिंतामणी जोशी आणि त्यांचे सहकारी यांना आमच्या शुभेच्छा ! अध्यक्षीय निवडणुकीच्या पार्श्वभूमीवर त्यांनी स्वीकारलेली ही जबाबदारी निश्चितच अभिनंदनीय आहे. ठाणे येथील पाचव्या विभागीय साहित्य संमेलनाच्या उभारणीत ज्यांचा सिंहाचा वाटा होता, ते प्राचार्य म. वि. फाटक नुकतेच दिवंगत झाले. अंमळनेर येथे भरलेले साहित्य संमेलनही त्यांच्याच प्रयत्नांनी गाजले व यशस्वी झाले होते. मराठीचे एक उत्तम प्राध्यापक आणि प्राचार्य म्हणून म. वि. फाटक यांची ख्याती होती. काही काळ पुणे विद्यापीठाच्या कलाशाखेचे ते अधिष्ठाता होते. त्यांनी अनेक संपादित व स्वतंत्र ग्रंथांचे लेखन केले. म. सा. परिषद (पुणे) चे उपाध्यक्ष म्हणूनही त्यांची निवड झाली होती. आगामी ठाणे साहित्य संमेलनात त्यांची अनुपस्थिती निश्चितच जाणवेल. आम्ही प्राचार्य फाटक यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन करतो.

## ‘ साहित्यभीमा ’चे देहावसान

दि. २७ सप्टेंबर म. सा. परिषदेची वार्षिक सभा सुरू होती. एवढ्यात डॉ. भीमराव कुलकर्णी यांचे निधन झाल्याची धक्कादायक आणि मन सुन्न करणारी वार्ता आली. ज्यांचे अभिनंदन करावयाचे त्यांना श्रद्धांजली वाहावी लागली. पुत्रशोकाच्या आघाताने खचलेल्या डॉ. भीमरावांचा अंत कर्करोगासारख्या असाध्य रोगाने व्हावा, ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी राजीनामा दिल्यामुळे आठच दिवसांपूर्वी ( दि. २० सप्टेंबर) डॉ. भीमराव कुलकर्णी यांची अ. भा. मराठी साहित्य महामंडळाच्या अध्यक्षपदी एकमताने निवड करण्यात आली होती. ती सभा उत्तमप्रकारे चालवून आगामी साहित्य संमेलन एकदिलाने यशस्वी करण्याचे आवाहन त्यांनी केले होते. आपल्या लोकसंग्राहक आणि संघटनकुशल स्वभावामुळे या संमेलनात हिरीरीने भाग घेऊन त्यांनी ते निश्चित यशस्वी केले असते; परंतु यशाच्या भरल्या ताटावरून त्यांना कायमचे उठून जावे लागले आहे...

म. सा. परिषदेचे कार्यवाह, कार्याध्यक्ष, ‘ म. सा. पत्रिके ’चे संपादक अशा अनेक नात्यांनी परिषदेच्या कार्याशी ते निगडीत होते. साहित्य महामंडळाचे कार्यवाह म्हणूनही त्यांनी काम केले होते. परिषदेच्या हीरक महोत्सवाची स्मरणिका, अध्यक्षीय भाषणांचे तीन खंड, मराठी फार्स या ग्रंथांचे संपादन त्यांनी केले. कथा-कादंबरीपासून भाषाशास्त्र-व्याकरणापर्यंत सर्वप्रकारचे ग्रंथ लेखन त्यांच्या नावावर आहे. ऐतिहासिक बखरींचे साक्षेपी संपादन हा त्यांचा विशेष म्हणावा लागेल. ‘ सप्तप्रकरणात्मक चरित्र ’ या बखरीचे संपादन विशेष उल्लेखनीय आहे. पुण्यातील महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यपक, विभाग-प्रमुख, उपचार्य ही कामे करीत अखेरीस मुंबईच्या श्री. ना. दा. ठा. महिला विद्यापीठात मराठी विभाग प्रमुख म्हणून ते काम करीत ते. त्यांची साहित्यिक जाण, रसिकता साहित्य विश्वात रमण्याची आणि त्यासाठी पडतील ते कष्ट घेण्याची वृत्ती यामुळे त्यांनी ःचे असे एक स्थान निर्माण केले होते. मुंबईत गेल्यानंतर मुंबई मराठी साहित्य संघाचे ते कार्यवाह झाले. ‘ साहित्य ’ यतकालिकाला नवे रूप देण्याचा प्रयत्न त्यांनी केला. मुंबई मराठी साहित्य संमेलनाच्या यशस्वितेसाठी अथक परिश्रम त्यांनी ऽ. साहित्य विश्वातील अनेक घडामोडींचा तपशील त्यांच्याजवळ असे. साहित्यिक वादविवादात, चर्चासत्रात, परिसंवादात ास घेत. अनेक ग्रंथांचे संपादन-लेखन, वृत्तपत्रीय सदरे, अध्यापन आणि साहित्य संस्थांचे उपक्रम यांत ते सदैव गुरफटलेले

असत. डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्यासारखा खंदा साहित्यिक कार्यकर्ता हरपल्यामुळे मराठी साहित्य-संस्थांची अपरिमित हानी झालेली आहे. आमचे मित्र आणि सहकारी डॉ. भीमराव कुलकर्णी यांना आमची अश्रुपूर्ण श्रद्धांजली !

## महादेवी वर्मा यांचे निधन

हिन्दीतील ख्यातनाम कवयित्री आणि लेखिका श्रीमती महादेवी वर्मा यांचे दि. ११ सप्टेंबर रोजी वयाच्या ८१ व्या वर्षी देहावसान झाले. जळगाव येथे १९८४ मध्ये भरलेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या उद्घाटक म्हणून त्यांनी केलेले भाषण संस्मरणीय टरले होते. मराठी भाषा आणि संस्कृतीशी असणारे आपले नाते त्यांनी अत्यंत आत्मीयतेने आणि प्रभावीपणे सांगितले होते. आपल्या प्रौढ, सुसंस्कृत आणि शालीन व्यक्तिमत्त्वाने जळगाव संमेलनाला त्यांनी एक आगळी उंची प्राप्त करून दिली होती. मूळच्याच अत्यंत प्रगल्भ आणि स्वतंत्र विचारांच्या श्रीमती महादेवींनी लौकिक प्रापंचिक बंधनांचा वेळीच त्याग करून आपले सर्व जीवन साहित्य आणि शिक्षण क्षेत्राला वाहिले. त्यांच्या बहुमोल कार्याबद्दल श्रीमती महादेवींजींना संक्सरिया, भारत–भारती, मंगला प्रसाद यासारखे पुरस्कार लाभले होते आणि त्यांच्या ' यामा ' या काव्यसंग्रहाला १९८२ मध्ये ' ज्ञानपीठ पुरस्कार ' देण्यात आला होता. भारत सरकारने ' पद्मभूषण ' हा किताब देऊन त्यांचा सन्मान केला होता. प्रयाग विद्यापीठाच्या कुलगुरू, उत्तर प्रदेश विधानसभा सदस्य आणि एका नियतकालिकाच्या संपादिका म्हणूनही त्यांनी काम केले. हिन्दीतील ' छायावादी ' कवींमध्ये त्यांचे स्थान महत्त्वाचे मानले जाते. ' परिक्रमा ', ' यामा ' ' गीतपर्व ' ' नीहार ', ' रश्मी ', ' सांध्यगीत ', ' दीपशिखा ' इ. त्यांचे काव्यसंग्रह आणि ' स्मृति की रेखाएँ, ' ' पथ के साथी ' यासारख्या त्यांच्या गद्यरचनाही गाजल्या आहेत. श्रीमती महादेवींच्या निधनाने हिन्दी साहित्यातील एका उज्ज्वल पर्वाचा अंत झाला आहे. त्यांच्या स्मृतींस आमची विनम्र श्रद्धांजली.

## ' सच्ची ' राऊतराय यांना ज्ञानपीठ पुरस्कार

भारतीय साहित्य क्षेत्रात सर्वोच्च मानला जाणारा ' ज्ञानपीठ पुरस्कार ' १९८६ या वर्षाकरिता सुप्रसिद्ध उडिया कवी आणि लेखक डॉ. सच्चिदानंद राऊतराय यांना जाहीर झाला आहे. या वर्षाच्या पुरस्काराचे वैशिष्टय असे, की तो कोणत्याही एका साहित्यकृतीसाठी देण्यात आलेला नसून श्री. राऊतराय यांच्या साहित्यक्षेत्रातील भरीव कार्यासाठी देण्यात आला आहे. हा बदल स्वागतार्ह म्हणावा लागेल. एरव्ही एखाद्या साहित्यिकांची विशिष्ट वर्षातील साहित्यकृती ही त्याच्या सर्व साहित्याची प्रातिनिधिक ठरू शकेल, असे नाही. गेली पन्नास ते साठ वर्षे श्री. राऊतराय विविध प्रकारचे लेखन करीत आहेत. ' रक्तशिखा ' हा काव्यसंग्रह, ' चित्रगरीवा 'ही कादंबरी आणि ' पल्लीश्री ' हा कथासंग्रह या त्यांच्या विशेष गाजलेल्या रचना. वैचारिक आणि समीक्षात्मक लेखनही त्यांनी विपुल केले. महात्मा गांधींच्या विचारप्रभावाखाली त्यांनी स्वातंत्र्यआंदोलनात भाग घेतला; परंतु सामाजिक विषमता आणि दैन्य यांचे जवळून दर्शन घडल्यामुळे नंतरच्या काळात ते मार्क्सवादाकडे वळले. १९१६ मध्ये जन्मलेल्या आणि १९२८ पासून लेखन करीत असलेल्या श्री. ' सच्ची ' राऊतराय यांनी उडिया साहित्यातील अनेक स्थित्यंतरांत आपले वैशिष्टय कायम राखले. मुक्तशैलीतील त्यांच्या कवितेने उडिया काव्यविश्वाचे स्वरूप बदलून टाकले. फ्राइड आणि युंग यांच्या मनोविश्लेषणात्मक पद्धतीचा वापर श्री. राऊतराय यांनी आपल्या ' चित्रगरीवा '-सारख्या कादंबऱ्यांतून प्रथमतः केला. ' साहित्य विचार ', ' साहित्यारी मूल्यबोध ' इ. त्यांचे समीक्षाग्रंथ प्रसिद्ध आहेत. उडिया आणि इंग्रजी या भाषात आजवर त्यांचे पस्तीस ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. ' पद्मश्री ' हा किताब आणि ' सोविएत लँड ' व ' साहित्य अकादमी 'चे पुरस्कार त्यांना यापूर्वीच लाभले होते. ' ज्ञानपीठ पुरस्कार 'च्या वार्तेने हा थोर साहित्यिक क्षणभरही विचलित झाला नाही. त्यांनी सांगितले, ' माझ्या हातून सर्वोत्तम रचना अद्यापि व्हावयाची आहे...सृजनशीलतेला कोणताही पुरस्कार ही प्रेरणा ठरू शकत नाही. ' डॉ. सच्चिदानंद (सच्ची) राऊतराय यांच्या या समुचित बहुमानाबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करतो.

सुप्रसिद्ध मराठी साहित्यिक श्री. श्री. ना. पेंडसे यांना त्यांच्या ' तुंबाडचे खोत ' या कादंबरीसाठी अकरा हजार रुपयांचा ' प्रियदर्शिनी अकादमी 'चा पुरस्कार देण्यात आला. आम्ही श्री. पेंडसे यांचे अभिनंदन करतो.

## दलित कथा स्पर्धा

महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा 'दलित साहित्य विशेषांक' तयार करण्याचे ठरल्यानंतर नव्या पिढीतील प्रतिभावंतांचा शोध घेण्याच्या दृष्टीने एक 'दलित कथा स्पर्धा' घेण्याचे निश्चित झाले. दलितांच्या जीवनावरील कथा लिहिण्यासाठी दलित आणि दलितेतर अशा सर्वांनाच मुभा ठेवली होती. लेखकांकडून तशा विचारणाहि झाल्या होत्या. आलेल्या कथांतील बक्षिसपात्र व अन्य दोन कथांचा निकाल व परीक्षकांचा अभिप्राय अन्यत्र देण्यात आला आहे. सर्व विजेत्यांचे आम्ही अभिनंदन करतो. कथेची बांधणी आणि अभिव्यक्तीची पद्धत यांत स्पर्धेतील कथांत. कदाचित सफाईदारपणा आढळणार नाही, परंतु अनुभवांचा सच्चेपणा त्यात दिसून येऊ शकेल. दलित साहित्यिकांच्या पहिल्या पिढीपेक्षा ही दुसरी पिढी वेगळ्या दिशेने विचार आणि वाटचाल करीत असल्याचे जाणवते. दलित स्त्रियांवरील अत्याचार, सुशिक्षित दलितांच्या नोकरी आणि व्यवसाया-विषयांच्या समस्या, सुशिक्षित आणि प्रतिष्ठित दलितांकडून होणारी स्वकुटुंबियांची उपेक्षा, दलितोद्धाराच्या चळवळीतील मूळ गाभ्याचे होणारे विस्मरण असे अनेकविध नवनवे विषय या कथाकारांनी हाताळले आहेत. त्यांतील चिंतनशीलता आणि आविष्कारातील संयम जाणवण्यासारखा आहे.

भारतीय स्तरावरील दलित साहित्याचा मागोवा घेण्याचा एक छोटा पण विनम्र प्रयत्न आम्ही केला आहे. वास्तविक हा एका स्वतंत्र ग्रंथाचा / प्रबंधाचा विषय होण्यासारखा आहे. विहित कालावधीत उपलब्ध झालेले साहित्य या अंकात दिले आहे. वाचकांना आमचा हा उपक्रम आवडेल, अशी अपेक्षा आहे. भारतीय दलित साहित्याचा तुलनात्मक विचार आणि त्यासाठी काही सामग्री या निमित्ताने आम्ही सादर करू शकलो, याचे समाधान आम्हाला आहे. या अंकासाठी काही आमंत्रित तशाच अनाहूत कवींनी व लेखकांनी आपले साहित्य पाठविले. एक तर ते उशीरा आले आणि पृष्ठसंख्येचीही मर्यादा असल्यामुळे सर्वांचाच समावेश करणे शक्य झाले नाही, याबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

## आभार

'म. सा. पत्रिके'चा हा 'दलित साहित्य विशेषांक'सिद्ध करताना अनेकांचे सहकार्य लाभले.

श्री. राजेंद्र बनहट्टी, प्रा. गो. म. कुलकर्णी, श्री. राजा फडणीस, सौ. ज्योत्स्ना देवधर, प्रा. म. ना. अदवंत, डॉ. म. वि. गोखले (पुणे)

प्रा. केशव मेश्राम (मुंबई), डॉ. शांतिनाथ देसाई (कोल्हापूर), श्री. गुलाबदास ब्रोकर (मुंबई), सौ. वीणा आलासे (कलकत्ता), सौ. धनश्री हळवे (कोचीन), डॉ. पंडित आवळीकर (धारवाड), प्रा. दत्ता भगत (नांदेड), प्रा. म. द. हातकणंगलेकर (सांगली), डॉ. मु. ब. शहा (धुळे), डॉ. गंगाधर पानतावणे (औरंगाबाद), डॉ. अ. रा. तोरो (कोल्हापूर), सौ. श्यामलता काकडे (सातारा), प्रा. रा. ग. जाधव (वाई) प्रा. मधु जामकर (परळी वैजनाथ),

प्रा. विजयकुमार फरांदे, डॉ. पंडितराव टापरे, डॉ. सौ. नीलम हातेकर, प्रा. यशवंत कळमकर, डॉ. व्यंकटेश कोटबागे (वाई), श्री. जि. व्यं. देशपांडे (पुणे)

या सर्वांनी चर्चा, लेखन, परीक्षण व अन्यप्रकारे वेळोवेळी सहकार्य केले. कवी व कथाकार यांचेही सहकार्य लाभले.

या सर्वांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत.

— संपादक

नवे वर्ष महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सर्व कार्यकर्ते, सभासद, हितचिंतक, आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे सर्व वाचक यांना सुखाचे आणि समृद्धीचे जावो.

# आजचे मराठी दलित साहित्य

## गो. म. कुलकर्णी

आजची मराठी दलित साहित्यनिर्मिती ही स्वातंत्र्योत्तर काळातील केवळ महाराष्ट्रातीलच नव्हे तर अखिल भारतीय पातळीवरील अतिशय महत्त्वाची अशी सांस्कृतिक–साहित्यिक घटना आहे. संस्कृतीच्या लोकशाहीकरणाची प्रक्रिया हीमुळे वाढीस लागली. दलित साहित्य हा दीर्घकाळ ग्रांथिक संस्कृतीपासून वंचित राहिलेल्या नवजागृत मनाच्या व्यक्तिगत आणि समाजगत जाणिवांचा स्फोट आहे. आत्मभान आलेल्या मनाचा हुंकार आहे. प्रबोधनयुगाचा ग्रांथिक परिपाक आहे. आजची दलित साहित्यनिर्मिती ही आधुनिक मध्यवर्ती मराठी साहित्याशी आणि संस्कृतीशी विविध प्रकारे संबंधित असली तरी तिची प्रकृती भिन्न आहे. ती तुलनेने कितीतरी अधिक प्रमाणात समाजाभिमुख आहे, किंबहुना समाजपरिवर्तनाचा वसाच तिने घेतला आहे. प्रेरणादृष्ट्या आंबेडकरवाद, मार्क्सवाद, आधुनिक मानवतावाद, नवबुद्धधर्मप्रणाली, दलित पँथर चळवळ इत्यादींचा संकर तीत आढळतो.

आजच्या दलित साहित्याचे एक प्रमुख प्रवर्तक डॉ. म. ना. वानखेडे यांनी श्री. बाबूराव बागुल यांच्या ' सूड ' या दीर्घकथेला प्रस्तावना लिहिताना, ' दलित साहित्य म्हणजे दलित लेखकांनी दलितांविषयी निर्माण केलेले प्रक्षोभक विद्रोही साहित्य ' अशी दलित साहित्याची व्याख्या केली आहे, तर स्वतः बागुल ' दलितांचे क्रांतिविज्ञान ' या आपल्या पुस्तकात दलित साहित्यविचाराला मार्क्सवादाची तात्त्विक जोड देऊ इच्छितात. याचाच एक भाग म्हणजे दलितातील काही विचारवंतांनी आंबेडकर हे कसे मार्क्सवादाला जवळचे होते. हे पटवून देण्याचा चालविलेला प्रयत्न. परंतु या प्रयत्नाला अद्यापि तरी यावे तसे यश आलेले नाही. बहुसंख्य दलित लेखक मार्क्सवादी विचारधारेपासून मनाने अलिप्तच आहेत. ' आंबेडकरवाद ' आणि ' मार्क्सवाद ' यांचे समीकरणच त्यांना मान्य नसते. यामुळे आर्थिक समतेच्या विचारापेक्षा चातुर्वर्ण्यनिर्मूलन हेच या साहित्याचे विचारकेंद्र बनले आहे. परिणामतः नारायण सुर्व्यांसारखा पददलित जाणिवांना सर्वस्पर्शी स्वरूपात व्यक्त करणारा अग्रगण्य कवी आजच्या दलित विचारातून तीतील सांप्रदायिकतेमुळे दूर ठेवला जातो !

वस्तुतः ' दलित पँथर ' चळवळीचा जन्म महाराष्ट्रातच झाला. या चळवळीमुळेच आजच्या दलित साहित्यात विद्रोहाची धारा प्रबल झाली. या चळवळीचे प्रवर्तकही मुख्यतः नामदेव ढसाळ, राजा ढाले यांसारखे आजचे दलित लेखक आहेत. या चळवळीचे लोण इतर प्रांतांत पोहोचून तेथील पददलितांच्या चळवळीला आणि साहित्याला मार्क्सवादाचे वलय लाभले. पण महाराष्ट्रात मात्र या चळवळीचा जोर ओसरत गेला. अनेक कारणांनी मार्क्सवादी विचारधारा मराठी जीवनविश्वात आजवर उपेक्षित राहिलेली आहे. दलितविचारविश्वापुरताच विचार करावयाचा झाल्यास या विचारविश्वावर आंबेडकरवादातील ठराविक भागाचीच जबरदस्त पकड आहे. दलित समाजाची केवळ आर्थिक उन्नती झाल्याने त्यांचे दलितत्व समाजजीवनातून नष्ट होत नाही, असा त्यांचा आजचा अनुभवही आहे. यात उद्याच्या संभाव्य बदलाचा विचार नाही. एकंदरीनेच या साहित्यात ' उद्या ' पेक्षा ' आज ' वर, वर्तमानवास्तवदर्शनावर आणि भूतकालीन अन्यायकथनावर सर्वाधिक भर असतो. भविष्याची स्वप्ने या साहित्यात क्वचितच आढळतात.

आजच्या दलित साहित्यात प्रामुख्याने जे घटक दिसतात ते पुढीलप्रमाणे :

(१) या साहित्याला तळागाळातील सर्वच व्यक्तींच्या अंतिम विमोचनाचा संदर्भ असला तरी आजच्या दलित साहित्यात प्राधान्याने प्रकट होते ती पूर्वाश्रमीच्या अस्पृश्य वर्गांची आजची स्थिति–गती. (२) आधुनिक प्रबोधनयुगाने या वर्गाला झालेल्या आत्मभानातून,

आशा-आकांक्षातून, प्रतिक्रियातून दलितांचे हे साहित्य उदित झालेले आहे. (३) केवळ दलितांनीच दलित जाणिवातून निर्माण केलेले साहित्यच ' दलित साहित्य ' या सदरात मुख्यतः मोडते. अदलितांनी या प्रकारच्या लिहिलेल्या साहित्याचा (उदा. श्री. म. माटे यांचे ' उपेक्षितांचे अंतरंग ' सारखे लेखन) यात अंतर्भाव होत नाही. (४) हिंदूचातुर्वर्ण्यव्यवस्थेला विरोध किंवा नकार, तदनुषंगिक विद्रोही प्रतिक्रिया या साहित्य-निर्मितीत अपेक्षित असतात; पण दलित साहित्य-व्यवहारात ही अट वरीच सैल झालेली दिसते, यामुळे विद्रोही सूर नसलेले प्र. ई. सोनकांबळे यांचे ' आठवणीचे पक्षी '-सारखे लेखन दलित साहित्याच्या मुख्य प्रवाहात सामावून गेलेले आहे. हेच कमी-अधिक प्रमाणात अण्णाभाऊ साठे किंवा शंकरराव खरात यांच्या साहित्याबद्दल म्हणता येईल. (५) आजचे दलित साहित्य आंबेडकरवादी असले तरी आंबेडकरवादाचा पुरस्कार करणारे वामन कर्डकांसारख्यांचे ' आंबेडकरी जलसे ' मौखिक आविष्कारपद्धतीशी संबंधित असल्यामुळे या साहित्य-विचारात सहसा नोंदविले जात नाहीत. आजच्या दलित साहित्याची आविष्कारपद्धती मुख्यत: आधुनिक ग्रांथिक संस्कृतीशी संबंधित आहे.

या साऱ्याचा निष्कर्ष असा की, हिंदूधर्म व्यवस्थेप्रमाणे जे ' अस्पृश्य ' जातीत जन्माला आलेले आहेत, आणि आधुनिक प्रबोधनयुगामुळे आत्मभान येऊन ज्या दलितांना आधुनिक ग्रांथिक संस्कृतीच्या आधारे आपल्या व आपल्या जातिबांधवांच्या व्यथा-वेदनांना आपल्या लेखनातून मुखर केले आहे, ते सर्व लेखक व त्यांची ललित स्वरूपाची सर्व निर्मिती ' दलित साहित्य ' या संज्ञेत अंतर्भूत होते. या साहित्यात विद्रोही धारणा अपेक्षित असल्या तरी ती या साहित्याच्या ' असण्याची ' ती अपरिहार्य अट नाही, मात्र कृतिशीलतेकडे या साहित्याचा कल आहे.

या कृतीचे वैचारिक नेतृत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याकडे जाते. हे नेतृत्व सर्वच दलित लेखकांनी निःसंदिग्धपणे आणि एकमुखाने पत्करले आहे. डॉ. आंबेडकर हे दलित्य साहित्याला पितृस्थानी आहेत, ते या साहित्याचे वीरनायक आहेत, एक प्रकारे या क्षेत्रात ते दैवीपदाला पोहोचले आहेत, पोहोचविले गेले आहेत. त्यांच्या उक्ति-कृतींना वेदवाणीचे स्थान प्राप्त झाले आहे. त्यांच्याशी या ना त्या कारणाने संबंधित असलेली काही स्थळे (महाडचे चवदार तळे, नागपूरची दीक्षा-भूमी, मुंबईची चैत्यभूमी) आज दलितांची तीर्थस्थाने बनली आहेत. दलित साहित्याची केंद्रे म्हणून मुंबई–नागपूर या शहरांना प्राधान्य प्राप्त झाले आहे, याचे कारण या स्थळांचा आंबेडकरांशी असलेला संबंध.

मात्र दलित साहित्यातील डॉ. आंबेडकरांच्या या वैचारिक अनुसरणाला एक फार मोठी मर्यादाही पडली आहे. डॉ. आंबेडकरांनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या पर्वात आपल्या हजारो अनुयायांना समवेत घेऊन प्रज्ञा आणि करुणा यांवर भर देणाऱ्या बुद्धधर्माची दीक्षा जाहीरपणे घेतली होती. आपल्या अनुयायांना या धर्मातील कालोचित गाभा स्वीकारण्याचा त्यांनी आदेशही दिला होता. त्यांच्याकडून काही प्रतिज्ञांचा उच्चारही करून घेतला होता. परंतु आंबेडकरांच्या या आध्यात्मिक स्वरूपाच्या प्रेरणांचा प्रभाव आजच्या दलित साहित्यावर अजून तरी पडलेला दिसत नाही. अभिजात साहित्यात अभिप्रेत असलेली उंची त्याला प्राप्त होण्यास यामुळे एक अडसर निर्माण होत आहे. काही मार्क्सवाद-प्रवण मूठभर दलित लेखक वगळता, डॉ. आंबेडकरांच्या विचारांचे साद–पडसाद उमटविण्यापलीकडे दलित लेखकांचे वैचारिक क्षितिज अद्यापि विस्तारलेले नाही.

या साहित्यात प्रकर्षाने आंबेडकर अनुगामित्व आढळत असले, तरी या साहित्याला बहर आला तो डॉ. आंबेडकरांच्या निधनानंतर. डॉ. आंबेडकरांच्या निधनामुळे दलित समाजाचा आधारवडच कोसळल्यासारखा झाला. यामुळे दलित समाजजीवनात व व्यक्तिजीवनात जो रिक्तपणा, जी पोकळी जन्माला आली, ती भरून काढण्याचा एक प्रयत्न म्हणजे प्रस्तुतची दलित साहित्य-निर्मिती. या साहित्यात वाजवीहून अधिक वाटणाऱ्या तीव्र तिखट प्रतिक्रियांचा, आक्रंदन–आक्रोशांचा एक अन्वयार्थ, या वस्तुस्थितीत सापडण्यासारखा आहे. आंबेडकरवादाची तात्त्विक बैठक आंबेडकरोत्तर कालात, बदलत्या जीवनपरिस्थितीच्या संदर्भात आंबेडकरी विचारांना नवा आकार देणारा एखादा प्रभावी विचारवंत, भाष्यकार, कार्यकर्ता दलित समाजातून जर पुढे आला असता, तर दलित जीवनातील आणि साहित्यातील एकंदर कोंडी फुटण्यास काहीएक प्रमाणात तरी मदत झाली असती.

ही 'जर–तर'ची भाषा बाजूला ठेवून निखळ वस्तुस्थितीचा विचार केल्यास, आजच्या दलित साहित्याचा चेहरामोहरा पुढीलप्रमाणे आहे :

(१) समाजप्रबोधन हे या साहित्याचे प्रधान उद्दिष्ट आहे. (२) व्यक्तीपेक्षा समूहभावनेचा वेध या साहित्यात अधिक प्रमाणात घेतला जात आहे. स्वत:ला ते साहित्य कृतिशील साहित्य ('Literature of Action') मानते. जीवनाशी त्याची विशिष्ट बांधिलकी आहे. (३) यामुळे या साहित्याच्या निर्मात्यांनी आपल्या व्यक्तिगत भावभावनांना आविष्कारापासून बाजूला ठेवले आहे. यामुळे स्वाभाविकच भावनिर्भरतेला येथे अवकाश नाही. (४) या साहित्याच्या प्रेरणा काही पूर्वनियोजित संकल्पनांनी निश्चित झालेल्या आहेत. त्यात एक प्रकारचा ताणलेपणा, बहिर्मुखता, एकांडेपणा प्रविष्ट झाला आहे. (५) हिंदू धर्मव्यवस्थेने किंवा समाजव्यवस्थेने दलितांवर दीर्घकाल गाजविलेले अन्याय्य वर्चस्व व त्याविषयीचा तीव्र निषेध हे या साहित्यातील केंद्रवर्ती सूत्र आहे. (६) या अन्यायामुळे निर्माण झालेली दुरवस्था, ओसाडी, भग्नता यावर या साहित्याचा भर आहे. कठोर जीवनवास्तवाचे भेदक चित्रण यामुळे यातून प्रकट होते. या साहित्याच्या निमित्ताने अध:स्तरीय भारतीय जीवनाचे दर्शन मोठ्या प्रमाणात प्रथमच मराठी साहित्यात घडत आहे. (७) हे साहित्य दलितांनी दलित जाणिवातून जरी निर्माण केले असले, तरी अदलितांच्या मनातील दलितांविषयीचे कल्मष दूर करणे हे याचे प्रयोजन आहे. दलितांनी दलितांसाठी तयार केलेला हा एक प्रायश्चितविधी आहे. हा प्रायश्चितविधी दिला-घेतल्याने उभयपक्षी शुद्धी घडेल, दलित-अदलितातील पूर्वकालीन ग्रह, गैरसमज विसर्जित होतील अशीही एक अपेक्षा यामागे आहे. या साहित्याचा आशय जरी दलितसंबंध असला, तरी याची आविष्कारपद्धती, अदलित मध्यमवर्गीय साहित्यबंधाशी जुळतीमिळती राहाण्याचे हेही एक कारण. (९) या वस्तुस्थितीमुळे या साहित्याचा आशय व अभिव्यक्ती यात काही फटी राहून गेल्या आहेत. (१०) हे साहित्य समूहात्मक वृत्तीचे चित्रण करीत असले, तरी ते आत्मशोध, आत्माविष्कार इत्यादी घटकांना पारखे नाही, याचा प्रत्यय मुख्यत: दलित कवितेमार्फत येतो.

ही कविता बरीचशी निवेदनप्रधान, बहिर्मुख, वक्तृत्वाच्या ढंगाने भरली असली तरी तिचा आशय सर्वंकष स्वरूपाचा आहे.

दलित कविता हे दलित भावभावना, कल्पना, विचार, संकल्प, स्वप्ने, सत्ये यांचे एक मोहळच बनले आहे. त्रुटित, स्फोटक स्वरूपाचा आशय सहजपणे आविष्कृत करण्याच्या दृष्टीने कवितेचे माध्यम उपयुक्त ठरत असल्यामुळे दलित साहित्यात कवितेचे संख्याधिक्य आढळते. या कवितातून प्रकट होणाऱ्या आशयाचे मध्यवर्ती स्वरूप पाहावयाचे झाल्यास 'अंगार', 'ठिणगी', 'सुरुंग', 'कोंडवाडा', 'युद्धाई', 'उत्थानगुंफा' यांसारख्या दलित काव्यसंग्रहांच्या नावांकडे दृष्टिक्षेप केला तरी लक्षात येते. दलित जीवनातील साऱ्या रौद्रभीषणतेचा स्फोट नामदेव ढसाळ यांच्या 'गोलपीठा'त आढळतो. ही कविता म्हणजे रोमँटिक भावमंथरविश्वात दीर्घकाल मश्गुल असलेल्या मध्यवर्ती मराठी कवितेला मिळालेला एक जमालगोटा आहे.

दलित कवितेचे हे 'विद्रोही' रूप तसे आधुनिक मराठी कवितेला अपरिचित नाही. आधुनिक कवितेच्या जनकानेच–केशवसुतांनी–या विद्रोहाचा सूर सर्वंकष स्वरूपात प्रदान केलेला आहे. पण याचा मध्यवर्ती कवितेला दीर्घकाल विसर पडलेला होता. दलित कवितेच्या निमित्ताने त्याचे अवतरण प्रथमच आणि प्रकर्षाने आजच्या मराठी कवितेत घडत आहे. एकंदर मराठी कवितेबद्दल दलित मनाला तशी आस्था नाही, तथापि विद्रोही दलित कविता केशवसुतांना आपले आदिपुरुष मानते. केशवसुतांच्या विद्रोही भावनेमागील तात्त्विक उंची प्रत्यक्षात जरी या कवितेत आढळत नसली, तरी या विद्रोहाचा तपशील तीत मोठ्या प्रमाणात उतरलेला आहे.

केशवसुतांच्या विद्रोही धारणा आणि दलित कवींच्या विद्रोही धारणा यात एक महत्त्वाचा फरक आहे. केशवसुतांच्या विद्रोहात 'जुने जाउदे मरणालागुनि' असे उद्गार ठाशीव स्वरात येत असले, तरी 'जुन्यातील जे निष्पत्ती नवि। काय नव्हे ती श्रेयस्कर ?' ही धारणाही आहे. पण दलित कवितेतील विद्रोहात परंपरेबद्दल या प्रकारची आस्था नाही. तीत अधूनमधून बुद्धाची प्रतिमा डोकावते, पण ती ओझरतीच.

साहित्य आणि परंपरा किंवा जीवन आणि परंपरा यांच्या परस्परसंबंधांबाबत दलित साहित्यिकांच्या किंव

दलित विचारवंतांच्या धारणा अद्यापि चाचपडत्या अवस्थेत आहेत. त्यांच्या दृष्टीने भारतीय परंपरेतील कोणता भाग नाकारावयाचा हे स्पष्ट आहे, पण कोणता भाग स्वीकारावयाचा याविषयी संभ्रम आहे कारण या परंपरेतील विधायक घटकांचा जिवंत स्पर्श त्यांनी आजवर कधी अनुभवलेला नाही. तो अनुभवण्याजोगी अवतीभोवतीची परिस्थितीही नव्हती, नाही. या परंपरेच्या कालच्या आणि आजच्या व्यवहाराने दलित समाजाला रक्त, घाम आणि अश्रूंखेरीज अन्य कोणतीही देणगी दिलेली नाही, देण्याचा व्यापक प्रमाणात प्रयत्नही झालेला नाही, किंवा देण्याचा प्रयत्न होऊनही विफल झाला, असे म्हणावे लागेल. यामुळे या कवितेत या परंपरेची निषेधरूपेच प्राचुर्याने प्रकट होतात. आजच्या दलित कवितेचा रचनाबंध समकालिनत्वामुळे नवकवितासंबद्ध असला तरी दोहोंतील 'अस्तित्व' धारणेत महदंतर आहे.

नवकविता आणि नवकथा ही एकाच काळाची जुळी भावंडे असल्यामुळे दलित कवितेप्रमाणेच दलित कथेवरही नवकथेचा प्रभाव जाणवतो. पण कवितेच्या तुलनेने तो कमी आहे. नवकथेइतकी दलित कथा सूक्ष्मस्पंदी नाही. प्रकृतिधर्मदृष्टचा ती नवकथेपेक्षा आधुनिक कथेला जवळची आहे. दलित जीवनातील घटना-प्रसंगांच्या सुटयासुटया चित्रणावर ही कथा आधारलेली आहे. तीतून आजच्या दलित जीवनातील स्थिति-गती वेविधांगांनी चित्रित होते.

ही कथा आजच्या शहरी आणि ग्रामीण जीवनातील संगती-विसंगतीचा कधी सरळपणे, तर कधी उपरोध-उपहासाचा, कारुण्यभावनेचा आश्रय घेऊन आपला आशय स्पष्ट करते. कथेच्या माध्यमाद्वारा दलित जीवनाचे सर्वांगीण चित्रण करण्यात श्री. बाबूराव बागूल यांची कथा सर्वाधिक प्रमाणात यशस्वी झालेली आहे. त्यांचा कथेचा पैस फार मोठा आहे. आजच्या दलित जीवनाचाच नव्हे तर आजच्या शहरी जीवनातील सर्वच अधःस्तरांचा ही कथा सर्वांगीणपणे वेध घेते. व्यष्टी-समष्टीच्या नात्यातील गुंतागुंत, तिढे, निरगाठी यांनी हे कथाविश्व भरलेले आहे. बाबूराव बागूल यांची कथा आणि नामदेव ढसाळ यांची 'गोलपीठा'तील कविता यातून आजच्या दलित साहित्याने गाठलेला उंचीचा प्रत्यय येतो. या दोहोंच्याही साहित्याची पार्श्वभूमी मुख्यतः महानगरातील अंधेऱ्या जगाची गुहा ही आहे.

पण एकंदर दलित कथेचा विचार केल्यास तीत शहरापेक्षा ग्रामीण परिसर अधिक प्रमाणात येतो, यामुळे आजच्या ग्रामीण कथेशी या कथेचे एका बाजूने नाते निर्माण होते. असे असले तरी ही कथा मुख्यतः संबंधित आहे ती या ग्रामजीवनातील दलितांशी. यातील व्यक्ती आणि समाजाशी. या कथेतून या जीवनाचे एकपदरी पण विविधांगी दर्शन घडते. शंकरराव खरात, योगीराज वाघमारे, अर्जुन डांगळे, अभिताभ, केशव मेश्राम प्रभृती मंडळींनी हे दलित कथासाहित्य मुख्यतः सिद्ध केले आहे. दलित साहित्यात विनोदापेक्षा उपरोध-उपहासाचा सूर मोठ्या प्रमाणात येतो. परंतु विनोदाची ही उणीव वामन होवाळ यांच्या कथेने काही प्रमाणात तरी भरून काढली आहे.

दलित कथा आणि दलित कविता यांच्या बाबतीत जसे विधायक स्वरूपाचे काही बोलता येते, तसे दलित कादंबरीबद्दल मात्र म्हणता येणार नाही. हे कादंबरीलेखन डोळ्यात भरण्याचे तर बाजूलाच राहो, पण ते सहसा नजरेसमोरही येत नाही. श्री. बाबूराव बागूल ('अघोरी') किंवा नामदेव ढसाळ ('हाडकी हाडवळा') यांसारख्या अग्रगण्य दलित लेखकांनाही कादंबरीलेखनाची योग्य दिशा गवसलेली आहे असे दिसत नाही. श्री. शंकरराव खरात यांनी कथेप्रमाणे विपुल कादंबरी लेखनही केले आहे, पण त्यांच्या कादंबरीलेखनातही त्यांच्या कथेतील एकपेडीपण उतरले आहे. हा एकेरीपणा कथालेखनात थोडाफार खपतो, पण कादंबरीला त्याचे पूर्ण वावडे असते.

खरातांना समकालीन असलेला दुसरा महत्त्वाचा दलित कादंबरीकार म्हणजे अण्णाभाऊ साठे. या लेखकाची अंगभूत ताकत मोठी आहे. दलित जीवनाचे आडवेतिडवे पट्टे ठसठसशीतपणे तो आपल्यासमोर चित्रित करतोही. मनस्वी, झुंजार व्यक्तींचे या लेखकाला मोठे आकर्षण आहे. पण मनस्वी प्रकृतीच्या व्यक्तींचे चित्रण करणे म्हणजे शैलीही मनस्वीपणे मोकळी सोडणे नव्हे, याची या लेखकाला असावी तशी जाणीव नाही. यामुळे या लेखकाची कादंबरीलेखनाची मूळ ताकत इतस्ततः विखुरली जाते. रंजन आणि उद्बोधन यांच्या कात्रीत बहुतेक दलित लेखकांचे कादंबरीलेखन सापडले आहे. रंजनप्रवणतेचे हेच दुखणे आजच्या मध्यवर्ती गंभीर



अनुक्रमणिका

मराठी कादंबरीलाही कमी-अधिक प्रमाणात भोवते आहे. मग या मध्यवर्ती मराठी कादंबरीच्या आविष्कार-बंधाचे अनुसरण करणारी आजची दलित कादंबरी तरी याला कशी अपवाद राहाणार ?

वास्तविक आजचे दलित जीवन, त्यांचे आंतरिक आणि बाह्यस्वरूपाचे ताणतणाव, त्यातील संगती–विसंगती, नाट्य हा महाकादंबरीच्या लेखनाला प्रवृत्त करणारा विषय, एक आव्हान. पण हे आव्हान पेलणे तर दूरच राहिले, पण या प्रकारची प्रेरणाही कोणा दलित लेखकाला झालेली दिसत नाही. दलितांचा 'मुक्तिसंग्राम' कथन करू जाणारे श्री. हिं. गो. बनसोडे या संग्रामात तशी उडीच घेत नाहीत. काठाकाठाने थोडे भ्रमण करून परत फिरतात. श्री. भीमसेन देठे यांची 'इस्कोट'सारखी कादंबरी दलित जीवनातील उध्वस्तता पकडण्याचा अंशात्मक प्रयत्न करते, आणि विरून जाते. कथानकातील मांडणीचे कच्चेपण, साचेबंद स्वभाव-चित्रण, वृत्तपत्रीय स्वरूपाचे निवेदन, भडक घटनांचे प्रावल्य, येनकेन प्रकाराने प्रणयप्रसंग घुसडण्याची हौस, यासारखे आजच्या ग्रामीण बोलपटात शोभणारे घटक या कादंबऱ्यात आढळतात. एरव्ही प्रगल्भ वाङ्मयीन अभिरुची असलेल्या श्री. माधव कोंडविलकरांचे कादंबरी-लेखनही ('छेद', 'वेध', 'अनाथ' इ.) याला अपवाद नाही.

केशव मेश्राम यांच्या 'हकीकत आणि जटायू', 'पोखरण' या कादंबऱ्या, सुधाकर गायकवाड यांची 'शूद्र', अशोक व्हटकर यांची 'मेलेलं पाणी' यांसारख्या काही थोड्या कादंबऱ्या दलित जीवनाला अधिक खोल-पणे भिडण्याचा प्रयत्न करतात. पण त्यांची चण तशी लहान आहे. अव्वल दर्जाच्या कादंबरीलेखनाला आव-श्यक असलेली सामग्रीच (चिंतनशीलता, जीवनाच्या गुंतागुंतीची प्रगल्भ जाणीव, परिश्रमशीलता, सापेक्ष–मानवी जीवनाचे विविध प्रकार आणि परिमाण यांचे भान) येथे अपुरे पडते.

दलित कादंबरीला अद्यापि जे साधले नाही, ते काही प्रमाणात तरी दलित आत्मचरित्रातून सिद्धीला गेले आहे. दलित आत्मचरित्रलेखन ही आजच्या दलित साहित्याची एक मोठी जमेची बाजू. अंतर्मुख पातळी-वरील चिंतनशीलता आणि प्रांजल आत्मकथन हे आत्मचरित्रलेखनाचे महत्त्वाचे विशेष. पण एकूणच मराठी आत्मचरित्रलेखनात हे गुण कमी आहेत. मराठीतील बुजुर्ग लेखकही आत्मचरित्रलेखनात अयशस्वी ठरलेले आढळतात. अशा परिस्थितीत वाङ्मयसंस्कृतीशी नव्याने परिचित झालेल्या आणि एरव्ही 'संतप्त' गणल्या गेलेल्या तरुण दलित गटातून आलेल्या काही व्यक्तींनी लिहिलेल्या या आत्म-चरित्रात प्रौढ जीवनचिंतन नसले तरी प्रांजल आत्म-कथन बऱ्याच अंशी आढळते. स्वजीवनातील प्रक्षुब्ध अनुभवांचे चित्रणही येथे बऱ्याच संयतपणे आणि ताट-स्थ्याने केलेले आहे. (उदा. प्र. ई. सोनकांबळे यांचे 'आठवणींचे पक्षी'.) दलित व्यक्ती, कुटुंब, समाज यांचे अनुबंध या आत्मचरित्रांतून व्यक्त होतात. आजचे राजकारण, समाजकारण, शिक्षणव्यवस्था, शासनसंस्था इत्यादींबद्दलही इथे बरेच काही सांगितले जाते–सुच-विले जाते. जागृत, तरुण, संवेदनशील मनावर या सर्वांचे कोणते संस्कार उमटावे, तेही ओघात कथन केले जातात. 'बलुतं' (दया पवार), 'आठवणींचे पक्षी' (प्र. ई. सोनकांबळे), 'उपरा' (लक्ष्मण माने), 'मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे' (माधव कोंडविलकर), 'अक्करमाशी' (शरणकुमार लिंबाळे), 'फांजर' (नानासाहेब झोडगे), 'तराळ–अंतराळ' (शंकरराव खरात), 'गावकी' (रुस्तम अचालखां) यांसारखी किती तरी दलित आत्मचरित्रे या संदर्भात उल्लेखिता येतील. वस्तुनिष्ठ जीवनवास्तव आणि व्यक्तिगत भावभावना यांचा मोकळा आविष्कार करण्याचे हे महत्त्वाचे माध्यम असल्यामुळे आत्मचरित्रलेखनाला दलितसाहित्यात आजकाल भरतीच आल्यासारखी झाली आहे. 'माझ्या जन्माची चितरकथा' लिहिणाऱ्या शांताबाई कृ. कांबळेसारखी जुन्या जमान्या-तील दलित स्त्रीही यात आता प्रविष्ट झाली आहे. दलित साहित्यात स्त्रियांचा सहभाग फार कमी आहे, त्यामुळे ही घटना अधिकच महत्त्वाची ठरते. ही आत्मचरित्रे पुरुषमंडळींनी लिहिलेली असली तरी यांत उठून दिसते ते स्त्रीजीवन. त्यातील कारुण्य. हे कारुण्य त्याच्यास्वाभा-विक स्वरूपात प्रगट होते. कन्या, माता, पत्नी, भगिनी अशा सर्वच नात्यांनी ही स्त्री येथे वावरते. त्यातल्या त्यात मातेचे चित्र विशेष उठावदारपणे चित्रित झालेले आहे. स्त्रीजीवनातील विविध दुःखे संयमपणे आणि सोशिकपणे स्वीकारावयाची तिची क्षमता येथे अंगभूत स्वरूपात चित्रित होते. या अशिक्षित स्त्रीच्या ठिकाणी



अनुक्रमणिका

असलेल्या व्यावहारिक शहाणपणामुळे बदलत्या काळाची चाहूल तिला सहजगत्याच लागते. आपले जीवनसर्वस्व वेचून आपल्या मुलाला शिक्षित करण्याचा ती आटोकाट प्रयत्न करते. दलित कुटुंबव्यवस्थेचा, त्यातील जाती–पोटजातींचा (महार, मांग, चांभार इ.) अंतःस्तर, भाववंध जाणून घेण्याच्या दृष्टीने दलित आत्मचरित्र हे एक महत्त्वाचे साधन आहे.

या आत्मचरित्रांचा आणखी एक विशेष असा की, एखादा–दुसरा अपवाद वगळल्यास ही आत्मचरित्रे लेखकाच्या कौमारकालाचे, फार तर त्याच्या जीवनाच्या पूर्वार्धाचेच मुख्यतः दर्शन घडवितात. हा टप्पा ओलांडण्याच्या सीमारेषा प्रत्येक लेखकाच्या बाबतीत कमी–अधिक असतील, पण हे आत्मचरित्रलेखन या टप्प्यावर येताच थांबते, थांबविले जाते, किंवा बंद पडते.

या आत्मचरित्रलेखकांच्या पूर्वायुष्यातील आत्मकथनाला आंबेडकरी चळवळीची प्रेरणादायक पार्श्वभूमी आहे. या पार्श्वभूमीने या लेखकांना शिक्षित बनविले आहे. त्यांच्या जीवनात नव्या सुविधा उपलब्ध करून दिल्या आहेत. त्यांच्या प्रगतीची वाट दाखवून दिली आहे. त्यात शिक्षणाला प्राधान्य आहे. शिक्षणोत्तर काळात यामुळे त्याचा वेग स्वाभाविकपणेच कमी होत असावा. यानंतर इतर अनेकांप्रमाणे दलित लेखकाचे पांढरपेशीकरण होण्यापलीकडे या जीवनात अधिक काही घडत नाही. स्वजीवनात कथनीय असा काही मूल्यभाव आढळत नाही, यामुळे बहुधा हा लेखक थांबत असावा. यानंतरच्या अवस्थेत त्याला जर काही भावते, जाणवते तर तो मग इतर वाङ्मयप्रकारांच्या माध्यमातून व्यक्त करण्यास प्रवृत्त होतो.

दलित आत्मचरित्रलेखकांचे हे असे थांबणे आजच्या भारतीय जीवनात सर्वदूर पसरलेल्या गतिरोधाचेही निदर्शक म्हणावे लागेल. सुशिक्षित दलित मनाला तर याचा प्रत्यय अधिकच प्रमाणात येणारा. आजचे सारे भारतीय जीवनच मूल्यभ्रष्ट झाले आहे. जुनी द्वंद्वे तर मिटली नाहीतच, पण त्यांच्या जोडीने नव्या द्वंद्वांचा प्रादुर्भाव झाला आहे. या द्वंद्वांची बोच दलित तरुण मनाला तर विशेषच जाणवत असणार. जीवनाच्या नव्या वाटा उजळल्या जात नसल्यामुळे मग जुन्याच विचार-कल्पनांचे चर्वितचर्वण करण्यापलीकडे अधिक काही घडत नाही. तत्त्वतः सर्वजणच 'काळोखाचे कैदी' बनले आहेत. आजच्या दलित साहित्यातील आवर्तात्मिकतेचे हेही एक कारण.

या 'काळोखाच्या गर्भात' हिंमतीने शिरून काही श्रेयमूल्य हाती लागते का ? हे पाहाण्याचा जिद्दीचा प्रयत्न आजची दलित मराठी रंगभूमी करीत आहे. इतर कोणत्याही आविष्कारमाध्यमापेक्षा आशय, अभिव्यक्ती आणि आस्वादन या तीनही पातळ्यांवर हे माध्यम सामूहिकतेशी अधिक निगडीत आहे. या सामूहिकतेच्या आधारे आजच्या दलित जीवनातील आणि साहित्यातील कोंडी फोडण्याची उमेद या रंगभूमीने बाळगली आहे. इतर वाङ्मयप्रकारांच्या तुलनेने हे आविष्कारमाध्यम परंपरेनेचे दलित रक्तात भिनलेले आहे. ते आता नव्या रूपात प्रकट होत आहे या आधुनिक दलित नाटकाचा प्रारंभच दलित समूहजीवनातील एका भव्योदात्त प्रसंगाने झाला आहे. डॉ. आंबेडकरांनी जे सामूहिक धर्मांतर केले. त्या सोहोळ्याच्या निमित्ताने डॉ. म. भि. चिटणीस–डॉ. आंबेडकरांचे एक निकटवर्ती सहकारी–यांनी लिहिलेल्या 'युगयात्रा' या नाटकाचा प्रयोग झाला. दलित थिएटरची रीतसर निर्माण झाली ती औरंगाबाद येथे १९७६ साली. १९७९ मध्ये पुणे येथे 'दलित रंगभूमी' या नावाची संस्था निर्माण झाली. पहिला दलित नाट्य महोत्सव झाला तो १९८२ मध्ये. औरंगाबाद, मुंबई, पुणे, नागपूर ही या रंगभूमीची आजची महत्त्वाची केंद्रे.

या रंगभूमीचा लोकनाट्याशी असलेला संबंध मध्यवर्ती रंगभूमीच्या तुलनेने अधिक सेंद्रिय तर आहेच, खेरीज या रंगभूमीने नव्या रंगमूल्यांचाही आवश्यकतेनुसार अवलंब चालविला आहे. आशयाचे कलम तर नवेच आहे. एके काळी मराठी रंगभूमीने रंजनाबरोबरच उद्बोधन हेही उद्दिष्ट आपल्या डोळ्यांसमोर ठेवले होते. प्रचलित रंगभूमीला बहुंशी याचा विसर पडलेला आहे. तिचे मोठ्या प्रमाणात व्यावसायीकरण झाले आहे. दलित रंगभूमीला या प्रकारच्या व्यावसायीकरणाचे वावडे आहे. ती ध्येयनिष्ठ आहे. या रंगभूमीवरील कलाकार हा केवळ कलाकार नाही, तो परिवर्तननिष्ठ दलित चळवळीतील एक कार्यकर्ताही आहे. मध्यवर्ती मराठी रंगभूमीने दलित जीवनाकडे दुर्लक्ष केले आहे, आणि जे काही दलित जीवनाचे चित्रण घडविले आहे, ते विकृत स्वरूपाचे आहे, अशी दलित रंगभूमीची तक्रार आहे-



अनुक्रमणिका

समाजातील आजचे सडकेपण उघडे करणे, दलितांवर होणाऱ्या अन्याय–अत्याचारांचे विदारक दर्शन घडविणे, समाजाला खडबडून जागे करणे हे या रंगभूमीचे ध्येय आहे. पथनाट्यापासून सुसज्ज रंगमंचापर्यंत तिच्या आविष्काराची विविध रूपे आज आढळतात. 'घोटभर पाण्यासाठी', 'आवर्त', 'थांबा ! रामराज्य येत आहे', 'देवनवरी', 'साक्षीपुरम्', 'काळोखाच्या गर्भात' यांसारख्या या क्षेत्रात गाजलेल्या काही नाटचकृती. दत्ता भगत, प्रेमानंद गज्वी, अविनाश डोळस, रामनाथ चव्हाण, टेक्सास गायकवाड ही या क्षेत्रातील काही आजची आघाडीची मंडळी.

आजच्या दलित साहित्याच्या निर्मितीला आता कुठे पंचवीस–तीस वर्षे पूर्ण होत आहेत. कोणत्याही साहित्य प्रवाहाच्या सर्वांगीण वाढीच्या दृष्टीने हा काल तसा अल्पच म्हणावा लागेल. ग्रांथिक संस्कृतीचे पूर्वसंस्कार नसलेल्या दलित साहित्याच्या बाबतीत तर हे अधिकच खरे आहे. याची जाणीव असल्यामुळेच या साहित्याचे आजवर सर्वत्र स्वागतच होत आले आहे. या साहित्याबाबत ज्या तक्रारी नोंदविल्या गेल्या आहेत, त्या या साहित्याच्या तपशीलाच्या संदर्भातील आहेत. दलित साहित्य–संस्कृतीच्या उदयाचे अंगभूत महत्त्व सर्वांनीच मान्य केले आहे. केवळ मराठीतच नव्हे तर मराठी भाषेच्या कक्षेबाहेरील वर्तुळातूनही या साहित्याचे स्वागत झाले आहे. मुंबईच्या 'टाईम्स ऑफ इंडिया' या प्रतिष्ठित वृत्तसंस्थेतर्फे निघणाऱ्या 'इलस्ट्रेटेड वीकली'ने १९७३ मध्ये 'लिटरेचर ऑफ द ऑप्रेस्ड' या नावाचा मराठी दलित साहित्यावर आधारलेला अंक प्रसिद्ध केला. १९७५ मध्ये 'सारिका' या हिंदीतील एका महत्त्वाच्या नियतकालिकाने दलित साहित्यावर अंक काढला. हिंदीतील एक सुप्रसिद्ध लेखक श्री. कमलेश्वर यांनी औरंगाबाद येथे भरलेल्या तिसऱ्या दलित साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना या साहित्याच्या संदर्भात काढलेले उद्‌गार पुढील प्रकारचे आहेत;

'मराठीका दलित साहित्य आज केवल मराठीका साहित्य नही है, वह भारतकी अपमानित, दलित, शोषित और प्रतारित जनताका साहित्य है...मराठीका दलित साहित्य आज मात्र महाराष्ट्रकी रचनात्मक संपदा नही है, वह भारतकी रचनात्मक संपदा बन चुका है' एलिनार झेलिएट यांनी संपादित केलेल्या 'दि जर्नल ऑफ साउथ एशियन लिटरेचर' च्या १९८२ च्या एका अंकात मराठी दलित साहित्याचा परिचय विस्तृत प्रमाणात करून दिलेला आढळतो.

मराठी समीक्षेने तर प्रारंभापासूनच या घटनेची स्वागतशील वृत्तीने मोठ्या प्रमाणात दखल घेतली आहे. 'दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह', 'दलित साहित्याची प्रकाशयात्रा', 'दलित रंगभूमी' (डॉ. भालचंद्र फडके), 'निळी पहाट', 'निळी क्षितिजे' (प्रा. रा. ग. जाधव), 'दलित साहित्याचे निराळेपण' (डॉ. प्रभाकर मांडे), 'दलित साहित्य' (प्रा. बाळकृष्ण कवठेकर), 'दलित कविता' (डॉ. म. सु. पाटील), भजन' (प्रा. नरहर कुरुंदकर) अशी या संदर्भात अदलितांनी लिहिलेल्या समीक्षासंग्रहांची कितीतरी नावे घेता येतील. स्वतः दलितांनीही या संदर्भात बरेच लेखन केले आहे. 'दलितांचे विद्रोही वाङ्मय' (डॉ. म. ना वानखेडे), 'दलित साहित्य एक अभ्यास (श्री. अर्जुन डांगळे), 'दलित साहित्याचे : क्रांतिविज्ञान' (बाबूराव बागुल), 'दलित साहित्य : प्रेरणा आणि प्रवृत्ती' (श्री. शंकरराव खरात) हे किंवा यांसारखे आणखीही काही समीक्षालेखन या अनुरोधाने उल्लेखिता येईल. डॉ. गंगाधर पानतावणे यांच्या संपादकत्वाखाली 'अस्मितादर्श' या नियतकालिकाने दलित साहित्याच्या प्रचार–प्रसाराचे फार मोठे कार्य चालविलेले आहे. या नियतकालिकातर्फे वार्षिक मेळावे भरतात. चर्चा होतात. सिद्धार्थ रीसर्च 'इन्स्टिटयूट', 'बौद्ध साहित्य परिषद', 'दलित साहित्य संसद' यांसारख्या संस्थांचाही या अनुरोधाने उल्लेख करता येईल. 'मराठवाडा', 'पूर्वा', 'पुस्तकपंढरी', 'समाजप्रबोधन पत्रिका', 'साधना' यासारख्या मराठी वृत्तपत्रांनी, नियतकालिकांनी, साप्ताहिकांनी या साहित्यावरील चर्चेला आपल्या नियतकालिकात आवर्जून जागा दिलेली आहे. 'निकाय', 'अस्तित्व', 'सुगावा' यांसारखी दलितांची नियतकालिकेही आपापल्या परीने कार्य करीत आहेत. पुणे, शिवाजी, मराठवाडा इत्यादी विद्यापीठातील मराठीच्या अभ्यासक्रमात दलित साहित्याचा अंतर्भाव झाला आहे. दलित लेखकांना काही गौरववृत्त्या, अनुदाने, पारितोपिके, पुरस्कारही दिले गेले आहेत.

दलित साहित्य आता मध्यवर्ती मराठी साहित्याचा एक अविभाज्य आणि प्रतिष्ठित भाग बनले आहे, हे

यावरून स्पष्ट होते. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद दलित लेखकाला दिले जाऊन यावर शिक्कामोर्तबही झाले आहे. हे सारे इष्ट आणि उचितच आहे यात शंका नाही.

पण यावरोबरच या साहित्यविश्वात आत्मसंतुष्टतेचा भावही प्रबल होत चालल्याचे आढळते. हे स्वाभाविक असले तरी इष्ट नाही. प्रा. रावसाहेब कसब्यांसारख्या दलित विचारवंताने यावावत अलीकडे इशाराही दिलेला आहे.[1] तथापि या क्षेत्रात स्थितीतील गती शोधण्याचाच अधिक प्रयत्न आढळतो. ठराविक एकांड्या समर्थनाचा सूर दलित लेखकांत कसा रुळला आहे, तेच ते युक्तिवाद त्याच त्या प्रकारे कसे केले जातात हे पाहाण्याच्या दृष्टीने अलीकडेच प्रसिद्ध झालेले श्री. वामन निंवाळकरांचे दलित साहित्य समीक्षाविषयक पुस्तक उपयुक्त ठरेल.[2] परिस्थितिप्राप्त अशा एकेकाळच्या आग्रही भूमिकेला वदलत्या परिस्थितीतही दलित लेखक कसा चिकटून आहे याचे यावरून प्रत्यंतर येते. दलित साहित्याच्या पुढील वाटचालीला हे पोषक नाही.

अदलितांनी दलित साहित्याची केलेली समीक्षाही आता आवर्तात्मक वनत चाललेली आहे की काय, अशी शंका येते. दलित साहित्यावद्दलच्या आत्मीयतेतून आणि स्वागताच्या ऐतिहासिक गरजेतून ही समीक्षा बव्हंशी निर्माण झाली आहे. पण वदलत्या परिस्थितीत दलित साहित्याचे रूप वदलणे कसे आवश्यक आहे याची मीमांसा सामान्यत: या समीक्षेत नसते.

समाजप्रवोधनाच्या आणि परिवर्तनाच्या संदर्भात भारतीय समाजाचे मानसिक परिवर्तन घडवून आणणे, त्यास साहाय्यभूत होणे, ही या साहित्याची मूळ प्रतिज्ञा आहे. या प्रकारचे परिवर्तन केवळ साहित्यमार्गाने होणारे नाही हे उघड आहे. परंतु अस्सल आणि अव्वल दर्जाचे साहित्य या उद्दिष्टाला कळत-नकळतपणे मदत करते हे मान्य होण्यास हरकत नसावी. अव्वल दर्जाची साहित्यनिर्मिती हा योजनावद्ध पद्धतीने पार पाडावयाचा कार्यक्रम नसतो. ही निर्मिती प्रतिभावंताच्या अंगभूत बळावर अवलंबून असते. यात योगायोगाचा काही भाग असतो ही वस्तुस्थितीही नाकारता येत नाही.

पण यावरोवरच हेही खरे आहे की, अव्वल दर्जाच्या साहित्यनिर्मितीला पोषक होईल असे वातावरण निर्माण करणे, समाजात वाङ्मयीन अभिज्ञतेची प्रगल्भ वाढ कशी होईल हे पाहाणे, या अनुषंगाने काही उपक्रम हाती घेणे शक्य आहे. हे उपक्रम प्रत्यक्षपणे वा परोक्षपणे साहित्याची कोंडी फोडण्यास साहाय्यभूत होऊ शकतात. यातून नवसाहित्यसंभवाची नांदी होते. यासाठी साहित्यसमीक्षेला आणि साहित्य-संस्कृतीच्या सर्वच हितचिंतकांना वरेच काही करता येण्यासारखे आहे.

आजच्या दलित साहित्यापुरताच विचार करावयाचा झाल्यास या साहित्यविचारात अनेक त्रुटी राहून गेल्या आहेत. व्यापक, वस्तुनिष्ठ चिकित्सेच्या दृष्टीने आवश्यक असलेली सामग्रीच या क्षेत्रात आज अस्तित्वात नाही. या सामग्रीची जुळवाजुळव, आखणी, मांडणी, पाहाणी विधायक पद्धतीने केल्यास त्यातूनच साहित्याच्या पुढील विचाराची दिशा सूचित होईल.[1] दलितांचा राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांचा विस्तृत पट सिद्ध झाल्यास दलित साहित्यविचारातील ढोवळ स्वागतपर्व संपून वस्तुनिष्ठ चिकित्सापर्व सुरू झाले असे आत्मविश्वासाने म्हणता येईल.

१. सोलापूर येथील दलित साहित्य संमेलनाचे अध्यक्षीय भाषण : १९८७.
२. 'दलित साहित्य : स्वरूप व भूमिका' (१९८६)

१. अलीकडेच उपलब्ध झालेला डॉ. हरिश्चंद्र निर्मळे यांचा 'दलितांची नियतकालिके' हा प्रबंध या दृष्टीने उपयुक्त ठरणारा. अशी अन्यही काही सामग्री इतस्तत: पडून राहिली असणे शक्य आहे शोधाची हीही एक दिशा.

□ □

## साभार स्वीकार

**कादंबरी**

**ठेविले अनंते** : दामोदर कानिटकर : साची प्रकाशन : पुणे २८ : १९८७ : रु. १५

# दलित मराठी कवितेतील विद्रोहाचे स्वरूप

प्रा. मधु जामकर



मराठी कवितेत विद्रोहाची तीन रूपे आढळतात. (१) संतप्त पिढीचा दिशा नसलेला आणि वांझोटा विद्रोह, (२) मार्क्सवादाने प्रभावित झालेला, विरोधावर आधारलेला व विकासाकडून नवसमाज निर्माण करणारा कृतिशील विद्रोह, (३) दलित कवितेतील व्यथेने व्यापलेला ज्वालाग्राही विद्रोह. यांपैकी नंतरचे दोन विद्रोह गेल्या दोन दशकातील कवितेत अधिक प्रमाणात दिसून येतात. हे दोन विद्रोह सामाजिक बांधिलकीचे मूल्य मानणारे आहेत. या कवींना नवे काही घडवायचे आहे आणि या प्रक्रियेत कविता अपरिहार्य आहे. आपले जगणे आणि कविता करणे त्यांना एकच वाटते. केशवसुतांच्या कवितेने अंतरंगी जे परिवर्तन घडवून आणले, त्यात सामाजिक जाणिवेचे मूल्य महत्त्वाचे होते. सामाजिक बांधिलकीची पहिली कविता केशवसुतांनी लिहिली आणि विद्रोही कवितेचा उगम झाला. पुढे मराठी कवितेत सामाजिक क्रांतीची तीव्र गरज अनंत काणेकरांसारख्या साम्यवादी प्रगतिशील कवीत दिसू लागली. कुसुमाग्रजांच्या क्रांतिपूजक गीतातून हाच प्रवाह दिसून आला. कांत, पोवळे यांची कविता याच वळणाची आहे. वर्गसंघर्ष, विरोध–विकासवाद यांसारख्या तत्त्वांवर श्रद्धा ठेवणारी वैफल्यग्रस्त मर्ढेकरी कविता व आशावादी शरश्चंद्र मुक्तिबोधांची कविता ह्या विद्रोही कवितेला फार मोठ्या देणग्या आहेत.

सारस्वतांच्या राज्यात गुन्हा करण्यासाठी नारायण सुर्वे यांनी मोठ्या जोशाने विद्रोही कविता 'तळपती तलवार' म्हणून लिहिली. या कवितेला सृजनात्मा माणसात गवसला. समाजशील मनाच्या कवीचा जीवनानुभव स्वतःची भाषा जवळची मानणारा व स्वतःची प्रतिमा आपल्याच जीवनातून घेणारा होता. कामगारांच्या व्यथांना वाचा फोडीत हे कविमन समाजसन्मुख होऊन अन्यायाची चीड व्यक्त करते. या कवितेने पूर्वापार संकेत मोडताना मध्यमवर्गीय जीवनातील पोकळपणाचा उपहास केला. व्यक्तिगत जीवनातील भावानुभवांनाही सामाजिक समस्यांच्या व्यथेची टोच दाखवून दिली. सुर्वे यांचा 'जाहीरनामा' पूर्वस्वीकृत सामाजिक जाणिवेचाच एक व्यापक प्रभाव आहे. ही कविता संघर्षाची, सूर्ययुगाची असल्याने तिला थांबणे माहीत नाही. या कवितेचे स्वरूप 'जे जाणवले, काळजात सलले, तेच शब्दरूप घेऊन बाहेर पडले' असे आहे. शिवाय या कवितेला 'युगाची साथ' असल्याने ती जितकी निषेधाची, तितकीच गतिमानतेची वाटते. सुर्व्यांच्या पुढील विद्रोही कवितेत वर्गीय जाणिवा सुटत नाहीत. त्यांचे विद्रोही मन 'कवितेच्या आड' येत नाही. याविषयी शंका व्यक्त करण्याइतकी ही कविता निष्ठेपेक्षा आव्हानात संक्रमित झाली आहे. या कवितेचे जे सामर्थ्य होते तेच मर्यादा होऊन प्रकट होते.

गेल्या दोन दशकात प्रामुख्याने दलित कविता विद्रोहाची कविता म्हणून पुढे आली. दलित कवितेतील विद्रोहाचे स्वरूप संकीर्ण नसून सरळ वाटेने प्रवास करणारे आहे. प्रस्थापितांच्या व्यवस्थेविरुद्ध जाणे ही या कवितेची वाट आहे. यामुळे या कवितेतून व्यक्त होणारा 'नकार' तिच्या आशयाचा फार मोठा भाग म्हणून व्यक्त होतो. आपल्या जीवनाचा एक संदर्भ घेऊन व प्रस्थापितांच्या क्रियेला प्रतिक्रिया म्हणून दलित कवी हा विद्रोह आपल्या कवितेतून व्यक्त करतात. या विद्रोहाला मानवतेचे एक मूल्यही दाखविले जाते. या विद्रोही कवितेचा विचार करताना त्याचे सामाजिक संदर्भ विचारात घेणे महत्त्वाचे आहे. परंतु विद्रोही कविता मूलतः कविता असल्याने तिने सामाजिक बांधिलकी महत्त्वाची मानावी की कलेची बांधिलकी महत्त्वाची मानावी? यातूनच मग या कवितेकडे साध्य–साधन या भूमिकेने बघणे महत्त्वाचे वाटते. विद्रोह जर एक प्रतिक्रिया म्हणून आलेला असेल, दलित जीवनातील सामाजिक संदर्भ घेऊन आलेला असेल, तर तो व्यक्तिनिरपेक्ष,

वाङ्‌मयनिष्ठ दृष्टिकोनातून आलेला असेल काय? शिवाय या कवितेला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारांचे फार मोठे पाठबळ असल्याने हा विद्रोह एका ठराविक विचारांचे ओझे घेऊन वाटचाल तर करीत नाही ना? विद्रोही कविता महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनातील अपूर्व घटना मानल्यास केवळ सामाजिक बांधिलकीने तिचे कौतुक करून चालेल काय? विद्रोह आणि आक्रोश यांचे फार जवळचे नाते असते आणि कुठल्याही कवितेला आक्रमक वृत्ती घातुक असते. त्या दृष्टीने विद्रोही कविता तपासता येईल काय? असे काही प्रश्न या कवितेच्या संदर्भात विचारता येतील.

दलित माणूस आणि दलित कवी या दोन भिन्न बाबी आहेत. हजारो वर्षे मूक राहिलेल्या दलितांच्या अंतःकरणातील व्यथा आणि वेदना, प्रक्षोभ आणि विद्रोह यांना दलित माणसाने आपल्या जीवनात अढळपणे ठेवले, तरी कवितेतून या बाबींचा प्रवास नेमका चुकलेला दिसतो. विद्रोही कवितेत दलित माणूस दिसतो, दलित कवी दिसत नाही. दलित कवितेने प्रस्थापित साहित्यशास्त्र नाकारले तरी मराठी काव्याची मूलभूत व्याख्या जाणून घेणे महत्त्वाचे वाटते. वर्डस्वर्थची Spontaneous overflow of powerful feelings या पूर्वार्धातील नुसत्या powerful feelings ला महत्त्व नाही, तर Spontaneous या शब्दालादेखील महत्त्व आहे. विद्रोही कवितेत केवळ powerful feelings दिसतात. या व्याख्येतील उत्तरार्ध जो Recollection in tranquility च्या विचारांचा तो येथे दिसतच नाही. याचे कारण दलित माणसाने दलित कवीवर केलेले आक्रमण हेच सांगता येईल. एकदा अशी भूमिका या कवितेने पक्की केली की, मग ती कविता साधन म्हणून पुढे येते. या संदर्भात कवी नामदेव ढसाळ यांनी 'मूर्ख म्हाताऱ्याने डोंगर हलवले' या संग्रहास दिलेली प्रस्तावना पाहाण्यासारखी आहे. ढसाळ लिहितात, 'मी माझ्या कवितेला वर्गीय हत्यार मानतो. आणि माझी कविता जेव्हा हत्याराची भूमिका घेते, तेव्हा माझ्यासमोर माझे शत्रू आणि मित्र अशी वर्गवारी करण्याची निकड निर्माण होते.' ढसाळांचे हे मत व्यासपीठावरून ऐकताना आकर्षक व आव्हानात्मक वाटेल, पण या मताने 'कवितेला पिळदार घाट येतो' याविषयी मात्र शंका वाटते. 'शब्द हे बंदुकीच्या गोळीप्रमाणे असतात. दिवाळीत शेंबड पोरगं जसं टिकल्याचं पिस्तूल वापरतं, तसे ते वापरायचे नसतात. ते वापरताना नेम धरायचा असतो. शत्रू, मित्र ओळखायचे असतात आणि मित्रांच्या बाजूने ते वापरायचे असतात.' ढसाळांना बंदुकीची गोळी आणि टिकल्याचे पिस्तूल यातील फरक ओळखता येतो तो महत्त्वाचा वाटतो. पण कवितेतील साध्य-साधन विचार ओळखणे कठीण वाटते, महत्त्वाचे वाटत नाही. अशी कविता रसिकाऐवजी मित्रच जवळ करते. यात विद्रोह नाही. ढसाळांना संवेदनशीलतेपेक्षा मैत्री अगत्याची वाटते.

दलित विद्रोही कवितेला चळवळीची जी पार्श्वभूमी आहे, तीदेखील अशीच गोंधळात पाडणारी आहे. अनेक गुंतागुंतीच्या सामाजिक भावभावना आणि प्रश्न या कवितेशी निगडीत केल्याने ललित वाङ्‌मय आणि मानवी जीवन यांचे जे परस्पर संबंध असतात, त्यापेक्षा वेगळे आणि म्हणूनच या वाङ्‌मयीन विचारणेत अडचणी करणारे झाले आहेत. दलित कविता ही प्रामुख्याने दलितांच्या लढ्यातून निर्माण झालेली असून, ती या लढ्याचे एक साधन झालेली आहे. कुठलेही साधन त्रिकालाबाधित सत्य सांगू शकत नसल्याने ते अक्षय राहू शकत नाही. काळाची गरज म्हणून या साधनाचे कौतुक केले जाते. गरज संपताच ते नामशेष होते. दलित संवेदना दलितांच्या लढ्याशी निगडीत झाल्यामुळे व याच भूमिकेचा दुराग्रह दलित कवीने मांडल्यामुळे ही कविता एकसुरी, आक्रोश दाखविणारी झाली. साहजिकच बोधवाद, प्रचारवाद तिच्यातून ऐकू येऊ लागला. आपल्या विचारांना पटलेली बंडखोरी ही कविता जीवनानुभवावर लादू लागली. याचा परिणाम असा झाला की, दलित कवी जीवनानुभवाची सोयीप्रमाणे हवी तशी मांडामांड करू लागले. ही कविता साहित्यात तात्कालिक उपयुक्तता निर्माण करते. जीवनात काही प्रश्न निर्माण करते. समग्र मानवी जीवन दाखवू शकत नाही. किंबहुना साहित्याला जीवनापासून दूरच घेऊन जाते.

विद्रोही कवितेने पारंपरिक साहित्य आणि साहित्यमूल्ये यांना जो नकार दिला आहे त्याचे स्वरूपदेखील समजणे कठीण आहे. दलितांनी जी साहित्यमूल्ये आपल्यापुढे ठेवली आहेत ती तरी प्रचलित मूल्यांपेक्षा वेगळी वाटतात काय? या संदर्भात डॉ. यशवंत मनोहर

यांची कविता तपासून पाहाणे महत्त्वाचे वाटते. ही कविता केशवसुत, चार्वाक, गौतमबुद्ध, आंबेडकर आणि मराठी संस्कृतीशी संवाद साधीत आपले स्वत्त्व टिकवून येते, तेव्हा तिने कुठली पारंपरिक मूल्ये धिक्कारलेली असतात ? नामदेव ढसाळ यांचा 'गोलपिटा' किंवा डॉ. यशवंत मनोहर यांचा 'उत्थानगुंफा' हे संग्रह कोणत्याही मूल्य कल्पनेच्या कसोटीने श्रेष्ठ ठरणारे आहेत. 'दु:ख रंगवून रंजन करणारे गुंजनवादी कुळ नाही माझे' असे जरी डॉ. मनोहर सांगत असले तरी त्यांचा 'निषेधनामा' प्रभावी भावना आणि चिंतनशीलता यांना ताजे आणि आवाहक रूप प्राप्त करून देतो. ही कविता 'येताना उत्तरे घेऊन आली, जाताना प्रश्न घेऊन निघून जाईल', परंतु तिचे शाश्वत स्वरूप मात्र 'अर्थपूर्ण चिंतनाचा झपाटा' निर्माण करीत जी पारंपरिक साहित्यमूल्ये आहेत त्यांशी संवाद करणारा राहील. ही कविता परंपरेशी विद्रोह न करता ती समजून घेत पुढे येते हे विशेष आहे. एक कविता म्हणून, एक उग्र, उत्कट चिंतन म्हणून तिचे स्वरूप एकाच वेळी पाहाता येते. अशा कवितेतील 'कटुभागाकार' रसिकतेच्या पातळीवर बेरजा करून जातात. आजच्या विद्रोही कवितेत अशा कवितेचे स्वरूप अपवाद म्हणून राहाते.

एरव्ही हा विद्रोह कोंडवाडा, नाकेबंदी, ऑडिट, सुरुंग या शीर्षकांचे वटवटीत स्वरूप म्हणून पुढे येतो. मूर्तिभंजन हे त्याचे एक उग्र रूप आहे. केशवसुतांनादेखील मूर्तिभंजन हवे होते, परंतु त्याचे स्वरूप 'मूर्ती फोडोनिया, देव जोडोनिया' या पद्धतीचे होते. आजची दलित कविता जेव्हा मोडतोड करू इच्छिते, तेव्हा तिच्यापुढे नव्या मूर्तीचे ध्येयधोरण राहात नाही. जुनी मूल्ये तुम्हीं जेव्हा नाकारता तेव्हा नवी मूल्ये तुमच्या हाताशी असली पाहिजेत. शिवाय या विद्रोही कवितेचे मूर्तिभंजन वास्तवाचे संदर्भ घेऊन प्रस्थापिताशी नकार देत आल्याने त्याचे स्वरूप बरेचसे तात्कालिक, प्रासंगिक झाले आहे. ते ज्या शैलीतून वक्तृत्वपूर्ण होते त्यातदेखील एक आक्रस्ताळेपणा आहे. मूर्तिभंजन जेव्हा आत्मपरीक्षणाऐवजी, चिंतनाशिवाय येते, तेव्हा त्याचे स्वरूप शब्दबंबाळ झालेले असते. उदा. म्हणून नामदेव ढसाळ यांची पुढील कविता पाहाता येईल :

माणसाने रस्ते उखनावेत ब्रिज उखडावेत
दिव्याचे खांब कलथावेत
पोलीस स्टेशने रेल्वे स्टेशने तोडावीत
बसेस ट्रेन कार गाड्या जाळाव्यात
साहित्यसंघ शाळा कॉलेज हॉस्पिटल विमान अड्डे
राजधान्या इमले झोपड्या खखखलेल्या भुकाळ वस्त्या
यावर हातबॉंब हैड्रोजन बॉंब टाकावेत.

ही यादी वरीच लांब देता येईल. परंतु तिने अंतर्मुखतेच्या सीमेपर्यंत जाता येईल काय हा प्रश्न महत्त्वाचा आहे. या दृष्टीने नारायण कुलकर्णी कवठेकर यांची 'गढी' ही कविता व त्र्यंबक सपकाळे यांची 'सुरुंग' ही कविता तुलना करून पाहाण्यासारखी आहे. कुलकर्णी यांची 'गढी' मोजक्या शब्दात नि:संदर्भपणे आपला अनुभव थेट वाचकांपर्यंत भिडवून देते, तर सपकाळे यांची 'सुरुंग' संदर्भाचे प्रयोजन घेऊन आपला भावानुभव भडक करून देते. दोघाही कवींना 'गढी' ची मोडतोड अभिप्रेत आहे, पण एकास चिंतनाद्वारे तर दुसऱ्यास शब्दाद्वारे, एवढेच.

विद्रोही कवितेतील मूर्तिभंजन जे वास्तवाचे संदर्भ घेऊन येते त्याला केवळ सामाजिक बांधिलकीचा भाग असतो. असे मूर्तिभंजन हे केवळ अभूतपूर्व वास्तवाच्या दर्शनाने अवतरत नाही. ते या वास्तवाच्या सखोल अर्थाचे अभिव्यंजक होत नाही. याचे कारण कलावंताजवळ जे एक सुविहित ताटस्थ्य असावे लागते, ते नसल्याने हे मूर्तिभंजन आणि वास्तव भावसमतोल व चिकित्सक दर्शन घडवू शकत नाही. या मूर्तिभंजनाच्या निमित्ताने या दलित कवींजवळ कलात्मक समज दिसून येत नाही, मात्र कलात्मक साहस दिसून येते. साहजिकच या मूर्तिभंजनाने या विद्रोहाचे स्वरूप स्थूल व एकपदरी झाले आहे. दलित कवींजवळील आत्मनिष्ठा नेहमीच वस्तुनिष्ठकडे कानाडोळा करीत असल्याने, सामाजिक जाणिवांचा चिकित्सक अभ्यास तिला अमान्य वाटतो. त्यामुळे मूर्तिभंजनाचा अर्थ व अर्थपूर्णता ही मननचिंतनपूर्वक ते जाणून घेत नाहीत. सामाजिक जाणिवांवर केवळ दावा सांगून त्यांचे वाङ्मयीन अर्थ व आधार सांगता येत नसतात. त्यासाठी एक चौफेर मन तयार करावे लागते, ज्यामुळे त्याची कलेशी सांगड घालता येते.

विद्रोही कवितेतील सामाजिक जाणिवांचे स्वरूप काहीसे साचेबंद होऊ लागल्याचे जाणवत आहे. याला एक कारण दलित कवींनी स्वीकारलेले डॉ. आंबेडकरांचे

सोयीनुसार तत्त्वज्ञान हे होय. मराठी साहित्याला म. गांधींचे तत्त्वज्ञानदेखील पेलले नाही. मराठी साहित्यातील गांधीवाद हा नेहमीच उपरा व व्याज-साहित्य निर्माण करणारा विभूतिपूजनात्मक झाला आहे. कुठल्याही कवितेला नव्हे, कलेला कुठलाच वाद कलेच्या माध्यमातून पचविता येत नाही. डॉ. आंबेडकरांनी दलित वर्गास अस्मिता दिली, जागे केले. आंबेडकरांचे विचार समजून घेणे वेगळे व हे विचार पचवून त्यातून आपले कलात्मक व्यक्तिमत्त्व घडविणे वेगळे. दलित कवींची गफलत नेमकी येथे होत असल्याने या कवितेचे आडाखे तयार होतात. या कवितेतून आंबेडकरांचे विचार दिसून येतात. या विचारांनी संपन्न झालेली, झपाटलेली कविता मात्र दिसून येत नाही. तीव्र प्रक्षोभक भावनात्मक प्रतिक्रियांपुरतेच तिचे क्षेत्र मर्यादित राहाते. विद्रोह, बंड, अगतिकता यांसारख्या ठराविक वर्गीकरणाने तिचा आशय सीमित होतो. यामुळे ही कविता केवळ स्थूल सामाजिक मनालाच सामोरी जाते. यातून बाहेर पडायचे असेल तर नव्या भावनानिष्ठ समतानतेकडे यावे लागेल. आज तरी असे नवे रूप दिसून येत नाही.

या विद्रोहाशी दलितांची वेदना निगडीत असल्याचे सांगितले जाते. परंतु ही वेदना आपल्या अनुभवाचे पृथगात्म रूप दाखविते का हा प्रश्न महत्त्वाचा आहे. दलित कवितेतील विद्रोहाचे, नकाराचे किंवा वेदनेचे स्वरूप पाहाता तें रोमँटिक क्रांतिवादाचे वाटते. या कविता सामाजिक जाणिवेच्या असून त्या सर्वसामान्य माणसांच्या उंचीच्याच वाटतात, यापलीकडे त्या जात नाहीत. त्यातील वेदना व्यक्तिगत वाटते. त्यातील औदासीन्य कुठल्याच स्फूर्तीचा, प्रेरकतेचा प्रत्यय आणून देत नाही. अशी कविता जीवनाला समग्रपणे सामोरी जात नाही. म्हणून तिचे रूप दलितच राहाते. प्रातिनिधिक होत नाही. अशा कवितेने नवोदितांवर तसेच प्रथितयशांवर परिणाम केला. कवितेचे वेगळेपण दाखवून दिले. मात्र ताजेपण दाखवून दिले नाही. या कवितेतील वेदना वास्तवाच्या संदर्भाखाली, प्रतिमांच्या ओझ्याखाली नेहमीच झाकलेली दिसते. या कवितेने छंदाच्या विविधतेची उपेक्षा केल्यामुळे, वक्तृत्वपूर्ण शैलीचा व गद्यप्राय संवादांचा स्वीकार केल्यामुळे तिचे स्वरूप केवळ आशयदृष्ट्या वेगळे झाले, व हा आशय अभिव्यक्तीपासून दुरावला गेला. या कवितेने मध्यमवर्गीय कविता ही खरी कविता असूच शकत नाही, फार तर ती औपचारिक कविता होऊ शकेल, असा एक स्वतःचा बांधील-साहित्यिक समज करून घेतला. परंतु पुढे अशाच कवींचा, कवितांचा एक मध्यमवर्ग तयार झाला व या कवितेचे ऐतिहासिक महत्त्व तेवढे शिल्लक राहिले. अलीकडे दलित साहित्यिक स्वतःच्या कोषातून बाहेर पडण्याची भाषा बोलतात, आत्मटीकेकडे डोळसपणे पाहू इच्छितात, व आत्मपरीक्षणाची गरज सांगतात. यामागे विद्रोह आणि नकार यातील कलात्मक सांगड ठिसूळ झाल्याची भूमिका आहे. वेदना जेव्हा संदर्भरहित असते, व्यक्तिनिरपेक्ष होते, तेव्हा ती आशयदृष्ट्या स्थिरकेंद्रित होत नाही. विद्रोही कविता गतिरुद्ध होत असल्याची भीती वाटते ती यामुळेच. वेदना जेव्हा माणसावरचा विश्वास डळमळीत करणारी रूपे दाखविण्याऐवजी त्याला जबाबदार असलेल्यांचा निषेध व्यक्त करू लागते, तेव्हा तिचे रूपांतर आरडाओरड करण्यात होते. यातूनच कवितेविषयीचे व्याजप्रश्न निर्माण होतात. कवितेच्या आस्वादाकडे याच भूमिकेतून पाहिले जाते.

दलित कवितेतील विद्रोहाला तात्कालिक संदर्भाचा फार मोठा आधार असल्याने त्यातील क्षोभाला विलक्षण धार आलेली दिसते. ही धार जितकी तीव्र तितकी आपली कविता श्रेष्ठ असे या कवींचे सोयीचे मत तयार झाले आहे. परंतु या कवितेतील तात्कालिक संदर्भ गळून पडले की त्यातील विद्रोह मागे पडतो. म्हणून या कवितेने माणुसकीकडे, मानवाच्या मूलभूत प्रवृत्तीकडे वळले पाहिजे. माणसाने माणूस म्हणून जगणे व इतरांना माणसासारखे जगू देणे हीच या कवितेची प्रेरणा झाली पाहिजे. संदर्भाने घेरलेल्या दुःखापेक्षा माणसाच्या मूलभूत वेदनेची, त्याच्या जगण्यासाठी चाललेल्या सनातन संघर्षांची जाणीव स्त्रीकारली पाहिजे. विद्रोह हे आपल्या कवितेचे एक अंग आहे, ते कलात्मक अंग नव्हे, आणि मूल्य म्हणून ते नाहीच नाही, यावर कटाक्ष ठेवणे निकडीचे आहे. माणसाकडे माणूस म्हणून पाहाणे व कवितेला कविता म्हणून स्वीकारणे याची सांगड घातली पाहिजे यामुळे विराट मानवता आणि अभिजात कला दिसून येईल. विद्रोही कविता यातूनच समृद्ध, समर्थ आणि अक्षय होऊ शकेल.



अनुक्रमणिका

मराठी नवकवितेने दुर्बोधतेविषयी असाच गदारोळ केला. आज दलित कवितेतील विद्रोहालादेखील असाच गुळगुळीतपणा आहे. विद्रोहाचे साचे, आवर्तन जसे या कवितेच्या पृथगात्मतेला मारक, तसेच समीक्षेच्या संदर्भात, अभिरुची, आस्वादाच्या संदर्भात ही कवितादेखील एक आराखडे बनवू लागली आहे. या कवितेचे पीक वारेमाप होऊन विद्रोह ही वृत्ती मराठी कवितेत सार्वत्रिक वावरू लागली आहे. यातून कवितेऐवजी कवितेची टूम बाहेर येते. कवितेच्या, अभिरुचीच्या आणि समीक्षेच्या क्षेत्रात प्रासंगिक वादळे होऊन अभिजाततेला पूर्णविराम मिळतो. कविता बाजूला राहून विद्रोह शिल्लक राहातो. म्हणूनच विद्रोह व्यक्त करणाऱ्या कवीला व ऐकणाऱ्या रसिकांना केशवसुतांचा सल्ला देऊन निखळ कवितेकडे पाहाणे महत्त्वाचे ठरते. तो सल्ला :

आम्ही नव्हतो आमचे बाप
उगाच का मग पश्चात्ताप ?

□ □

## – परिषदेचे नवीन आजीव सभासद –

(१ ऑगस्ट १९८७ ते १२ ऑक्टोबर १९८७)

**पुणे विभाग :** सौ. जयश्री शरद कारखानीस, सौ. अनुराधा रमेश मुंढे, सौ. भानुमती नारायण औटी, श्री. चंद्रकांत मारुतराव घुमाळ, सौ. अलका शांताराम आवळे, श्री. पोपटलाल रामचंद्र शहा, श्री. रवींद्र रसिकलाल शहा, सौ. सुरेखा भा. रिसबूड, श्री. मिलिंद प्रभाकर देशपांडे, कु. प्रा. समता वांदिवडेकर जुन्नर (पुणे), श्री. मधुकर का. मोंढे, लोणी-काळभोर (पुणे), राजीव सावडे, श्री. सुहास वामन जंगी, डॉ. वामन चोरघडे, सौ. वृषाली अरविंद कुलकर्णी (आळंदी देवाची), श्री. चंद्रशेखर कुलकर्णी, हडपसर.

**पुण्याबाहेरील :**

**सोलापूर विभाग :** श्री अनिल द. वाडेकर

**अहमदनगर :** श्री. रामभाऊ गणपतराव जगताप (नेवासे)

**कोल्हापूर विभाग :** सौ. मोहिनी मु. जोशी

**नाशिक विभाग :** प्रा. सौ. निशा पाटील

**धुळे विभाग :** श्री. वसंतराव वानखेडे, डॉ. अरविंद वाकसकर, श्री. वसंतराव शिरुडकर, डॉ. प्रभाकर जोशी, सौ. शोभना पाध्ये

**ठाणे विभाग :** श्री. राम गणेश कापसे (कल्याण), श्री. मधुकर प्रभाकर मडळेकर, श्री. शामराव नारायण कुलकर्णी, प्राचार्य श्री. पुरुषोत्तम दत्तात्रय कोडोलीकर (नवघर), रे. फा. एलायस बी. रॉड्रिक्स (वसई)

**रत्नागिरी विभाग :** श्री. शिवराम कदम

**मुंबई विभाग :** श्री. श्री. पु. भागवत, श्री. विश्वनाथ बापट

**मराठवाडा विभाग :** श्री. कौ. तो. ढालेपाटील (औरंगाबाद)

# दलितांची नियतकालिके

## डॉ. हरिश्चंद्र सि. निर्मळे

तलवारीपेक्षा विचाराचा आघात अधिक प्रखर असतो. तलवारीचा आघात शरीरावर, तर विचारांचा मनावर होतो. विचार समाजमनात परिवर्तन घडवून आणतो. समाजात परिवर्तन घडवून आणावयाचे असेल तर मानवी मनात विचारांची बीजें रुजविली पाहिजेत. ती रुजविण्याचे कार्य नियतकालिके अधिक समर्थपणें करीत असतात. कारण लोकमत अजमावण्याचे, त्याला जागृत करण्याचे, प्रसंगी प्रक्षुब्ध करण्याचेही सामर्थ्य नियतकालिकात असते. समाजात वैचारिक जागृती घडवून आणण्याच्या प्रमुख प्रेरणेतून नियतकालिके उदयास येत असतात. त्यामुळें समाजात जे अंतःप्रवाह वाहात असतात, त्यांचे नियतकालिके ही वैचारिक अग्रदूत असतात. स्वाभाविकच, समाजातील असत्य समजुतींच्या अंधःकाराचा नायनाट करून तेथे सम्यक् विचारांचा प्रकाशझोत टाकणे हा नियतकालिकांचा परमधर्म बनतो. नियतकालिकांच्या या प्रभावी सामर्थ्याचा उपयोग दलितांच्या चळवळीनेही करून घेतला.

मराठी भाषेतले पहिले नियतकालिक 'दर्पण' १८३२ साली सुरू झाले असले, तरी दलितांच्या सामाजिक जीवनाचे पुनरुत्थान घडवून आणण्याच्या भूमिकेतून दलितांचे पहिले नियतकालिक उदयास यावयाला १९०८ साल उजाडावे लागले. शिवराम जानवा कांबळे यांनी १ जुलै १९०८ रोजी 'सोमवंशीय मित्र' या मासिकाची पुण्यात स्थापना करून, सतत दोन वर्षे स्वसमाजात आत्मविश्वास व स्वाभिमानजागृतीचे कार्य केले. दुसरा प्रयत्न किसन फागू बनसोडे यांनी 'निराश्रित हिंद नागरिक' या साप्ताहिकाची नागपूरला स्थापना करून सबांधवांना आश्रय मिळविण्यासाठी आपली लेखणी यथाशक्ती झिजविली. १९२० पासून मात्र दलितांची अनेक नियतकालिके उदयास आली. मुंबई येथे स्वतः डॉ. आंबेडकरांनी ३१ जानेवारी १९२० रोजी 'मूकनायक' सुरू केले. वर्षानुवर्षे गुलामगिरी सहन करणाऱ्या समाजाचे नेतृत्व या पाक्षिकाने मोठ्या निर्धाराने स्वीकारले. फक्त घोलप आणि भटकर या संपादकद्वयाने योग्य ती साथ द्यायला हवी होती. याच वर्षी म. अ. गवई यांनी अमरावतीला 'बहिष्कृत भारत' हे मासिक सुरू केले. १९२४ साली तीन नियतकालिके उदयास आली. शिवराम जानवांनी 'आदि हिंदू' हे साप्ताहिक सुरू करून परत एकदा दलित जागृतीचा प्रयत्न केला. आणि मुंबईला म. अ. कांबळे आणि दा. ना. पटवर्धन यांनी अनुक्रमे 'आत्मोद्धार' (मासिक) व 'अस्पृश्यतानिवारण' (साप्ताहिक) सुरू केले. या तिहींनाही फारसे आयुष्य लाभले नाही. १९२६ साली कोल्हापुरात दा. म. शिर्के यांनी 'गरुड' या साप्ताहिकाची स्थापना करून सतत बावीस वर्षे बाबासाहेबांची विचारबीजे दलित समाजात रुजवून, गरुडझेप घेण्याचा प्रयत्न केला.

'मूकनायक' चा लायक संपादकांअभावी अस्त झाला आणि डॉ. आंबेडकरांनी स्वतःच संपादकीय सूत्रे हाती घेऊन ३ एप्रिल १९२७ रोजी 'बहिष्कृत भारत' हे पाक्षिक नव्या उमेदीने सुरू केले. त्यांच्याच नेतृत्वाखाली १९२८ साली 'समता' पाक्षिक सुरू झाले. त्याचे संपाकदत्व देवराव नाईक या पूर्वानुभवी संपादकाकडे देण्यात आले. मुंबईहून प्रकाशित होणारी ही नियतकालिके जिद्दीने कार्यरत राहिली. परंतु 'समता' ला एक वर्ष व 'बहिष्कृत भारत' ला तीन वर्षांहून अधिक आयुष्य लाभलें नाही. दरम्यान पुण्याला पां. ना. राजभोज यांनी 'दलितबंधू' ची स्थापना केली. वीस वर्षांचे आयुष्य लाभलेल्या या साप्ताहिकाने आंबेडकरांची विचारप्रणाली दलितांच्या मनात सतत तेवत ठेवली. दलितांची आत्यंतिक गरज लक्षात घेऊन आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली 'जनता' हे साप्ताहिक २४ नोव्हेंबर १९३० रोजी सुरू झाले. त्याच्या संपादकत्वाची धुरा सर्वश्री. देवराव नाईक, भा. र. कद्रेकर, गं. नी. सहस्रबुद्धे,

बी. सी. कांबळे, यशवंतराव आंबेडकर, सवादकर प्रभृतींनी निष्ठेने सांभाळली. सव्वीस वर्षांचे आयुष्य लाभलेल्या 'जनता' ने दलितांना मानवी मूल्यांची शिकवण दिली.

२ ऑगस्ट १९३० रोजी पतितपावनदासांनी 'पतितपावन' सुरू केले, तर १९३१ मध्ये कि. फा. बनसोड यांनी 'चोखामेळा' हे दुसरे साप्ताहिक सुरू केले. १ जून १९४१ रोजी धुळ्याला काकासाहेब बरवे यांनी 'दलित सेवक' हे मासिक सुरू केले. ते म. गांधींच्या विचारप्रणालीचा ठसा समाजावर वीस वर्षे उमटवीत राहिले. १९४७ मध्ये मा. ई. कुरणे यांनी कोल्हापूरला 'दलित निनाद', ना. खं. तिरपुडे यांनी नागपूरला 'अरुण', दि. मा. खैरकर यांनी जळगावला 'सिद्धार्थ', तर ध. रा. बिन्हाडे यांनी 'दलित भारत' या साप्ताहिकांची स्थापना केली. १९४८ मध्ये पुण्यात द. सा. गायकवाड यांनी 'जागृती', १९४९ मध्ये मुंबईला चंद्रकांत गायकवाड यांनी 'सिद्धार्थ', बडनेरा येथे सुरेश संसारे यांनी 'जयभीम', तर १९५० मध्ये मुंबईला आर. डी. भंडारे यांनी 'निर्धार' सुरू केले. या साऱ्याच साप्ताहिकांनी दलितांमध्ये वैचारिक जागृती घडवून आणण्याचा प्रयत्न केला. परंतु एक–दोन वर्षांपेक्षा अधिक ती जगू शकली नाहीत. दलितांच्या सामाजिक समस्यांचा विचार करणारी अनेक नियतकालिके १९५० नंतरही उदयास आली. मुंबईला नामदेव व्हटकर यांचे 'नजर' १९५१ साली सुरू झाले. वर्ध्याला १९५३–५४ साली अनुक्रमे भा. शी. वाभळे यांचे 'सिद्धार्थ' आणि धर्मदास मेश्राम यांचे 'जागृती' उदयास आले. १९५५ साली मुंबईला आडसूळ व रणपिसे यांचे 'भीमगर्जना' सुरू झाले आणि भैय्यासाहेब आंबेडकरांनी बाबासाहेबांच्या 'जनता' चे 'प्रबुद्ध भारत' असे नामकरण केले. नागपूरला सिद्धार्थकुमार यांचे 'धर्मदीप', र. म. मेश्राम यांचे 'बोधिसत्त्व' आणि स. म. मेश्राम यांचे 'बौद्धभारत' ही नियतकालिके १९५६ मध्ये सुरू झाली. परंतु या नियतकालिकांचे स्वरूप, उद्देश आणि कार्यही बदलत चालले होते. अलीकडे औरंगाबादहून प्रसिद्ध होणारे प्रागतिक विचार संसदेचे 'अस्मितादर्श' सोडले तर विशेष लक्षात घेण्यासारखी आज दलितांची नियतकालिके नाहीत असेच खेदाने म्हणावे लागेल.

डॉ. आंबेडकरांच्या नेतृत्वामुळे दलित चळवळीला १९२० पासून जोर चढला आणि आत्मोद्धाराचा मार्ग दाखविण्यासाठी दलितांच्या नियतकालिकांच्या संख्येतही भर पडत गेली. हिंदू धर्मातील चातुर्वर्ण्य, जातिव्यवस्था, दुष्ट रूढी आणि अनिष्ट चालीरीती यांनी दलितांना शतकानुशतके शैक्षणिक, आर्थिक आणि मानसिक गुलामगिरीत जखडून ठेवले होते. या गुलामगिरीत ते मूकपणे अपमान, अवहेलना, दास्य यांनी ग्रासलेले जीवन कंठीत होते. त्यांच्या व्यथा समाजाच्या वेशीवर टांगण्याचे आणि त्यांना त्यांच्या हक्कांसाठी, उन्नतीसाठी जागृत करण्याचे कार्य या नियतकालिकांनी हाती घेतले. हिंदू धर्मातील ब्राह्मण्याचा त्यांनी निषेध केला. दलितांच्या समस्यांची विविध अंगे, अन्यायावरील उपाययोजना आणि उन्नतीविषयक अनुकूल–प्रतिकूल मतांची चर्चा त्यांच्या रकान्यातून झाली. महाराष्ट्रभर चाललेल्या दलितांच्या चळवळींचे साद–पडसाद त्यातून उमटले.

इ. स. १९०८ ते १९५० यादरम्यानच्या या पंचवीसएक नियतकालिकांपैकी मोजक्याच नियतकालिकांना बऱ्यापैकी आयुष्य लाभले. त्यांपैकी 'बहिष्कृत भारत' (३ वर्षे), 'जनता' (२६ वर्षे), 'गरुड' (२० वर्षे), 'दलितबंधू' (२० वर्षे), 'दलितसेवक' (२७ वर्षे) ही प्रमुख होत. केवळ चारच नियतकालिके संस्थांमार्फत प्रकाशित झाली. बाकीची संपादकांच्या नेतृत्वाखाली निघत असत. केवळ एकाच व्यक्तीच्या आधाराने चाललेल्या नियतकालिकांना म्हणावे तेवढे आयुष्य लाभणे तसे कठीणच. आणि अशीच बहुसंख्य होती. तरीही स्वतःच्या खिशास तोशीस लावून नियतकालिके चालविणारे संपादक आणि केवळ स्वसमाजोन्नतीसाठी त्यांनी केलेला स्वार्थत्याग ही दलितांच्या नियतकालिकांच्या इतिहासातील गौरवपूर्ण घटना आहे. अशा संपादकांना धनवंतांचा, श्रीमंतांचा व वर्गणीदारांचा पाठिंबा असता तर एक–दोन वर्षातच अस्तंगत होण्याचे दुर्भाग्य त्यांच्या नियतकालिकांच्या नशिबी आले नसते. पण दलितांची ही नियतकालिके दलितांप्रमाणेच उपेक्षित राहिली. या नियतकालिकांचा तत्कालीन उच्चवर्णीयांना विटाळ होत असल्यास नवल नव्हते. मग 'मूकनायक' ची जाहिरात 'केसरी' ने देणे म्हणजे सवर्णांचा रोष पत्करून स्वतःचे वर्गणीदार बुद्ध्याच कमी करण्यासारखे नव्हते का?

पण जी काही नियतकालिके जगली, त्यातील लेखनाचा–विचारांचा दलितांच्या मनावर इतका जबरदस्त पगडा बसला की, तेंच त्यांना धर्मग्रंथ वाटले. यातील बव्हंशी संपादक आधी समाजसुधारक आहेत. त्यामुळे ते सांगतील ती पूर्व या न्यायाने आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली महाडचा सत्याग्रह होतो न होतो, तोच राजभोजांचा पर्वतीचा सत्याग्रह झाला. नाशिकच्या सत्याग्रहात या दोन नेत्यात फूट पडली, तरी ती तात्कालिक होती. आणि त्याचे कारणही, दूरान्वयाने का असेना, हिंदूंच्या दलितात फूट पाडण्याच्या वृत्तीत होते. पुढे अमरावती, मुखेड असे एकापाठोपाठ सत्याग्रह झाले. या सर्व सत्याग्रहांची सिद्धी व दलितांना प्रवृत्त करण्याचे कार्य या नियतकालिकांनीच केले. पण माणुसकीसाठी केलेल्या या सत्याग्रहांचे फलित रूप एवढेच की, दलितांच्या पदरात सवर्णांनी केवळ दगड–धोंडेच टाकले. आणि म्हणूनच दलितांनी सरकारकडे स्वतंत्र मतदारसंघाची मागणी केली.

या नियतकालिकांचे संपादन दलितात वैचारिक जागृती घडविण्याच्या प्रमुख उद्देशाने झाल्याने, त्यातून प्रकाशित झालेले वाङ्मय वैचारिकच असणे स्वाभाविक होते. लेख, अग्रलेख, स्फुटलेख, पत्रव्यवहार असे हे वैचारिक लेखन असे. लेखनाचे स्वरूप बव्हंशी निबंध वाङ्मयाचे आहे. या नियनकालिकांच्या लेखनाधारे पहिल्या निबंधकाराचा मान शिवराम जानबा कांबळे यांच्याकडे जातो. पण विद्रोही निबंधकाराच्या लेखनातील आग, आक्रमकता, बंडखोरी, आवेश आणि त्वेष शिवरामांच्या लेखनात नव्हता. या दृष्टीने विद्रोही लेखनाचा प्रणेता, समर्थ चिकित्सक आणि खंदा निबंधकार म्हणजे डॉ. आंबेडकर. सामाजिक अनुभवांच्या दाहकतेतून आकारलेले त्यांचे निबंध ज्वलज्जहाल होते. लोकहितवादी, आगरकर यांच्या लेखनाशी बरोबरी करणारे, किंबहुना स्पष्टता आणि परखडतेच्या दृष्टीने अधिक सरस होते. मराठी निबंध-वाङ्मयात अत्यंत मोलाची भर घालणाऱ्यांपैकी आंबेडकर हे स्वतंत्र बाण्याचे आणि व्यक्तिमत्त्वाचे यशस्वी निबंधकार होत, याची प्रचीती त्यांच्या ' मूकनायक ', ' बहिष्कृत भारत ' व ' जनता '-मधून लिहिलेल्या सुमारे १७५ निबंधांवरून येते. आंबेडकरांच्या या लेखनाचा परिणाम देवराव नाईक, कद्रेकर, राजभोज, माधव कुरणे, तिरपुडे, बी. सी. कांबळे आदि संपादक निबंधकारांवरही झाला. या निबंधकारांचेही अंतःकरण अस्पृश्यतेच्या वेदनांनी पिळवटून निघालेले होते. त्यामुळे त्यांच्या लेखनालाही एक प्रकारचा जळजळीतपणा आपोआपच प्राप्त झाला. बहुतेकांच्या लेखनात आक्रमकपणा होता. अन्याय, गुलामगिरी, अस्पृश्यता यांविरुद्ध ते नेहमीच आग ओकीत असत. आवेश आणि त्वेष यांनी परिपूर्ण असलेल्या निबंधांचे एक आगळे रूप येथे पाहावयास मिळते. अन्यायाबद्दलची चीड व सामाजिक हक्कांबाबतची पोटतिडीक हा त्यांचा मूलाधार आहे. यापैकी सवर्णांच्या मनात दलितांविषयी सहानुभूती निर्माण करण्याच्या उद्देशाने लिहिलेले काकासाहेब बरवे यांचे सुमारे दीडशे निबंध त्यांना दलितांविषयी वाटणाऱ्या आत्मीयतेची व कणवेची साक्ष देतात.

दलितांच्या जीवनाचे वास्तवदर्शी चित्रण करणाऱ्या अनेक नवोदितांच्या असंख्य कथा या नियतकालिकांनी प्रसिद्ध केल्या. अस्पृश्यतेचे दाहक चटके आणि वतनदारी यांमुळे वाट्याला येणाऱ्या अनैच्छिक पण अटळ मरणाला सामोऱ्या जाणाऱ्या अनेक नायकांपासून, स्वाभिमान जागृतीनंतर सत्याग्रहाचे रणशिंग फुंकणाऱ्या आणि शेवटी हवालदिलपणे माणुसकीसाठी धर्मांतर करणाऱ्या विविध नायक–नायिकांचे चित्रण या कथातून झाले. या दृष्टीने पहिला विद्रोही कथाकार म्हणून शरश्चंद्र पवार यांचा उल्लेख करावयास हवा. दलित स्त्रियांच्या जीवनातील व्यथा-वेदना आणि कारुण्य सांगणाऱ्या कथाही या नियतकालिकातून प्रसिद्ध झाल्या. विशेष म्हणजे यातील स्वानुभवांचे चित्रण अनेक स्त्रियांनी केले आणि ताराबाई डोंगरे, ताराबाई शेंडे, शारदाबाई चव्हाण यांना पहिल्या पिढीतील दलित कथालेखिका म्हणून प्रसिद्धी मिळाली. दलितांचे सामूहिक दुःख, त्यांचा दुबळेपणा, कायद्याचे संरक्षण मिळूनही त्यांचा होणारा कोंडमारा आणि त्यांच्याकडे पाहाण्याची सवर्णांची पूर्वग्रहदूषित दृष्टी या सर्वांचेच चित्रण या नियतकालिकातील कथाकार अत्यंत समर्थपणे करतात. त्यामध्ये प्रामुख्याने माधवराव बागल, दौलत जाधव, के. अ. घेगडे, गोविंद रामटेके, रामचंद्र बनसोडे, बळवंत सावंत आदींचा उल्लेख करता येईल. या सर्वांच्या कथा दीर्घ स्वरूपाच्या असल्या तरी, त्यांमधील दाहक अनुभूती मन पिळवटून काढते. अलीकडे वाचकांनी उत्स्फूर्त स्वागत केलेल्या



अनुक्रमणिका

'मरण स्वस्त होत आहे', 'वहिष्कृत' किंवा 'पुरुष' या कलाकृतीतून मांडल्या गेलेल्या विषयांची व समस्यांची चर्चा यापूर्वीच म्हणजे १९३५ ते ४० च्या दरम्यान या नियतकालिकातील कथातून झालेली आहे. दौलत जाधव, बी. नरेंद्र, अनंत सुतळे, बळवंत सावंत आदींच्या कथातील पात्रे बाबूराव बागुलांच्या कथातून नव्याने अवतीर्ण झालेली आहेत, तर शां. य. नांद्रे, गुं. पा. कांबळे, पगारे यांच्या कथातील पात्रांचे प्रातिनिधक रूप घेऊन 'वहिष्कृत' मधला अशोक इंगळे वावरताना दिसतो. 'पुरुष'मधील 'अंबू', बनसोडे यांच्या 'मतपरिवर्तनातील गूढ'मधील 'लता', 'अवोलीची वेणी'तील बकुळा किंवा संसारे यांची 'सुंदरा' या स्वतःच शस्त्र हाती घेऊन मदोन्मत्त पुरुषांना शिक्षा देणाऱ्या नायिकांच्या पार्श्वभूमीवर प्रत्यक्षच तपासून पाहाण्यासारख्या आहेत. या सर्वच कथातील नायक-नायिकांची भारतीय स्वातंत्र्यापूर्वीची बंडखोरी खरोखरच कौतुकास्पद होती. प्रस्तुत नियतकालिकातून प्रसिद्ध झालेल्या मोजक्या 'आई', 'प्रतिज्ञा' व 'परिस्थितीपालट' या तीनच धारावाही कादंबऱ्या अनुक्रमे कामगारांचे दारिद्र्य, दलितोद्धाराची चळवळ व मिश्रविवाह या सामाजिक समस्यांची चर्चा करतात. संघर्षाच्या या काळात कादंबरी प्रकाशनाला आवश्यक तेवढी उसंत या संपादकांना मिळणे शक्यही नव्हते.

प्रस्तुत नियतकालिकातील कवितेचे स्वरूप वैविध्यपूर्ण आहे. दलित जीवनाचे वास्तव दर्शन घडविणाऱ्या, सनातन्यांचा ढोंगीपणा, हिंदू धर्मातील अनिष्ट चालीरीतींचा समाचार घेऊन त्यावर सडेतोड अभिप्राय नोंदविणाऱ्या, सत्याग्रहाचा इशारा देणाऱ्या आणि निर्भय, धडाडी, स्वाभिमानी सत्याग्रहींचे अभिनंदन करणाऱ्या, सवर्णांच्या दास्यातून मुक्त होण्यासाठी धर्मांतराचा संदेश देणाऱ्या आणि डॉ.आंबेडकर, राजर्षि शाहूमहाराज, सयाजीराव गायकवाड आदि दलितोद्धारकांचे कौतुक व गुणगौरव करणाऱ्या अशा अनेकविध विषयांवर या कविता आधारित आहेत. त्यांचे विषय वेगळे असले तरी त्यांमधील आशय व सूर एकच आहे. या कवितात एका व्यक्तीच्या दुःखापेक्षा दलितांचे सामूहिक दुःख आहे. ते या कवितेला चव्हाटयावर मांडावयाचे आहे. त्यामुळे ही कविता साऱ्या दलितांचीच वेदना बनून आकाराला येते. दलितांना जागृत करून त्यांना क्रांतिप्रवण करणाऱ्या या कवितांना क्रांतिगीतांचे स्वरूप प्राप्त झाले आहे. या कविता लिहिणारे बळवंत वराळे, बाळानंद विटेकर, चिंतामण साळवे, चांगदेव मोहिते, गुंडो कांबळे, भामगरे, शांताकांत, शेखर, राजा पैठणकर आदि कवी निर्भय आणि निधडे आहेत. ते मानवी जीवनाला तुच्छ मानीत नाहीत, तर ते माणसाला या जीवनातील माणूसपण प्राप्त करून देण्यासाठी आकाश-पाताळ एक करतात. केवळ कलात्मकतेच्या स्वप्निल मनोराज्यात रमण्याची या कवींची प्रकृतीच नव्हती. आज नावारूपाला आलेल्या विद्रोही कवितेची पाळेमुळे प्रस्तुत कवींच्या कवितात खोलवर रुजलेली आहेत. प्रस्तुत नियतकालिकात 'वियोग' हे एकच विहरगीत प्रसिद्ध झाले. अशा प्रेमगीतांचाही पुरवठा या नियतकालिकांना होत असला तरी त्यांनी ते प्रसिद्ध करण्याचा मोह टाळला. कारण दलितोद्धार हेच आद्य कर्तव्य मानणाऱ्या संपादकांना तारुण्यसुलभ प्रेम हे जीवनातील अंतिम ध्येय वाटणे शक्य नव्हते.

प्रस्तुत नियतकालिकातील वैचारिक, ललित आणि संकीर्ण या तिन्ही प्रकारच्या माध्यमातून दलितांनी आपल्या व्यथा-वेदना निःसंकोचपणे व्यक्त केल्या. अशा प्रसंगी त्यांनी वाङ्मयगुण, उपमा-अलंकार किंवा लेखनशैली या बाबींचा विचार कधी केला नाही. परंतु ओघाने किंवा लिहिण्याच्या भरात सहजासहजी, विनासायास काही उपमा-अलंकार त्यातून आले. याचे कारणही एवढेच : नुकत्याच लेखन करू लागलेल्या या नवोदितांनी स्वीकारलेली प्रस्थापितांची अनुकरणप्रियता. यातील प्रारंभीच्या कवितांचे यमकबद्ध रचनेचे गमकही यातच आहे. कवितेसाठी कविता यापेक्षाही आपली व्यथा मांडण्यासाठी कविता अशी या कवींची प्रधान भूमिका आहे. आवेश, प्रक्षोभ यांची अभिव्यक्ती आणि त्यातून साधलेली समाजजागृती हे तिचे ध्येय लक्षात घेतले म्हणजे अनुकरणात्मक, वर्णनात्मक, प्रचारकी आणि भावनांची भडक अभिव्यक्ती असे तिचे सहजसुलभ स्वरूप आढळल्यास आश्चर्य वाटण्याचे काहीच कारण नाही. नियतकालिकांचे माध्यम हाती पडताच दलित लेखक खूप लिहू लागला. अशी अपूर्व संधी त्याला कधीच मिळाली नव्हती. म्हणूनच आपल्या आंतरिक वेदना, विद्रोह व नकार या सर्व भाव-भावना त्याने संधी मिळेल तिथे आपल्या भाषेत व्यक्त केल्या. त्याची ही भाषा साधी,

सोपी आणि सरळ, पण तितकीच स्पष्ट आहे. परिचित शब्दातच त्याने भावना चित्रित केल्या. त्यासाठी शब्दावडंबर माजविणे किंवा पर्यायी शब्दांचा शोध घेणे त्याला मान्य नव्हते. भाषा हे केवळ भावनाभिव्यक्तीचे एक साधन एवढीच त्याची भूमिका होती. साहित्यातील कलात्मकतेचा विचार करण्याचे त्याला कारणच नव्हते. या नियतकालिकातून दलितांच्या वेदना स्पृश्य कवी-लेखकांनीही चित्रित केल्या. त्यामध्ये तुकाराम पुरोहित, राजा पैठणकर, सो. सा. जोशी, दी. ध. संचेती, गंगूबाई वैद्य, मालती चव्हाण, शं. व. भोसले आदींचा समावेश करता येईल. इतकेच काय, माधवराव बागल, सोपानदेव चौधरी, ग. दि. माडगूळकर यांचेही सुरुवातीचे लेखन याच नियतकालिकातून प्रथम प्रकाशित झाले.

दलित कथा, कविता, कादंबरी, नाटक, आत्मकथा, चरित्र आणि दलित साहित्य-समीक्षा अशा वाङ्मयप्रकारांचे वेगळेपण आज मान्यता पावले आहे. या साहित्याची सुरुवात इ. स. १९६० पासून मानली जाते. अनेक विचारवंत आणि समीक्षक अजूनही अज्ञानाने कशी चुकीची विधाने करतात याची ही साक्ष आहे. या साहित्याचा प्रवाह १९६० पासून जोरदारपणे, स्वतंत्रपणे वाहू लागला असला तरी त्याअगोदर या नियतकालिकातून निबंध, कथा, कवितेच्या रूपाने छोटे-मोठे झरे वाहू लागले होते. फक्त ते आजच्या वाचकांच्या दृष्टोत्पत्तीस आले नाहीत एवढेच. एका अर्थी आजच्या विद्रोही साहित्याची ही पूर्वावस्था होती.

या नियतकालिकांची अतिमहत्त्वाची फलनिष्पत्ती म्हणजे दलितांना मानवी धर्माची मूल्ये गवसली, जो त्यांना कधी माहीतही नव्हती. मी गुलाम नाही, अस्पृश्य नाही, तर स्पृश्य माणसांसारखा मीही एक माणूस आहे, मलाही मन आहे, भावभावना आहेत, माझ्याही मनात काही सलते आहे, ते मी व्यक्त केलेच पाहिजे; माणुसकीचे न्याय्य हक्क आणि समाजजीवनातील प्रतिष्ठा मलाही मिळाली पाहिजे; आता उपेक्षा आणि तिरस्कार मी सहन करणार नाही; याची जाणीव दलितांना सर्वप्रथम कुणी करून दिली असेल तर ती या नियतकालिकांनी. ही नियतकालिके म्हणजे आंबेडकरांचे प्रतिध्वनी होते. दारिद्र्य, उपासमार आणि अस्पृश्यता यांनी गांजलेल्या प्रत्येक झोपडीत आता ज्ञानाचा सूर्य उगवतो आहे. नवविचारांचा हातबाँब घेऊन फिरणारा प्रत्येक दलित आता सनातनी धर्मग्रंथांना आणि देवदेवळांना उध्वस्त करू पाहातो आहे. आजतागायत विनातक्रार भोगलेल्या यातना आठवून अश्रू ढाळीत बसण्यापेक्षा संघटित होऊन नव्या उमेदीने आणि जिद्दीने उज्ज्वल भविष्याची स्वप्ने दलित आता रंगवितो आहे. समतेचे निशाण हाती घेऊना दलित जनता सम्यक् क्रांतीचे नेतृत्व करते आहे.

इ. स. १९५० ते १९८६ या कालावधीत दलितांची सुमारे शंभराहून अधिक नियतकालिके निघाली. यांपैकी बरीच अ-नियतकालिके आहेत. अस्मितादर्श, निकाय, सुगावा, अस्तित्व, मुक्ती, संसद, जातक, प्रतिभादर्श अशा काही मोजक्या नियतकालिकांचा अपवाद वगळता मराठी हरिजन, लोकजागृती, प्रभा, निर्धार, सेवक, नजर, भारतभूषण, भीमवाणी, जयभीम, भीमचक्र, भीमगर्जना, भीमयुग, धर्मदीप, धर्मयान, धर्मदूत, बोधिसत्त्व, बौद्धभारत, सिद्धार्थ, संबोधि, पंचशील, प्रज्ञानंद, प्रमेय, प्रज्ञा, सारथी, नागसेन, पूजा, प्रबुद्ध भारत, प्रबुद्ध आंबेडकर, लोकमित्र, रिपब्लिक, नवधारा, मानवी समता, संग्राम विजय, लोकभाव, लोकलढा, आम्रपाली, बहुमत यांसारखी अनेक अ-नियतकालिके महाराष्ट्रभर विखुरलेली पाहावयास मिळतात. आपापल्या परिसरात त्यांनी अंगीकारलेले स्वसमाजोन्नतीचे कार्य महत्त्वपूर्ण असेच आहे. पण दलित समाज, त्याची चळवळ, त्यातील निष्ठावंत धुरीण आणि विचारवंत या सर्वांचीच अवस्था दिशाहीन बनत चालली आहे. १२ मार्च १९६१ रोजी पुण्यात भरलेल्या 'महाराष्ट्र दलित साहित्य परिषदे'ने आपले नामाभिधान बदलून 'महाराष्ट्र बौद्ध साहित्य परिषद' असे ठेवले. त्यामुळे ज्यांनी धर्मांतर केलेले नव्हते त्यांनी आपले एक 'दलित साहित्य संमेलन' स्वतंत्रपणे भरवावयास सुरुवात केली. तिकडे मराठवाड्यात एक 'अस्मितादर्श' हा साहित्यिकांचा मेळावाही स्वतंत्रपणे एकत्र येऊ लागला. गेल्या सप्टेंबर १९८६ पासून वैजापूर येथील 'संत रोहिदास समाज मंडळा'-तर्फे 'चर्मकार साहित्य मेळावा' भरू लागला आहे. या विविध संस्थांची आणि संघांची विविध मुखपत्रे आकाराला आणि नावारूपालाही येत आहेत. या संस्थांचे परिणाम दलितांच्या सर्वच नियतकालिकांवर होत आहेत. त्यांचे पडसादही त्यातून उमटत आहेत. तरीही आपापल्या परीने ती निष्ठेने कार्यरत आहेत, हेच सध्या तरी दलितांचे आणि नवबौद्धांचेही भाग्यच म्हणावयास हवे. □



अनुक्रमणिका

# दलित नाटक व रंगभूमी

प्रा. दत्ता भगत

स्वतंत्र भारताच्या पहिल्या मंत्रिमंडळात बाबासाहेबांचा समावेश झाला. घटना-समितीचे अध्यक्षपदही त्यांना मिळाले. दलितांसाठी बाबासाहेबांना जे जे हवे होते त्यासाठी आवश्यक त्या कायदेशीर तरतुदी करण्यात त्यांना यश मिळाले. व्यावसायिक शिक्षण, नोकऱ्या आणि राजकारण ह्या तिन्ही क्षेत्रात दलितांना राखीव जागा मिळाल्या. अस्पृश्यतानिवारणाचा कायदा अस्तित्वात आला. एक माणूस-एक मत ह्या न्यायामुळे सत्तेत सहभागी होण्याची संधी मिळाली आणि समाजात समतायुगाचा आरंभ झाला. दलित चळवळीने अर्धी लढाई जिंकली.

परिणामी आमचे जलसेकार समाधानाने सुखावले. स्वातंत्र्य-सैनिक सुखावले तसे जयंती आणि धर्मचक्रप्रवर्तनाच्या कार्यक्रमात ते रमू लागले. जलशाची पोकळी त्यांनी गायनाच्या कार्यक्रमांनी भरून काढली. बाबासाहेबांच्या चळवळीतला कार्यकर्तासुद्धा ह्या सीमेवर थोडासा सुखावला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत तो उतरला. काही कार्यकर्ते कामगार चळवळीशी जोडले गेले. इथे जलशाची आवश्यकता होती. शाहीर अमरशेख आणि अण्णाभाऊ साठे ह्यांनी जलसा कलापथकाच्या स्वरूपात जागवला.

आंबेडकरी विचारांचे वहन म्हणून जन्मास आलेला जलसा स्वातंत्र्योत्तर काळात काहीसा क्षीण झाला. पण आंबेडकरांचे अनुयायी आंबेडकरी विचारांपासून दूर जात आहेत हे लक्षात आल्यावरोबर गायनाकडे वळलेल्या जलसेकारांनी आपल्या गीतांच्या माध्यमातून आग ओकायला सुरुवात केली. एकीच्या संदेशासाठी रान उठविले. बाबासाहेबांच्या अनुयायांच्या मनावर जमा झालेली आळसाची राख फुंकून देऊन त्यांच्या आतल्या तप्त इंगळाला जागविण्याचे उद्योग केले. वामनदादा कर्डक अशा शाहिरांचे आणि जलसेकारांचे प्रतिनिधित्व करणारे एकांडे शिलेदार आहेत.

१९६०–६५ च्या सीमेवर बाबासाहेबांचा तरुण अनुयायी प्रौढतेकडे झुकला. १९४७ साली जन्मलेला दलित तारुण्यात पदार्पण करीत होता. ह्या दोन्ही पिढ्यांना सभोवतीचे सामाजिक वास्तव खूपच जाचक वाटू लागले. हिंदू माणसाच्या परंपराप्रिय अशा दुटप्पीपणाची आच दोन्ही पिढ्यांना जाणवू लागली. सत्तेतला वाटा राखीवपुरता मर्यादित म्हणून निष्प्रभ आहे हे लक्षात येऊ लागले. दलित नेता अनुयायांकडे वळला. अनुयायांच्या स्पर्धेत हळूहळू तो लाचारीकडे वळला. इकडे नित्य व्यवहारामध्ये विषम वागणूक देणारा माणूस समता-चळवळीच्या रेट्याने थोडा जागरूक झाला होता. विषमतेच्या जाहीर समर्थनामुळे आपण प्रतिगामी ठरू या भीतीपोटी व्यवहारातला परंपरावाद त्याने आपल्या मनात बंद केला. पण याच प्रतिमेचा सत्तास्पर्धेत उपयोग होतो हे लक्षात आल्यावर परंपरावादाचा उपयोग तो अत्यंत कौशल्याने करू लागला. दलितांचा शत्रू अदृश्य रूपात वावरू लागला.

कायदा अनुकूल आहे, शासन सवलती देण्यास वचनबद्ध आहे आणि अवतीभोवतीचा समाजही दलितांच्या हक्कांना तोंडी मान्यताच देतो आहे, मग विषमता का? दलित तरुणांच्या मनात असंतोषाचा डोंब उसळू लागला. व्यवहारातली विषमता पुढे-मागे केव्हा तरी जाईल, कायद्यावर दलितांनी समाधान मानावे, असे हिंदू माणसाला वाटू लागले. पण त्याऐवजी दलित आपल्या परंपरांना खिजवतो आहे याची चीड हिंदू माणसाच्या मनात निर्माण होऊ लागली. शत्रू तर दिसू नये आणि दगडांचा वर्षाव तर चोहोंबाजूंनी व्हावा अशा एका विलक्षण अवस्थेत तरुण दलित सापडला. या तरुण दलिताचे भांडण एका बाजूला तडजोड करणाऱ्या प्रौढ दलिताबरोबर सुरू झाले, तर दुसऱ्या बाजूला वर्णव्यवस्था पुन्हा स्थिर होऊ पाहाणाऱ्या परंपरावाद्यांशी सुरू झाले. ह्यातूनच पँथर्सचा उदय झाला. माझे मित्र दीर्घ



अनुक्रमणिका

सपकाळे यांनी 'जरा कळ काढा थोडी' ह्या कवितेत जणू पँथर्सचेच जातक सांगितले आहे. पँथर्सच्या उदयाची मीमांसा एवढ्याचसाठी की, दलित कवितेच्या जडण-घडणीत पँथर्सचा फार मोठा वाटा होता हे आपल्या लक्षात यावे.

इकडे हा दलित तरुण शाळेत आणि महाविद्यालयात शिक्षण घेत होता. ज्या साहित्याचा तो क्रमिक पुस्तका-तून अभ्यास करीत होता, त्यात त्याला त्याचे चित्र कुठेच जाणवत नव्हते. आपण देव मानीत नाही, पण क्रमिक पुस्तकात मात्र, 'अजाण आम्ही तुझी लेकरे'. आपण अंधश्रद्धा सोडली तर इथे अंधश्रद्धेचे पोषण कर-णारे घडे. चातुर्वर्ण्य आम्ही निषेधार्ह मानले, पण इथे तर चातुर्वर्ण्याचे समर्थन असणारे ग्रंथ साहित्य म्हणून अभ्यासायचे.

क्रमिक पुस्तकाच्या बाहेर जाऊन वाचन करावे म्हटले तर तिथेही तेच. एवढा मोठा चवदार तळ्याचा प्रसंग, काळा राम मंदिराचा सत्याग्रह आणि सहा लाख दलितांचे एकाच मैदानात धर्मांतर! पण कुठे एखाद्या कवीच्या संवेदनक्षम मनावर एखादा नाजूक तरी तरंग निर्माण झाला का? ·

परंपरागत साहित्याला त्यातल्या विषमतेच्या समर्थनासह आदर्श मानण्याची सक्ती. दलितांच्या चित्रणाचा अभाव असणाऱ्या मराठी वाङ्मयाला आपले म्हटले पाहिजे ही सारस्वतपुत्रांची अपेक्षा आणि प्रत्यक्ष वर्तमान जीवनात होणारा कोंडमारा ह्यामुळे दलित कवितेत विद्रोह जन्म घेतो. ही कविताच दलित साहित्यातल्या सर्व वाङ्मयप्रकारांचे उगमाचे ठिकाण आहे. ह्या विद्रोहाच्या बुडाशी एक जीवघेणी वेदना आहे. 'मी कोण?' जगातल्या सर्वच अमर साहित्याच्या मुळाशी असलेला हा प्रश्न. पण दलितांसाठी किती वेगळ्या संदर्भात! डॉ. भालचंद्र फडके ह्यांनी समग्र दलित साहित्याच्या विश्वाचा परीघ वेदना आणि विद्रोह ह्या दोन अचूक विंदूत पकडला आहे. 'आवर्ता'तला मनोहर अखेरचे निवेदन करतो : तो म्हणतो —

द। 'आज बोलणार आहे मी न्यायमूर्ती! युगायुगा-
ती द वाहाणाऱ्या माझ्या रक्तातील गाजेला आज
आंबेडकत शब्दांचे घुमारे. न्यायमूर्ती, मी आहे तुमच्या
अस्पृश्यता।ची मर्यादा ओलांडणारा पापी शंबुक. माझंच
ानाचा सू५
ेऊन फिरणारा



तपोवल तुमच्यासाठी पापाचं मूळस्थान ठरलं. शक्य असूनही सीतेच्या मर्जीविरुद्ध कधीच न वागणारा, चौदा चौकड्यांचं राज्य असलेला, अधिपति दशानन मीच आहे. स्वर्गाची एकेक पायरी चढून जाताना गळून गेले सर्व. उरला एकटा युधिष्ठिर. अळचा पडलेल्या कुत्र्याला पाहून त्याचे डोळे पाणावले. नाही दिसलं त्याला कधी बंधुभावासाठी टाहो फोडणाऱ्या सूर्यपुत्राचं रक्त, जे वाहताहे माझ्या नसानसातून.'

मी कोण? इतिहासातले माझे कोण? वर्तमानातले माझे सहप्रवासी कोण? माझे वेगळेपण कशात आहे? माझ्या अस्तित्वाचे नेमके स्वरूप कोणते? माझे स्वत्व कशात आहे? हेच चिरंतन प्रश्न दलित कवी, कथाकार आणि आत्मकथाकारांसमोर आहेत. दलित नाटक-कारांच्या लेखनामागचा मूळ झरा हाच आहे. यालाच वेगळ्या भाषेत 'आत्मशोध' म्हणता येईल. या आत्म-शोधाचे कारण आंबेडकरी विचार आहे याबाबत आपल्या मनात कुठेही संदेह राहाता कामा नये.

हे प्रश्न दलितांच्या मनात निर्माण झाले ते दलितांच्या लढ्यामुळे. आणि लढ्यातून दारे-खिडक्या बंद करून आपणच आपल्या कोषात गुरफटून घेऊन स्वतःला विचारलेले हे प्रश्न नाहीत. आयात केलेल्या विचारांच्या बौद्धिक मंथनातून हे प्रश्न निर्माण झालेले नाहीत, तर जीवनाचा गुंता सोडवताना निर्माण झालेले हे प्रश्न आहेत. भोगाच्या भागाकारातून उरलेली शिल्लक म्हणजे हे प्रश्न आहेत. जगण्याच्या दणकट जिद्दीमुळे सोसाव्या लागणाऱ्या यातनांमधून जन्मलेले हे प्रश्न आहेत. म्हणूनच इथे अनुभवाचा जिवंतपणा आहे.

ह्या अनुभवाचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे ह्यात आढळून येणारा सामाजिक संदर्भ. हा संदर्भ आणावयाचा म्हणून आलेला नाही. तो अटळ आहे. दलित अनुभवाच्या आविष्काराचा कॅन्व्हास समाज आणि संस्कृती आहे. सुप्त मनातली विकृती नव्हे किंवा आयात करण्यात आलेली 'जगण्याची सक्ती' ही नव्हे. हा साहित्याचा हिणकसपणा नव्हे, सकसपणाच होय.

स्वत्वाचा हा शोध दलित साहित्याचा आणि रंग-भूमीचा मूलाधार आहे. ह्या शोधाचा संदर्भ जात आणि चातुर्वर्ण्य ह्यावर आधारलेला समाज आहे. हा शोध घेण्याची प्रेरणा आम्हाला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दिली. ही प्रेरणा घेऊन आम्ही कृतिप्रवण झालो की

अनुक्रमणिका






चळवळ जन्माला येते, आणि ह्या शोधातून जन्माला येणारे ठसठसते दुःख शब्दात ओतले म्हणजे साहित्य जन्माला येते. आयु. राजा ढाले ह्यांनी मासमूव्हमेंट संघटनेचे बोधचिन्ह निवडताना लेखणी आणि तलवार ह्या दोन आयुधांचा गतीच्या संदर्भात किती अर्थपूर्ण वापर केला आहे ! बाबासाहेब एकदा म्हणाले होते, 'मला इंजिनिअर्स हवेत, डॉक्टर्स हवेत, वकील हवेत, आणि सर्वात जास्त निकड मला साहित्यिकांची आहे. ती उणीव भरून काढण्यासाठी वेळ लागेल, पण धर्मधारणा करण्यासाठी मला साहित्यिकांची अत्यंत जरुरी भासेल.' शासन आणि प्रशासन ह्यांच्या सहस्र हातांच्या कवेतही कधीच न येऊ न शकणारा मानवी जीवनाचा एक भाग आहे. तो म्हणजे माणसाचे मन. पण प्रतिभाशाली लेखकाच्या तळव्याहूनही लहान असणाऱ्या हृदयाला मात्र माणसाचे हे मन घडवता येते, वाढवता येते, तोडताही येते, आणि जोडताही येते. ह्या हृदयात हे सामर्थ्य निर्माण होते 'करुणे' मुळे. बाबासाहेबांच्या डोळ्यांसमोरची धर्मधारणा ह्या करुणेवरच उभी आहे.

सारांश, आंबेडकरी विचार आत्मसात केल्यामुळे प्राप्त होणाऱ्या जीवनविषयक दृष्टिकोनाच्या आधारे स्वतःला आणि स्वतःभोवतीच्या वास्तवाला जाणून घेण्याच्या उत्कट इच्छाशक्तीचा शब्दरूप आविष्कार म्हणजे दलित नाटक. दलित नाटक आंबेडकरी विचारांच्या प्रचारासाठी जन्मले नाही, तर आंबेडकरी विचाराच्या साक्षात्कारासाठी जन्मले आहे. आंबेडकरी विचारांची चळवळ हे आमच्या जीवनाचे ईप्सित आहे. आंबेडकरी साहित्य हे ह्या चळवळीचे अपरिहार्य असे फलित आहे. आंबेडकरी चळवळीपासून हे साहित्य वेगळे करण्याचा प्रयत्न केला तर ते सुकून जाईल. दलित नाटकातला जिवंतपणा ह्या चळवळीमुळे आणि चळवळीतून जन्मलेला आहे. पण त्याचा आस्वाद सर्वच समाजाला डोळस करणारा आहे. म्हणून हे नाटक सार्वभौम आहे. त्याचे हे सार्वभौमत्व आपणाला जपायला हवे. अशी ही आमची दलित रंगभूमी आमच्या जिवंतपणाचे, सुसंस्कृततेचे, वेदनेचे, व्यथेचे आणि उद्याच्या स्वप्नांचेही भारमापक आहे. लढा दलित देत आहेत तो केवळ दलितांना मुक्त करण्यासाठी नाही. दलितांना, बिगरदलितांना, सर्व माणसांनाच मुक्त करण्यासाठी ! माणसांचा एक गट गुलाम करून नव्हे तर माणसाला गुलाम करणाऱ्या सर्वच व्यवस्थांना मोडीत काढून अशा चळवळीत शस्त्र म्हणून केवळ रंगभूमीचा वापर करणे बरोबर नाही.

ह्या विवेचनाला अधिक सुस्पष्ट करण्यासाठी मी काही प्रश्न विचारणार आहे. माझे मित्र डॉ. चंद्रकांत शिरोळे यांनी सांगावे : 'स्मारक' ह्या नाटकातल्या मास्तरच्या मनाचे प्रयोजन काय ? ते पात्र वजा केले तर नाटकाचे काय होईल ? माझे मित्र मधू गायकवाड 'म्युलॅटो' नाटकातल्या बर्टची भूमिका अत्यंत तडफेने करतात. कर्नल नॉरवुडने त्याला खरे म्हणजे काय कमी केलेले असते ? मग सगळे काही असूनही बर्टची तडफड कशासाठी ? नॉरवुड त्याला बरोबरीची वागणूक द्यायला तयार नव्हता का ? काय कमी होते बर्टमध्ये ? ह्या शोधातूनच तर आपण त्याच्या दुःखापर्यंत पोहोचतो. बर्टची मागणी न्याय्य असूनही कोणाने का थरारून उठावे ? विजया शिरोळेंनी ह्या प्रश्नाचे उत्तर द्यावे. 'थांबा, रामराज्य येतंय' आपण पाहिलं असेल. त्यात अखेर पोतराज म्हणतो : 'तू त्या देवमानसाला वाचवलं हाईस. तू खरी माय न्हवंस ?' असे म्हणून देवीपूजेच्या बंधनातून मोकळा होणारा पोतराज कसा अभिनय करतो हे जगन्नाथ भिगारे ह्यांनी सांगावे आणि त्याने तो तसाच का करावा हे नाट्य-दिग्दर्शक प्रकाश त्रिभुवन ह्यांनी सांगावे. खोबणीतले डोळे काढून घेतल्यानंतर अखेरच्या श्वासापर्यंत 'जयभीम' असा उच्चार करीत राहाणारे 'काळोखाच्या गर्भात' ह्या नाटकातले पात्र काय सुचविते ? जगायचे तर ताठपणे जगावे हा आणि एवढाच आंबेडकरी संदेश देते की, मूल्यासाठी ताठपणे जगणाऱ्याला एवढी जबर किंमत मोजावीच लागते आणि त्यातच माणसाच्या जीविताची धन्यताही असते हा परिणाम नाटककाराला साधायचा आहे ? ह्या प्रश्नाचे उत्तर अविनाश आंबेडकरांनी द्यावे किंवा टेक्सास गायकवाडांनी द्यावे.

अशा या दलित रंगभूमीवरचा 'युगयात्रा' हा एक दुवा आहे. प्राचार्य चिटणीस यांच्या 'युगयात्रा' या नाटकाआधी शंभर वर्षे दलित नाटक नाही. नाते आहे ते १८५५ मधील 'तृतीय रत्न' या नाटकाशी. आणि युगयात्रा या नाटकानंतर जवळपास १०-१५ वर्षे चाचपडणे. पण १९७० नंतर मात्र महाराष्ट्रात एकाच वेळी अगदी कानाकोपऱ्यातून दलित रंगभूमी दीर्घ

झोपेतून जागी व्हावी तशी जागी होते.

'तृतीय रत्न' आणि 'युगयात्रा' या दोन नाटकांमध्ये सवर्णांनी दलितांच्या प्रश्नावर लिहिलेली १०–१२ नाटके आहेत. कोल्हटकरांचे 'मूकनायक', सावरकरांचे 'उःशाप' ही त्यातली काही उदाहरणे होत. सावरकरांनी 'चोखोबा' चा प्रश्न जात किंवा वर्णव्यवस्थेच्या संदर्भात पाहिला नाही. तो राष्ट्रवादाच्या संदर्भात पाहिला. कोल्हटकर हे सुधारक होते. फुल्यांचा अपवाद वगळल्यास सर्व सुधारकांनी आपल्या देशातील जातींचा नेहमीच एक परिशिष्ट म्हणून विचार केला आहे. कोल्हटकर याला अपवाद नाहीत.

इथे केवळ दलितेतर नाटककारांच्याच बाबतीत नाही, तर एकूणच सुधारणावादाबाबत मला जरा वेगळे सांगायचे आहे. ह्या देशात बोलके सुधारक आणि कर्ते सुधारक असे दोन गट होते असे मला वाटत नाही. मला एक गट अशा सुधारकांचा दिसतो, ज्यांनी वर्णव्यवस्थेचा धिक्कार केला, तर दुसरा गट असा दिसतो, ज्यांनी जात आणि वर्ण ह्याविषयीच्या कन्सेप्टस् बदलून वर्णव्यवस्थेला धक्का न देता सुधारणा सांगितल्या. मला पहिल्या गटात बुद्ध दिसतात, बसव दिसतात, गुरु गोविंद दिसतात आणि अगदी अलीकडे म. फुले, आगरकर आणि आंबेडकर दिसतात. दुसऱ्या गटात आद्य शंकराचार्य, वारकरी संत, स्वामी दयानंद सरस्वती, गांधी आणि सावरकर दिसतात. जात आणि वर्णव्यवस्थेचा धिक्कार करीत ज्यांनी सुधारणा घडवून आणण्याचे उद्योग केले त्यांच्या शक्तीचा संकोच होत होत अशा अनुयायांचा एक लहानसा गट तेवढा समाजात शिल्लक राहिला, ज्यांची वाट चुकली नाही, पण शक्तीच मर्यादित झाली. दुसऱ्या गटाने आपल्या विचारांशी परंपरा सुसंगत करून घेण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न मात्र लोकप्रिय झाला. सुधारणेचा रथ थोडा पुढे सरकला. पण ह्या पद्धतीत परंपरावाद्यांची एक नकळत सोय झाली. त्यामुळे नेत्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या त्यांच्या अनुयायांनी विचारांशी परंपरा सुसंगत करून घेण्याऐवजी आपल्याला आवडणाऱ्या परंपरेला आधुनिक विचारांचे अधिष्ठान शोधायला सुरुवात केली. गांधी–आंबेडकरांच्या विरोधाचे खरे ठिकाण हे आहे असे मला वाटते. मी हा फरक एवढ्याचसाठी सांगितला की, बव्हंशी दलितेतर साहित्यिकांचा दलितविषयक अनुभव ह्या ठिकाणी दलित संवेदनशीलतेच्या विरुद्ध जातो असे मला वाटते.

ह्याच काळात दलितांनीही दलित विषयावर नाटके लिहिली आहेत. आयु. तांबे ह्यांचे 'प्रेमप्रताप' अर्थात 'म्हाराची सून', नामदेव व्हटकरांचे 'वाट चुकली', मा. आ. कारंडे ह्यांचे 'संगीत जयबौद्ध', अण्णाभाऊ साठ्यांचे 'अकलेची गोष्ट' अशी काही उदाहरणे सांगता येतील. विदर्भात तर दीनबंधू नाटककार म्हणूनच ओळखले जातात. ज्ञानेश्वरी विद्यालय, लातूर, ह्या शाळेतील सिरसाटगुरुजींनी आतापर्यंत नाही म्हटले तरी २०–२५ नाटके सादर केली आहेत. बारकाईने शोध घेतला तर आणखी अनेक नावे पुढे येतील.

ह्या मंडळींच्या डोळ्यांसमोर आदर्श म्हणून जलसा नाही. देवल-गडकरी यांचे नाटक कितीही प्रभावी असले तरी ग्रामीण प्रेक्षकांच्या मनाची पकड घेईल याची खात्री नाही. ह्या प्रेक्षकाला हवे घटनाप्रधान नाटक. म्हणून या नाटकाचे नाते कौटुंबिक नाटकाच्या परंपरेशी आहे. बोधात्मक परिणाम हा या नाटकांचा हेतू आहे. 'नरबळी', 'काळोखाच्या गर्भात' किंवा 'तनमाजोरी' या नाटकात जो स्पष्ट विद्रोह जाणवतो तो इथे फारसा जाणवत नाही.

पण या काळात नागपूरच्या प्रयत्नाकडे वेगळ्या दृष्टीनें पाहावे लागते. धनवटे रंगमंदिरात महाबोधि सोसायटीचे वाचनालय चालायचे त्या काळात डॉ. एम. बी. नियोगी यांची तरुणांपुढे बौद्धिके होत असत. सीताबर्डीच्या आनंदनगरमधील अनेक तरुण ही बौद्धिके ऐकण्यासाठी इथे येत असत. त्यातल्याच एका प्रभाकर जीवने या नावाच्या तरुणाने 'बुद्धलीला सारसंग्रह' या कोसंबींच्या ग्रंथाधारे 'चांडालिका' नावाचे नृत्य-नाटक लिहिले आणि सादर केले. 'जगाच्या कल्याणा' या नावाचे तीन अंकी नाटक लिहिले. कोरेगावच्या विजयस्तंभाची हकीकत त्यावेळच्या विविधवृत्तात आलेली होती, त्याआधारें एक नाटिका लिहिली. प्रभाकर जीवने यांनी हाताळलेले विषय लक्षात घेतले म्हणजे या नाटकाचा मूलाधार आंबेडकरी बंडखोर विचार असावा हे चटकन् लक्षात येते. महाराष्ट्रातल्या सुप्रसिद्ध विदुषी सौ. कुमुद पावडे, प्रसिद्ध संशोधक वसंत मून या नाटकांमधून काम करीत असत. जयंत वैरागडे, तुळशीदास तिरपुडे, शिवशंकर जीवने ही त्यावेळी काम

करणाऱ्या आणखी काही कलावंतांची नावे होत. ही नाटके १९५०. ते ५५ च्या दरम्यान झाली.

१९८४–८५ चा महाराष्ट्रातल्या रंगभूमीचा आढावा सुभाष इनामदारांनी घेतला आहे. त्यात त्यांनी वर्षभरात आलेली हिट आणि हॉट नाटकांची संख्या (नवीन) चाळीस सांगितली आहे, करमणूक करणाऱ्या नाटकांची संख्या नऊ सांगितली आहे, आणि दर्जेदार नाटकांची संख्या नऊ सांगितली आहे. वर्षभरातल्या जवळपास ५८ नवीन नाटकात केवळ तीन नाटके वर्तमान जीवनाच्या समस्या मांडणारी. त्यातही 'तांदूळ निवडता निवडता' विनोदी पद्धतीने जाणारे. तेव्हा 'वाडा चिरेबंदी' आणि 'पडघम' ही केवळ दोन नाटके वर्तमानातल्या प्रश्नांना गांभीर्याने हात घालणारी. ह्या एवढ्या भांडवलावर आमची मराठी रंगभूमी अखिल भारतीय आहे असे फक्त आपणच म्हणू धजावे! कामगार रंगभूमी, नागर–अनागर नाट्यस्पर्धा आणि दलित रंगभूमी ह्यांचा उल्लेखही न करता जे अ. भा. मराठी रंगभूमीचा आढावा सादर करू शकतात त्यांच्या आत्मकेंद्रित्वाला आणि अल्पसंतुष्टपणाला दुरूनच जयभीम करणे चांगले!

दलित रंगभूमीची चर्चा खूप होतेय, नाटके मात्र नाहीत, ही तक्रार जिज्ञासेपोटी आहे असे गृहीत धरतो. माझ्या माहितीप्रमाणे मुंबई, पुणे, नगर, नासिक, नांदेड, औरंगाबाद, अकोला, अमरावती, चंद्रपूर, नागपूर ह्या मोठ्या शहरातून, तर संगमनेर, जामखेड, आष्टी, आंबेजोगाई या लहानशा गावांमधून दलित रंगभूमी चळवळीच्या रूपात अस्तित्वात आहे. पुण्याच्या रंगभूमीने 'काळोखाच्या गर्भात', 'जळवा', 'देशाचे मानकरी', 'झाडाझडती' इत्यादी महत्त्वाची नाटके सादर केली आहेत. 'पिसाळलेली भुते' हे बालनाट्य सादर केले आहे. आयु. भि. शि. शिंदे, टेक्सास गायकवाड, प्रकाश खुडे, शिल्पा मुंथीसकर इत्यादी कलावंत या संस्थेचे आधारस्तंभ आहेत.

या संस्थेचे मुखपत्र 'दलित रंगभूमी' यांच नावाने प्रसिद्ध होत असून नवनव्या नाटककारांचा शोध ही संस्था घेत आहे. रमेश गायकवाड आणि शांतीराजा गायकवाड हे दोन नावे घेण्याजोगे लेखक या व्यासपीठामुळे पुढे आले आहेत.

'साक्षीपूरम्' हे नाटक लिहिणारे रामनाथ चव्हाण, 'पोतराज' सादर करणारे पुण्याच्या प्रतिभा थिएटर्सचे संपत जाधव आणि रमेश शिंदे, बालनाट्य सादर करणारे सूर्यकांत तावडे, अण्णाभाऊ रंगमंचाचे वसंत लोटे हे सर्व कलावंत दलित रंगभूमीच्या चळवळीला लोकांपर्यंत पोहोचविण्याचे काम करीत आहेत. पुण्याच्या या चळवळीने दलित नाटकांचा एक स्वतःचा असा प्रेक्षक निर्माण केलेला आहे.

मुंबईचे प्रेमानंद गज्वी आता व्यावसायिक रंगभूमीवर उतरले आहेत. 'तनमाजोरी' नाटक नाना पाटेकरांच्या भूमिकेमुळे अत्यंत लोकप्रिय होत आहे. 'देवनवरी'ला नाट्यस्पर्धेत अनेक पारितोषिके मिळाली आहेत. 'घोटभर पाणी' या एकांकिका संग्रहाला राजमान्यता मिळाली आहे. माझ्या माहितीप्रमाणे अलीकडच्या काळात ज्याच्या एकांकिकेचे हजारो प्रयोग झाले असतील असा प्रेमानंद गज्वी ह्यांच्याशिवाय दुसरा नाटककार नसावा. अगदी अलीकडे 'संबोधि' संस्थेचे जगदीश मोरे, दाटे आणि भोसले हे कार्यकर्ते दलित नाटकांच्या निर्मितीकडे वळले आहेत.

कथाकथन करणाऱ्या आघाडीच्या लेखकांमध्ये आज वामन होवाळांचे नाव घेतले जाते. त्यांच्या कथनात एकपात्री नाट्य असते. त्याचे कारण वामनरावांची सुरुवात नाटकापासून झाली आहे. शाहीर अमरशेखांच्या कलापथकाने 'जपून पेरा बेणं', 'नाम्या म्हणे मी उपाशी' आणि 'आंधळ्याची वरात' ही त्यांची वगनाट्ये खूपच गाजविली. शेवटच्या दोन नाट्यांचे अनुक्रमे 'उपोषण' आणि 'वसुली' ह्या दोन नावांनी ते कथन करीत असतात. वगनाट्यातील विनोद हा मुख्यतः उपहासावर उभा असतो. होवाळांच्या कथनात उपहासाबरोबरच पात्रांच्या वर्तनातील विसंगतीचेही दर्शन होत राहाते. हे सामर्थ्य घेऊन ते नाटकाकडे वळले तर दलित रंगभूमीला एक निराळे वळण मिळेल याची मला खात्री आहे. नाशिकच्या हिंदुस्थान एरोनॉटिक्स रिक्रिएशन क्लबच्या वतीने आणि आता 'उन्मेष' ही स्वतंत्र नाट्यसंस्था निर्माण करून आयु. एम. जी. वाघ लेखक आणि दिग्दर्शक म्हणून पुढे येत आहेत. 'मृगजळ', 'शरण मी बुद्धाला', 'वणवा', 'बंडलबाज', 'भूमिहीन' अशी त्यांनी लिहिलेल्या आणि दिग्दर्शित केलेल्या नाटकांची नावे आहेत. जोशी–अभ्यंकर खून खटल्यातले आरोपी आमच्या न्यायसंस्थेला दोषी आढळतात, त्यांना

शिक्षा होते, पण दलितांचे खून करणारे अनेक आरोपी मात्र निर्दोष सुटतात, असे का? ह्या प्रश्नाने अस्वस्थ होणाऱ्या नायकाची व्यथा 'भूमिहीन' या नाटकात येते. 'अथं मनुस जगनं हं' या नाटकाचे सहदिग्दर्शक आयु. भगवान हिरे हे एक गुणी कलावंत आहेत. 'सोन्याचा दात नसलेला कर्ण' ह्या नावाचे एक नाटक लिहून ते आता लेखनाच्या क्षेत्रात उतरले आहेत. अरुणकुमार इंगळे यांनी लिहिलेले आणि सोलापूरच्या 'प्रज्ञा' रंगमंचाच्या वतीने सादर होणारे रेवण शावादे दिग्दर्शित 'काय रं' हे नाटक प्रेक्षकांना दलित अन्यायाचा एक जळजळीत अनुभव देऊ शकते. कुलदीप धुमाळे यांनी लिहिलेला आणि जामखेडच्या सिद्धार्थ साळव्यांनी दिग्दर्शित केलेला 'सूडाचा खेळ' मी पाहिला आहे. तो अजून विसरलो नाही.

संगमनेरच्या 'नवनिर्माण' संस्थेचे संस्थापक चंद्रकांत पवार हे स्वतः लेखक, दिग्दर्शक आणि अभिनेतेही आहेत. आजचा सुशिक्षित दलित एका बाजूला पांढरपेशा मनोवृत्तीने आणि दुसऱ्या बाजूला जुनाट अंधश्रद्धांच्या अनुकरणाने चुकीच्या मार्गावर चाललेला आहे, असे मध्यवर्ती सूत्र घेऊन त्यांनी 'डेंजर्स अँड व्हाइट सर्कल' या नावाचे नाटक सादर केले आहे. ह्याशिवाय 'आकांत', 'आक्रोश' आणि 'वड' ह्या एकांकिकाही त्यांनी सादर केल्या आहेत. संगमनेरच्याच डॉ. सोमनाथ मुटकुळयांनी 'संग्राम' थिएटर्सची स्थापना करून 'शापित' ही एकांकिका नुकतीच सादर केली आहे.

अमरावतीचा 'विप्लवी नाट्यमंच' दोनच वर्षांपूर्वी स्थापन झालेला आहे. प्रा. बी. रंगराव हे ह्या नाट्यमंचाचे आधारस्तंभ आहेत. शहरी दलितांच्या प्रश्नांवर त्यांनी 'शहर' हे पथनाट्य सादर केले आहे, तर शंबुकाच्या मुक्तीची कथा 'शंबुक' ह्याच नावाने सादर केली आहे. सत्येश्वर मोरे, वसंत शेंडे, संजय खडसे ही तरुण मंडळी नामांतर दंगलीवर आधारित 'सूर्यासक्त' हे नाटक सादर करीत आहेत. हेमचंद्र खोब्रागडे ह्यांनी 'विसाव्या शतकावर' आणि 'कालचक्र' ही त्यांची दोन नाटके वल्लारशा नाट्यस्पर्धेत सादर करून बक्षिसे मिळविली आहेत. 'अंधाऱ्या सावल्या' आणि 'विध्वंसक माणसे' ह्या त्यांच्या दोन एकांकिका.

नागपूर हे दलितांच्या सांस्कृतिक चळवळीचे प्रमुख केंद्र आहे. कमलाकर डहाट, इ. मो. नारनवरे, अमर रामटेके, प्रभाकर दुपारे, विलास पाटील, सौ. कमल अडकिणे, कमलाकर वनसोडे ही १९६५ नंतर रंगभूमीच्या क्षेत्रात उतरलेली मंडळी. 'पँथर्स थिएटर', 'मुक्तकला नाट्यसंस्था', 'नवचैतन्य रंगमंच' अशी काही इथल्या संस्थांची नावे सांगता येतील. प्रभाकर दुपारे आणि त्यांचे मित्र माझ्या माहितीप्रमाणे गेल्या दहा वर्षांपासून पथनाट्याच्या चळवळीत आहेत. १९५० च्या सुमारास नाटके सादर करणाऱ्या आनंदपुऱ्यातील मंडळींशी ह्या तरुणांचा सांधा नसावा असे मला वाटते. दलितांच्या तरुण मनांवर पँथर्सचा पुरेसा प्रभाव होता. प्रभाकर दुपारे ह्यांचे 'उत्सव' आणि 'साता समुद्रापलीकडे' ह्या दोन्ही पुस्तकातील लेखन पँथर्सच्या विचाराने प्रभावित आहे. इ. मो. नारनवरे ह्यांची 'विद्रोहाचे पाणी पेटले आहे' ही एकांकिका 'दलित रंगभूमी' ह्या पुस्तकात आता समाविष्ट करण्यात आली आहे. 'आमचं ते नाटक नसतंच साहेब. आमचं असतं ते जीवन. कलेतून सादर होणारं खरंखुरं जीवन. बघायचं असेल तर आपण याच.' असे सांगणारा नाटकातला लेखक म्हणजे जणू स्वतः इ. मो. नारनवरेच.

कुणाला अतिशयोक्ती वाटेल, पण १९६०–६५ च्या सुमाराला साहित्याच्या क्षेत्रात अवतरलेल्या ह्या दलित वाङ्मयीन प्रवृत्तीचे उगमस्थान औरंगाबाद आहे ही एक वस्तुस्थिती आहे. औरंगाबाद हे दलितांच्या सर्व सांस्कृतिक चळवळींचे ऊर्जा केंद्र आहे असे माझे मत आहे.

मिलिंद महाविद्यालयातील 'बोधिमंडळ' हा अलीकडच्या काळातला दलित रंगभूमीचा उगमबिंदू आहे. ह्याच मंडळाने १९५५ मध्ये प्राचार्य चिटणीसांचे 'युगयात्रा' हे नाटक सादर केले. 'तृतीयरत्न' ह्या नाटकाशी बरोबर शंभर वर्षांनंतर 'युगयात्रा' ह्या नाटकाने आपले आशयात्मक नाते जोडले. युगांयुगांपासून चालत आलेली दलितांच्या मुक्तीची यात्रा हे या नाटकाचे मध्यवर्ती सूत्र. दलित थिएटरचे प्रमुख मार्गदर्शक प्रा. त्र्यंबक महाजन आणि आज न्यायमूर्ती असणारे भालचंद्र वैराळे हे त्या नाटकातले कलावंत, डॉ. म. ना. वानखेडे दिग्दर्शक, डॉ. भालचंद्र फडके नभोवक्ता, आणि प्रेक्षकात स्वतः बाबासाहेब! दलित रंगभूमीच्या इतिहासातला हा अत्यंत महत्त्वाचा नव्हे, तर सोनेरी क्षण होय. सहा लाख प्रेक्षकांसमोर सादर झालेले मराठीतले

पहिले नाटक.

प्रा. अविनाश डोळस, प्रा. साहेबराव गायकवाड, प्रा. तुपार मोरे, प्रा. मनोहर त्रिसाठे, प्रा. रायमाने, प्रकाश त्रिभुवन, प्रा. प्रभाकर शिरोळे, सौ. विजया शिरोळे, आयु. पंढरी घनघाव, प्रा. अशोक गायकवाड, प्रा. व्ही. डी. गायकवाड आणि नगर येथील नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष आयु. मधू गायकवाड ही औरंगाबादच्या दलित थिएटर्सची करतीसवरती माणसे आहेत. प्रकाश त्रिभुवन यांनी लिहून अविनाश डोळस यांनी दिग्दर्शित केलेल्या 'थांबा, रामराज्य येतंय' ह्या नाटकाने तर थेट दिल्लीपर्यंत धडक दिलीय. 'आठवणींचे पक्षी', 'आवर्त', 'सत्यमेव जयते', 'गाव नसलेला गाव' अशी एकाहून एक सरस निर्मिती दलित थिएटरने दिलीय. अविनाश डोळसने 'अस्तित्व' चे संपादन करून स्वतः काही एकांकिका त्यात प्रसिद्ध केल्या आहेत. 'म्यूलँटो' च्या निमित्ताने निग्रो थिएटरचा मराठी रंगभूमीला परिचय करून देण्याचे फार मोलाचे काम दलित थिएटरने केले आहे. माझ्या 'आवर्त' च्या प्रसिद्धीत दलित थिएटरचा वाटा फार मोलाचा आहे. पहिले दलित नाट्यसंमेलन सुरू होण्यापूर्वी दलित थिएटरने सुप्रसिद्ध कलावंत निळू फुले ह्यांच्या उपस्थितीत दलित नाटकांचा एक महोत्सव घेतला होता. आमच्या नाट्यसंमेलनाचे मूळ इथेच असावे असे मला वाटते.

उत्कृष्ट गायक नट प्रा. विजयकुमार गवई आता नाट्यलेखनाच्या क्षेत्रात उतरले आहेत. प्रा. रुस्तुम अचलखांब ह्या 'गावकी' च्या लेखकाने सादर केलेली 'कैफियत' चर्चेचा विषय झालेली होती. प्रा. भगवान सवई यांच्या 'मरण वरात' ला पाहाताना रसिक दिङ्मूढ झाले होते. प्रा. करुण भगत आणि प्रा. सुखराम हिवराळे हे दोन्ही कलावंत नाट्यस्पर्धेत आपले वेगळेपण दाखविणारे म्हणून प्रसिद्ध. प्रा. रामदास कांबळे यांनी धनगरी स्मरण थोडेसे पुसून सजवून 'सुंबरान मांडलं'. कृष्णा किरवले याच मार्गाने निघालेत. डॉ. कमलाकर गंगावणे यांनी दलित रंगभूमी अत्यंत कष्टाने हिंदीत नेली. प्रा. प्रभाकर गणवीरांनी प्रथमच दलित रंगभूमीचा आढावा लिहिला, ज्याचा संदर्भ सगळेच समीक्षक आजपर्यंत घेत आले आहेत. भाऊ भगत, राम दोतोंडे, जळगावचे आकाशवाणी केंद्र संचालक भगवान भटकर, प्रा. कोचुरे इत्यादी नवी-जुनी कलावंत मंडळी संस्काराने मूळची औरंगाबादची आहेत.

'स्मारक' ह्या सुप्रसिद्ध नाटकाचे संवाद लेखक कुमार देशमुख मिलिंदच्या मुशीतले नसले तरी त्यांचे नाटकातले काउंटर पार्ट डॉ. चंद्रकांत शिरोळे हे मिलिंद परिवारातलेच. आणि 'स्मारक' हे नाटक ज्या मूळ दीर्घ कवितेवर उभे आहे त्या कवितेचे कवी प्राचार्य गजमल माळी हे मिलिंद संस्कारातले आहेत. युवक चळवळीतून पुढे आलेले प्रा. सुधीर गव्हाणे यांच्या 'धर्मांतर' नाटकाचो अखेर वगळता हे नाटक दलित जाणिवेच्या जास्तीत जास्त जवळ गेलेले आहे.

डॉ. गंगाधर पानतावणे, योगीराज वाघमारे, दया पवार, वामन होवाळ हे अन्य वाङ्मय प्रकारांमध्ये लेखन करणारे लेखक, पण अधूनमधून यांनी नाट्यवाङ्मय हा प्रकार हाताळला आहे. डॉ. गंगाधर पानतावणे यांनी अत्यंत मोजक्याच पण अगदी सकस अशा एकांकिका लिहिल्या आहेत. माझ्या एकांकिकांच्या घडणीत त्यांच्याशी केलेल्या चर्चांचा मला फार उपयोग झाला आहे. योगीराज वाघमारे यांची 'अगा जे घडलेचि नाही' ही एकांकिका 'दलित रंगभूमी' या पुस्तकात समाविष्ट आहे.

नांदेडच्या वैशाली नाट्य मंडळाचे शेगराव कसबे आणि माणिक अटकोरे, सेलूचे प्रा. यादव गायकवाड, आर्णीचे ह. सु. भगत, अंवाडीचे दीपक ठमके, 'ग्रामराक्षस' नाटिकेचे लेखक खुशाल कांबळे, उमरी जहागीरचे प्रा. परशुराम गिमेकर, थिएटर अकादमीने सन्मानित केलेले मुंबईचे संजय पवार, अशा किती तरी नवनवीन लेखकांची नावे मला माहीत आहेत. केवळ विस्तारभयास्तव मी ही यादी इथे थांबवतो.

सारांश, दलित रंगभूमीवर भरपूर लेखन चालू आहे. ह्या रंगभूमीचा सांधा वर्तमानाशी आहे. कारण हे नाटक दलितांच्या वर्तमान चळवळीतून जन्माला येत आहे. चळवळ जन्मदात्री असल्यामुळे इथे हाडाचा जिवंतपणा आहे. तसा हा जिवंतपणा इथल्या मातीतून उगवलेला आहे. त्यामुळे ही रंगभूमी रूढ तंत्राचीही मोडतोड करते. रूढ संकेतांचेही भंजन करते. दुःख टोकदार करण्यातून कधी वक्तृत्वाचा तर कधी आवेशाचा आधार घेते. दुःखाची उत्कटता व्यक्त करण्यासाठी हे नाटक कधी कवितेकडे सरकते तर चळवळीशी अत्यंत



अनुक्रमणिका

जवळचा संबंध असल्यामुळे हे नाटक कार्यकर्त्यांना स्वप्नही देते आणि कधी कधी उत्तरही पुरवते.

ह्या रंगभूमीवरच्या नाटकांना कलात्मक यश कितपत साधते ? ह्या प्रश्नाचेही उत्तर मी प्रश्न विचारून देऊ इच्छितो. आमच्या आधुनिक शिक्षणाचा आरंभ १८२७ पासून झाला. सर्व वाङ्मय प्रकारातले लेखन इ. स. १८३३ पासून यायला सुरुवात झाली. त्यानंतर पाऊणशे वर्षांत भरपूर लिहिले गेले. या पाऊणशे वर्षांतले कलात्मक किती ? अवघ्या २५–३० वर्षातल्या ह्या चळवळीकडून मग आपण कुठल्या कलात्मकतेची अपेक्षा करीत आहात ?

गेल्या दहाबारा वर्षात 'झुंज', 'सूर्यास्त', 'लोककथा ७८', 'कन्यादान', 'पुरुष' अशी काही दलित प्रश्नांवरची दलितेतर नाटककारांची नाटके व्यावसायिक रंगभूमीवर आली आहेत. ह्या नाटकांना दलित नाटके मानायचे की नाही ? ह्या सर्वच नाटकांना लागू पडेल असे उत्तर देणे काहीसे अवघड आहे. उदा. 'लोककथा ७८' ह्या नाटकात दलित जीवनातला संघर्ष आहे, पण अगदी स्थूलरूपात. पण नाटक अतिशय यशस्वी आहे. ह्या यशात तंत्राचा वाटा आहे. इतर नाटकांचे तसे नाही.

विभक्त कुटुंबापेक्षा एकत्र कुटुंब चांगले, त्याआड नवशिक्षित सून येते म्हणून ती वाईट, शिक्षणामुळे असे घडलें म्हणून कॉलेज शिक्षणच वाईट, म्हणून शाळेत न रमणारा, वरवर व्रात्य दिसणारा, पण आईवडील, गुरुजन ह्यांच्याबद्दल पूज्यभाव असणारा तरुण चांगला, असा भाबडा विचार करण्यात समाज रमला होता. तेव्हा त्या समाजाच्या रंजनाची गरज बाळ कोल्हटकरांनी अचूक ओळखली. त्यातून कौटुंबिक नाटक उदयाला आले. कालपरत्वे समाजाच्या रंजनाच्या गरजाही बदलत असतात. कोल्हटकरांच्या प्रेक्षकांच्या जीवनात आता बराच बदल झालेला आहे. तो थोडासा समाजाभिमुख झाला आहे. आपल्या कुटुंबाबाहेरचें जग तो वर्तमानपत्र, रेडिओ, टी. व्ही. ह्यातून न्याहाळू लागला आहे. त्यातून त्याची काही आवडती मते तयार झाली आहेत. उदा. आज ब्राह्मणांची पीछेहाट चालू आहे, सत्तेपुढे शहाणपण चालत नसते, सत्तेतला मराठा माणूस मग्रूर आणि भ्रष्ट आहे, देशात उद्या मुसलमान सत्तेवर येणार आहेत, दलितांचे लाड फार चालू आहेत, दलितांची तोंडपाटीलकी व्यासपीठापुरतीच आहे, स्वतः मुक्तीची भाषा वापरणारा दलित घरात बायकोचा छळ करीत असतो, इत्यादी. ह्या आवडत्या कल्पनांची अपेक्षापूर्ती होते तिथे रंजन होतेच. 'सूर्यास्त' आणि 'पुरुष' ह्या नाटकांमध्ये रंजनाचे असे सामर्थ्य आहे. कोल्हटकरी नाटकांचा कालानुरूप सुधारून वाढविलेला अवतार म्हणजे 'सूर्यास्त' आणि 'पुरुष' ही नाटके होत. मी स्वतः दलितेतर नाटककारांनासुद्धा दलित नाटक लिहिता येईल असे मानतो. 'स्मारक' आणि 'धर्मांतर' ह्या दोन्ही नाटकांचा मी ह्यापूर्वीही उल्लेख केला आहे.

'दलित नाटक भडक आहे' हा दलित नाटकावरचा आणखी एक महत्त्वाचा आरोप. ह्या आरोपाचे खंडन करतानाच 'दलित नाटकाचे भवितव्य काय ? ह्या प्रश्नाच्या उत्तरापर्यंत आपण पोहोचणार आहोत. दलित नाटक भडक आहे हे मत मला मान्य नाही. ज्या अर्थाने दलित नाटक भडक आहे असे म्हटले जाते त्या अर्थाने मराठीतली अर्ध्याहून अधिक नाटके भडक आहेत. कौटुंबिक नाटकांचा मानदंड म्हणून 'वाहतो ही दुर्वांची जुडी' हे नाटक ओळखले जाते, तर 'रायगडाला जेव्हा जाग येते' हे नाटक ऐतिहासिक नाटकांचा आदर्श मानले जाते. 'लोककथा ७८' हे दलित प्रश्नावरचे तर 'सूर्यास्त' हे राजकारणावरचे लोकप्रिय नाटक मानले जाते. 'नटसम्राट' ह्या नाटकाची उंची शिरवाडकरांना ह्यापूर्वी कधीही गाठता आली नाही असे म्हटले जाते. ह्या सर्व नाटकातील भडकपणाची ठिकाणे मी सप्रमाण दाखवू शकेन.

भडकपणाची कारणे दोन. पहिले अभिव्यक्ती पद्धतीचे रूढ संकेत अमान्य करणे, आणि दुसरे, लेखकाने स्वतःच नाटकात हस्तक्षेप करणे. पैकी पहिल्या कारणाची दलित नाटककारांनी पर्वा करता कामा नये. अभिव्यक्ती पद्धतीचे शिष्टसंमत असे संकेत असतात. ह्या संकेतांचा जन्म सांस्कृतिक संदर्भातून होत असतो. हाच संदर्भ भडकपणाच्या मोजपट्टयाही ठरवीत असतो. ह्या मोजपट्टयांच्या बाहेर जाणारी अभिव्यक्ती असली म्हणजे नाटक भडक जाणवते. उदा. प्रिय नातलगाच्या मृत्यूनंतर रडायचे कसे ह्याबाबतचे त्या त्या समूहाचे संकेत असतात. तो मोडला तर प्रेक्षकांना नाटक भडक वाटेल. असल्या जाणिवांची आपण पर्वा करण्याची आवश्यकता नाही. कारण हा रसिकतेचा तोकडेपणा आहे.

भडकपणा येण्याचे दुसरे कारण मात्र महत्त्वाचे आहे. त्याचा आपण गंभीरपणे विचार करायला पाहिजे. खरे तर मी दलित नाटकात भडकपणा आहे हे मान्य करायलाच तयार नाही. पण दलित नाटकात व्यक्त होणारे सामाजिक वास्तव एकपदरी आहे ही मात्र माझी खंत आहे. आयु. मधू गायकवाड ह्यांनी गतवर्षी अध्यक्षपदावरून बोलताना दलित नाटकात तोचतोपणा आलेला आहे अशी खंत व्यक्त केली आहे. पण हा तोचतोपणा विषयवस्तूच्या मर्यादेमुळे आलेला नसून नाटयविषयाच्या अपुऱ्या आकलनामुळे निर्माण झाला आहे असे मला वाटते.

अभिनय, नाटयार्थाची जाण, नेपथ्य, प्रकाशयोजना ह्या बाबीत आपण कुठेही कमी पडू असे मला मुळीच वाटत नाही. पण या निर्मितीतून जो आशय आपणाला प्रेक्षकांपर्यंत पोहोचवायचा आहे त्याबाबत आपण जागरूक असणे अत्यंत आवश्यक आहे. दुर्दैवाने मराठी रंगभूमीही ह्या ठिकाणी दुबळी झाली आहे. एकदोन नाटयसंस्था अपवाद वगळता तिथेंही कुणाला याची फारशी चिंता वाटत नाहीं. त्यांना चिंता न वाटली तरी चालण्यासारखे आहे, कारण त्यांचे लक्ष्य व्यवसाय हे आहे, आणि त्यांच्याजवळ सांगण्यासारखे आज तरी काही नाही. आपले तसे नाही. आपल्याजवळ सांगण्यासारखे खूप आहे. आपली रंगभूमीवर निष्ठा आहे. आपण रंगभूमीला आपल्या वेदनेच्या अभिव्यक्तीचे माध्यम म्हणून वापरणार आहो. पापमय जीवनाच्या दुःखातून मुक्त होण्यासाठी ग्रीकांनी रंगभूमीचा आधार घेतला. त्यातून ग्रीक ट्रॅजिडीज् उदयाला आल्या. आपणही आपल्यावर लादलेल्या विषमतेच्या दुःखातून मुक्त होण्यासाठी रंगभूमीचा आश्रय घेत आहोत. म्हणून आज ना उद्या दलित रंगभूमीच मराठीला भव्य ट्रॅजिडी देऊ शकणार आहे.

आमच्या नाटकातील सामाजिक वास्तव एकपदरी आहे त्याचे मूळ आमच्या नाटयविषयक भूमिकेत आहे. चळवळ आणि नाटक ह्यातील भेदरेषा आपणाला नीट कळलीच पाहिजे. कार्यकर्ता आणि कलावंत ह्यातला फरक आम्हाला कळलाच पाहिजे. याचा अर्थ, कलावंत म्हणजे कुणी तरी अलौकिक असतो असे मुळीच नाही. कार्यकर्त्यांजवळ दुःखाची उत्तरे असतात. प्रवासाची एक गती असते. आणि वेगाला एक दिशा असते. ही रेडीमेड उत्तरें नाटकात मांडणे एवढेच नाटककाराचे कार्य नाही. हाच कार्यकर्ता किंवा त्याचा अनुयायी तयार उत्तरांच्या संदर्भात जीवन पडताळून पाहातो म्हणाला की, तो प्रश्नांच्या एका वेगळयाच व्यूहापर्यंत सरकत जातो. हे त्या कार्यकर्त्यांचे जीवनाला पडताळून पाहाणे, तपासून घेणे. जितक्या अधिक पातळयांवरून तो हे करील तितकी तो जीवनाची गुंतागुंत तुमच्या समोर ठेवील.

हजारो वर्षात दलितांना जे कधी मिळालेच नव्हते ते बाबासाहेबांच्या परिश्रमामुळे दलितांना मिळू शकले. म्हणूनच समतेच्या युद्धात दलित उतरले. परंतु ह्या लढाईत परंपरेने चालत आलेली प्रतिष्ठा, जन्मसिद्ध श्रेष्ठत्व आणि राजकीय सत्ता सवर्णीयांना थोडीबहुत का होईना गमावणे भाग होते. कायदेशीर तरतुदीमुळे हे गमावण्यावर शिक्कामोर्तब झालेले आहे. नाकारलेले मिळविण्यासाठी आम्ही तयार होणे स्वाभाविक आहे. पण असलेले गमावण्यासाठी इथला सवर्ण अंशतः का होईना, का तयार झाला ? त्याचे एक उत्तर हे असेल की, इंग्रजांशी केलेल्या तडजोडीमुळे तयार झाला. दुसरे उत्तर असे असेल की, नाइलाजामुळे तयार झाला. तिसरे उत्तर असे की, कायद्याने गमवायचे होते ते व्यवहारात मात्र गमवावे लागणार नव्हते अशी खात्री त्याला होती. म्हणून धूर्तपणाने तो तयार झाला. चौथे उत्तर असे असेल की, त्याला दलितांचे हक्क पटले होते, म्हणून तो तयार झाला. पाचवे उत्तर असेही असू शकेल की, तो काही तरी गमावण्यासाठी तयार झाला असे जे मी विधान केले आहे तेच भ्रामक आहे. ह्याखेरीज आणखीही काही उत्तरे संभावतील. ह्या उत्तरांपैकी माझे उत्तर अगर मत अमूक अमूक आहे असे कुठेही म्हटलेले नाही. पण बाबासाहेबांच्या संघर्षाचे चित्रण जर करायचे असेल तर इतक्या विविध दिशांनीच आपणास विचार करणे भाग आहे. त्याखेरीज त्या संघर्षाची गुंतागुंत आम्ही प्रत्ययकारी करू शकणार नाही. दलित लेखक हा लेखकही आहे आणि कार्यकर्ताही. जीवनातले उत्कट दुःख त्याला अपरिहार्यपणे क्रियाशील बनवते. ह्या वेदनेचा प्रपात एवढा जोरकस असतो की, क्षणभर ती वेदना सोशीत राहून त्या वेदनेचे अंतरंग न्याहळणे, एवढा धीर धरणे त्याला अशक्य असते. त्यामुळे वेदना टोकदार करीत नेण्याकडे त्याचा कल अधिक असतो. म्हणूनच त्याला इतर वाङ्मयप्रकारांपेक्षा कविता अधिक जवळची वाटते.

पण आता त्याला रंगभूमी ह्या माध्यमाचेही सामर्थ्य लक्षात आले आहे. त्यामुळे वेदनेचा प्रपात क्षणभर अडवून त्या वेदनेचे अंतरंग न्याहाळणे आणि सर्व गुंता-गुंतींसह त्या वेदनेचा प्रत्यय आपल्या कार्यकर्त्यांना देणे हे कार्य आज ना उद्या त्याला करावेच लागणार आहे.

त्यासाठी त्याला रंगभूमीप्रमाणे आकाशवाणी ह्या माध्यमाचाही उपयोग करून घ्यावा लागेल. भगवान भटकर, ववन चहांदे, भगवान सवई, हरिश्चंद्र जाधव अशा काही मोजक्या लोकांनी ह्या माध्यमाचा उपयोग करून घेतला आहे. हे माध्यम दुर्दैवाने अत्यंत प्रतिगामी मंडळींच्या हाती आहे. त्यामुळेच शासनाच्या पत्रकांचे इथे चुकीचे अर्थ लावले जातात. केव्हा तरी एकदा ह्या माध्यमाचाही आपणास गांभीर्याने विचार करावा लागणार आहे, टी. व्ही. हे तर सगळ्यात मोठे माध्यम. ह्या माध्यमाचा दलित रंगभूमीच्या दृष्टीने खूप उपयोग होणार आहे. पण इकडेही आपले लक्ष वळलेले नाही.

(अंबाजोगाई येथे १९८६ मध्ये भरलेल्या तिसऱ्या अ. भा. दलित नाटयसंमेलनाचे अध्यक्षीय भाषण – संपादित स्वरूपात)

□

## साभार स्वीकार

### लेख, प्रबंध, समीक्षा आणि इतर

**नागरी परंपरेचे लोकाविष्कार :** डॉ. एस्. एस्. भोसले; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ६० ☆ **अप्पांच्या गप्पा :** द. दा. दीक्षित; सौ. शालिनी दीक्षित, वडोदे; १९८७ रु. २५ ☆ **नारायणीय :** संपा. साधना प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ७५ ☆ **गाळ आणि आभाळ :** केशव मेश्राम; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ४० ☆ **एकनाथी भागवताचा अभ्यास :** दा. वि. कुलकर्णी; कॉंटिनेंटल प्रका., पुणे ३०; १९८७ रु. ५० ☆ **गर्जा जयजयकार : एक जागरण :** उषा मा. देशमुख–संपा., चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८७ रु. ६० ☆ **दिवसाचे दूत :** प्रभा कुलकर्णी; चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८७ रु. ४ ☆ **आपली स्वप्ने :** चंद्रकांत गूरसाळे; सुमती प्रकाशन, वडूज; १९८७ रु. १५ ☆ **श्रीमद् बाल भागवत :** द. दा. दीक्षित; सौ. शालिनी दीक्षित, वडोदे; १९८५ रु. १८ ☆ **महाराष्ट्राचा विकास : स्वतंत्र विदर्भ आणि वैधानिक विकास मंडळ :** संपा., जगन्नाथ लडकत; लडकत पब्लि., पुणे ४२; १९८५ रु. १५

### नाटके

**चिमूटभर अंधाराचा स्वामी :** प्रल्हाद जाधव; पंचवटी प्रकाशन, नाशिक; १९८६ रु. १५ ☆ **सूर्य मध्यरात्रीचा आणि दोन एकांकिका :** गणेश चौधरी; मित्र प्रकाशन, डांभुर्णी; १९८७ रु. २०

गोविंदस्वामी आफळे लिखित व चारुदत्त रंगभूमी प्रकाशित पुढील नाटके : (१) कळीचा नारद (२) नवरा जपावा लागतो (३) महाकवी कालिदास (४) अयोध्या जाळी हनुमंत (५) जय जगदीश हरे (६) मी सूर्याची रोहिणी (७) बैल गेला नि झोपा केला (८) आम्हाला हाच मंत्री हवा

### मासिक

**साहित्य चाफेकळी :** (मासिक : एप्रिल ८७)–संपा. जगन्नाथ लडकत; लडकत पब्लिकेशन्स, ९११ भवानी पेठ, पुणे ४२; रु. ७

# दलित साहित्याची त्रिसूत्री

## गंगाधर पानतावणे

卐 卐

दलित साहित्यनिर्मिती ही एक युगप्रवर्तक घटना आहे हे आता मान्य होत असले तरी अजूनही अधून-मधून, दलित साहित्य हे साहित्य नव्हे, कारण ते दलितांचे आहे, असे गैरसमज पसरविण्याचे प्रयत्न होत असतात. साहित्याची सामाजिकता जेव्हा जेव्हा प्रदर्शित होते, तेव्हा तेव्हा दलित साहित्याची चर्चा अपरिहार्यपणे करावी लागते. ह्याचे मुख्य कारण, दलित साहित्याचे क्रांतिकारकत्व. स्थितिशील साहित्यकल्पना आणि साहित्यनिर्मितीला आपल्या अंगभूत सामर्थ्याने नवा आशय देण्याचे कार्य दलित साहित्याने केले आहे. मराठी साहित्यापुरता विचार केला तरी आपल्या नव्या अनुभवसृष्टीने मराठी साहित्याला अधिक संपन्न आणि मुख्य म्हणजे अधिक समाजसन्मुख केले ते दलित साहित्याने. आवर्तबद्धता भेदून जीवनाच्या भेदक वास्तवाचे दर्शन घडविणारे दलित साहित्य, साहित्यातील युगप्रवर्तनाचे कार्य करीत आहे असे म्हटले पाहिजे.

विद्रोह, विज्ञाननिष्ठा आणि विश्वात्मकता ही मी दलित साहित्याची त्रिसूत्री मानतो. दलित साहित्याचे क्रांतिकारकत्व ह्या त्रिसूत्रीतच आहे. आंबेडकर-विचार हे दलित साहित्याचे प्रेरणातत्त्व आहे.

साहित्याचा संबंध समाजाशी व सांस्कृतिकतेशी असतो हे आता शपथेवर सांगण्याची गरज नाही. साहित्य ही स्वायत्त अशी घटना असली तरी समाजात घडणाऱ्या परिवर्तनाचा, समाजाच्या अंतरंगाचा, संवाद-विसंवादाचा अन्वयार्थ लावावा लागतो. साहित्याची सामाजिक अर्थवत्ता शोधावी लागते. ही अर्थवत्ता शोधणे म्हणजे मानवी जीवनाचा अर्थ शोधणे. कलावंत हा हवेत तरंगत नसतो. त्याच्यावर कळत-नकळत सामाजिकतेचे, सांस्कृतिकतेचे प्रभाव होतच असतात. समाजवास्तवाची नाळ लेखकाला तोडता येत नाही. समाजनिरपेक्ष, जीवननिरपेक्ष असे साहित्य जन्माला येत नाही. एखाद्या ललितकृतीतून प्रकट होणारे मन हे 'अलिप्त' आहे असे म्हणणे 'वदतोव्याघात' ठरावे. व्यक्तिमनावर होणारे विविध आघात ललितकृतीतून, वैचारिकतेतून विविध रूपे घेऊन प्रकट होत असतातच. कलावंताच्या संवेदनशीलतेला सामाजिक वास्तवाचे भान पुसता येत नाही. त्याच्या निर्मितीतून एक जीवनदृष्टीच प्रकट होत असते, आणि म्हणूनच साहित्य निर्मिकाचे क्षेत्र अपरिहार्यपणे समाज आणि संस्कृती असते. आजचे दलित साहित्य समाज आणि संस्कृतीचा अन्वयार्थ लावणारे आहे. या पार्श्वभूमीवर दलित साहित्यातील विद्रोह, विज्ञाननिष्ठा आणि विश्वात्मकता विचारात घ्यावी लागणार आहे.

विद्रोह ही संकल्पना समाजाच्या व साहित्याच्या वास्तवाकडे अंगुलिनिर्देश करते. विद्रोहाचा जन्म याच वास्तवातून होतो. व्यवस्थेशी त्याचा अपरिहार्य संबंध असतो. स्थितिशील समाजाला त्याची जाणीव करून देण्याचे काम याच विद्रोहाला करावे लागते. त्यामुळे त्यास इतिहास आणि वर्तमानाचा एक अपरिहार्य संदर्भ असतो. ह्या विद्रोहाचे स्वरूप दोन अवस्थात प्रकट होताना दिसते. एक, ज्या समाजव्यवस्थेने व विचार-व्यवस्थेने आपले अस्तित्व खुडून टाकले होते, आपल्याला नाकारलेले होते, आपली विकृत प्रतिमा निर्माण करून तीच प्रमाण मानली होती, आपल्या आशा–आकांक्षा दडपून टाकल्या होत्या, हे सारे नाकारून आपली अस्मिता परजण्याची वृत्ती हे विद्रोहाचे एक स्वरूप होय. आणि दुसरे स्वरूप म्हणजे, समाज व विचार-व्यवस्थेतून निर्माण झालेल्या वेदनापीडांचा, सुखदुःखांचा, आशा–आकांक्षांचा, अस्वस्थता–दुरवस्थांचा आलेख शब्दमाध्यमातून प्रभावीपणे, ओजस्वीपणे मांडणे. पहिला विद्रोह चळवळींच्या रूपातला तर दुसरा विद्रोह हा साहित्यनिर्मितीच्या संदर्भातला. ह्या दोहोंचाही संबंध पूरक असाच राहिलेला आहे. त्यामुळे चळवळ आणि साहित्य ह्या दोन्ही बाबी दलित साहित्याच्या संदर्भात

पृथक् मानता येत नाहीत. आणि म्हणूनच दलित साहित्यातील विद्रोहाचे स्वरूप अधिक टोकदार, परंतु समाज-संस्कृतीचे सतत भान राखणारे असे राहिलेले आहे.

विद्रोहात नकार ही बाब अनुस्यूत आहे. नकार ही विद्रोहाची आरंभखूण आहे. आणि नकाराला जन्म देणारी प्रेरणा म्हणजे आत्मशोध. आत्मशोधाचा आरंभ आत्मजाणिवेशिवाय होऊ शकत नाही हेही खरे. म्हणजे विद्रोहाकडे जाताना आत्मजाणीव→आत्मशोध→नकार अशा अवस्थांचा प्रवास करावा लागतो. ही आत्मजाणीव सांस्कृतिकतेशी व इतिहासाशी निगडीत असते. ही जाणीव सतत आत्मशोध घेते आणि या आत्मशोधातूनच ती शोषणाच्या सर्व संस्था नाकारते, अस्पृश्यता नाकारते, विषमता नाकारते, पोथीनिष्ठा नाकारते, दास्य आणि प्राक्तनवाद नाकारते. येथे निषेध आणि नकार या दोन संज्ञांचाही विचार करणे प्रस्तुत ठरेल. अमेरिकेतील काळ्या लोकांचे साहित्य हे निषेधात्मक आहे. ते श्वेत संस्कृतीचा निषेध करीत असतें. परंतु दलित साहित्य तेथेच थांबत नाही, तर मानवी दास्य निर्माण करणारी समाजव्यवस्था व विचारव्यवस्था नाकारते. याच्या मुळाशी माणसाच्या अवमूल्यनाचे हेतू आहेत, पुनरुज्जीवनवादाची ईर्षा आहे त्यावर आघात करते आणि मानवी प्रतिष्ठेची मूल्यात्मकता ग्राह्य मानते. तेव्हा दलित साहित्यातील विद्रोह मूर्तिभंजनाचे स्वरूप प्रकट करतो. नुसते Protest करण्याचे त्याचे स्वरूप नाही, तर Rejection हीच त्याची अंतिमता आहे. त्यामुळे दलित साहित्यातला विद्रोह हा केवळ अभावात्मक आहे अशी टीका होण्याची शक्यता आहे, परंतु हा विद्रोह हा एकीकडे नकार आणि विध्वंसन वाटावे अशा स्वरूपाचा आहे. पण त्यातूनच त्याची वाट रचनात्मकतेकडे गेली आहे. विद्रोहाचें दुसरे नाव रचनात्मकता हेच आहे. विद्रोहाला न्याय, सामंजस्य, सौहार्द आणि मानवी मूल्य अभिप्रेत आहे. शोषणशक्तींचे भान जसे ह्या विद्रोहाला आहे, तसेच शोषणाचा अर्थ विशद करण्याची प्रतिज्ञापूर्तीही ह्या विद्रोहाला अभिप्रेत आहे. त्याच्या खुणा दलित कवितेत जागोजागी सापडतात. हिंदू मानसिकतेवर, वर्णजाणिवेवर जबरदस्त आघात करणारे नामदेव ढसाळ, एक तीळ सर्व मिळून वाटून खाऊ असे म्हणतात.

एक तीळ सर्वांनी कुरतडून खावा<br>
माणसावरच सुक्त रचावे<br>
माणसाचेच गाणे गावे माणसाने (गोलपिठा)

तेव्हा विद्रोहाचा प्रवास अंतिमतः रचनेचा आहे. मानवी मूल्यांचे प्रवर्तन घडविणारा आहे. स्वत्व जाणिवेबरोबरच संघर्षशील आणि मनुष्यत्वाच्या आविष्काराबरोबरच, मनुष्यत्वाचे नवे शिल्प कोरणारा आहे.

विद्रोह जाणिवा व्यक्त होताना काही वेळा एका उजळ स्वप्नाचा संदर्भ येत असतो. इतिहासाच्या अंधाराचा तो अपरिहार्य भाग असतो. ह्याचा अर्थ स्वप्नरंजन हा त्याचा वसा नसतो हे लक्षात ठेवणे जरुरीचे आहे. स्वप्न पाहाणे हा मानवी स्वभाव आहे. परंतु स्वप्नात रंगून जाणे आणि स्वभाव हरपणे ही मानवी दुर्बलता ठरेल. दलित साहित्यातील स्वप्न हे आत्मगुंजन नव्हे तर तो स्वत्वाचा, नवमूल्यात्मकतेचा ध्यास आहे. पुष्कळदा स्वप्ने ही साचलेपणातच विरून जातात. दलित साहित्यातील स्वप्ने नव्या समाजाचे, नव्या परिवर्तनाचे, क्रांतदर्शित्वाचे वाहक असतात. भूतकाळातील संज्ञाविहीनतेत कुजून राहाणे हा या स्वप्नाचा प्रवास नाही, उज्ज्वल भविष्याचा त्यांना ध्यास आहे. म्हणूनच दलित साहित्यातील विद्रोह नवनिर्मितीचा द्योतक आहे यात शंका नाही.

काही अदृश्य शक्ती मानवी जीवनावर नियंत्रण करीत असतात. अशा शक्तींमध्ये देव, दैव आणि देऊळ ह्या शक्ती प्रभावशाली असतात. या शक्तींना धर्माची पुटे चढविली की श्रद्धा मानवी जीवनाचा मूलाधार बनते. धर्म मानवी जीवनाला अर्थ प्राप्त करून देतो, एवढेच नाही तर धर्मानेच मानवी जीवनाचे ध्येय निश्चित केले असे आपल्याला दिसते. त्यामुळे स्वर्ग, मोक्ष अशी गूढ अधिष्ठाने निर्माण होतात. विज्ञानदृष्टी ह्या जगाकडे किंवा धर्मप्रस्तुत मानवी जीवनाच्या मूलाधाराकडे पाहातें ती बुद्धिवादाचा आश्रय घेऊन. विज्ञानाने भूतकाळाची नवी उमज आणि भविष्याची नवी चेतना प्राप्त होतें. त्यातूनच नवे तत्त्वज्ञानही जन्माला येते. हे तत्त्वज्ञान गूढतेवरील श्रद्धा नष्ट करून टाकते. हे जग अदृश्य शक्तींनी निर्माण झाले नाही, तर हे जग मानवी समाजाचे आहे, हे सत्य आकळू लागते. जीवनाची अवस्था बदलता येते आणि मानव्यनिष्ठेचे सुसंवादी जग नव्याने निर्माण करता येऊ शकते ही दृष्टी उद्भूत

होते. धर्मावर पोसले गेलेले पूर्वग्रह आणि लोकभ्रम यातून जनमानस मुक्त झाले पाहिजे, बुद्धी ही पारमार्थिक वस्तू नसून ती मानवी उपाधि आहे, तसेच मानव हा मूलतः बुद्धिवादी आहे, ही निष्ठा गृहीत धरली पाहिजे. हे विचार विज्ञानही निर्माण करते. धर्मविधी किंवा पारंपरिक श्रद्धा एका विशिष्ट कायद्याने निर्माण केल्या गेल्या असतील, आणि माणूस त्या कायद्याचा गुलाम आहे अशी धारणा झाली असेल, तर ती झुगारून देणारी विज्ञानदृष्टी असते. म्हणूनच जीवनाची अवस्था बदलण्याचा मानवाचा हक्क प्रस्थापित करणारी आणि माणूस स्वतःच्या भवितव्याचा निर्माता आहे ही ज्वलंत निष्ठा दलित साहित्याने स्वीकारलेल्या विज्ञाननिष्ठेचा पाया आहे. म्हणून लोकभ्रम, अंधश्रद्धा, पवित्र–अपवित्रतेच्या कल्पना, धर्माधिष्ठित ग्रह–आग्रह–पूर्वग्रह यातून मुक्त होण्याची भाषा दलित साहित्याने प्रमाण मानली आणि आत्मविश्वासाने मनुष्यत्वाशी निगडीत असणाऱ्या तत्त्वज्ञानाचा आग्रह धरला. कोणत्याही दैवी शक्तीचे किंवा देवसंकेताचे प्रामाण्य न गृहीत धरता दलित जीवनाचे सारें अनुभव बुद्धिवादाच्या आणि न्यायतत्त्वाच्या आधारे मांडण्याची दलित साहित्याने प्रतिज्ञा केली. विज्ञाननिष्ठेची कास धरणाऱ्या दलित साहित्यात पोथीनिष्ठेला स्थान नाही. दलित मनावरील बौद्धिक व भावनिक गंज काढून टाकण्यासाठी विज्ञाननिष्ठा अपरिहार्य होती. शोषणाची केंद्रे असलेली देव, दैव आणि देऊळ ही दास्यकेंद्रे उध्वस्त करण्याची क्षमता केवळ विज्ञाननिष्ठेत आहे हे दलित साहित्य निर्मितीने प्रकट केले आहे. हे दलित साहित्याचे क्रांतिकारकत्व होय. विज्ञान मनुष्याचे सार्वभौमत्व घोषित करते असे दलित साहित्य मानते.

विद्रोह आणि विज्ञाननिष्ठेचा विश्वात्मक जाणिवेशी अपरिहार्य असा संबंध आहे. विश्वात्मक जाणीव ही मानव्याची / मानवतावादाची जाणीव होय. दलित साहित्यनिर्मितीचे ते एक सूत्र आहे. या मानवतावादाशी बुद्धी आणि नैतिकता निगडीत आहेत. बुद्धी हे काही गूढ नव्हे, की अनाकलनीयता. ती एक प्रकारची जाणीवच होय. फार तर बुद्धी ही नैतिकतेची आधारशिला होय असे म्हणता येईल. मानवी जीवनात 'स्वातंत्र्य' हे सर्वश्रेष्ठ असे मूल्य आहे. त्यामुळे मानवतावादाला स्वातंत्र्याची आणि नैतिकतेची अट आहे हे ओघाने आलेच. ह्या नैतिकतेसाठी कोणत्याही गूढगहन, अलौकिक किंवा दैवी आवरणाकडे धाव घेण्याची गरज नाही. गूढवाद नैतिकतेचा आणि मानवतावादाचा नेहमीच पराभव करतो, दिशाभूल करतो. आणि नैतिकतेचे अधिष्ठान तर माणूस आणि समाज हेच आहेत. म्हणूनच विश्वात्मकतेचा संदर्भ मानवी स्वातंत्र्य, नैतिकता, समता आणि सत्यशोधनाशी आहे. विश्वात्मक जाणीव ही मानवी स्वातंत्र्य आणि सामाजिक न्याय यांचा उद्घोष तर करतेच, परंतु तसे जग निर्मिण्यासाठी कटिबद्ध होण्याची प्रतिज्ञाही करते. ह्या प्रतिज्ञेतून व्यक्तीला तिचे मूलभूत आणि प्रतिष्ठेचे स्थान मिळावे आणि जगाची पुनर्निर्मिती होऊन मानवांचा भ्रातृसमाज निर्माण व्हावा ही अपेक्षा व्यक्त होते. आध्यात्मिकतेतून पूर्णतः मुक्त होऊन, बंधमुक्त माणसांचा नवा समाज अभिप्रेत असलेल्या विश्वात्मक जाणिवेने सामाजिक पुनर्घटनेचाच विचार प्रकट केला आहे.

ज्या समाजाला हिंदू समाजाने व धर्माने शब्दांचा अधिकार नाकारला होता, न च शूद्राय मतिं दद्यात्। हा मनूचा शब्द प्रमाण मानून ज्या समाजाला विचारांच्या प्रदेशातून बहिष्कृत केले होते, त्या समाजाचा साहित्योद्गार आता विश्वात्मक जाणिवा व्यक्त करण्याची प्रतिज्ञा करीत आहे ही बाब महत्त्वपूर्ण आहे. धर्मप्रेरित मानवतावादाचा स्पर्श ह्या प्रतिज्ञेला नाही हे येथे पुन्हा लक्षात घेतले पाहिजे. उद्याचे नवे जग अंधाराचा पर्वत फेकून देईल, म्हणून साऱ्यांनी हातात हात घालून आले पाहिजे, ही आंतरिकता दलित कवी व्यक्त करताना एका व्यापक मानवतावादाचाच उद्घोष करतो आहे यात शंका नाही.

मला पहाटेची स्वप्ने पडू लागली आहेत
या गावकुसाबाहेरचा काळोख मावळणाराहे
उजाडल्यावर आमच्या ओठातील प्रकाशगीताचे
स्वर दाही दिशांना धुंद करणार आहेत
असे सारे एकत्रित या
हातात हात घालून प्रकाशाचे गीत गा
तो दुरून दिसणारा प्रकाशकिरणच
उद्याचा सूर्य होणार आहे
त्यासाठी एकत्रित या, तुमचे एकमेकात गुंफलेले हात
हा अंधाराचा पर्वत फेकून देऊ शकतील
मला पहाटेची स्वप्ने पडू लागली आहेत

(गावकुसाबाहेरील कविता)





अनुक्रमणिका

दलित साहित्याच्या त्रिसूत्रीच्या अनुषंगाने काही बाबींचा ऊहापोह करणेही जरुरीचे वाटते. दलित साहित्यिकांमध्ये सवर्णीयत्व स्वीकारण्याची हौस जन्माला येईल की काय अशी भीती काही लेखकांचे साहित्य वाचत असताना जाणवू लागली आहे. मी दलित कवी, लेखक नाही किंवा माझी कविता दलित कविता नाही, तर ती 'कविता' आहे असे आग्रहपूर्वक सांगण्याचा प्रयत्नही होऊ लागला आहे. हा पलायनवाद होय असे वाटते. आपल्या अस्तित्वापासून ही एक प्रकारे पळवाटच होय. आपण सवर्णीय आहोत, मध्यमवर्गीय आहोत, असे भासविण्याचा हा प्रयत्न असतो. हे त्याचे जसे साहित्यात होते तसे मग त्याच्या वर्तनात, घरातील वातावरणातही घडत असते. दलितांपासून तुटून जाण्याची ही प्रक्रिया जाणीवपूर्वक निर्माण केली जाते. अनुकरणाने आपली एक नवी संस्कृती दर्शविण्याचा तो प्रयत्न असतो. याच प्रयत्नातून तो मग अशा एका उंच पहाडावर जातो की, मग त्याला स्वतःला आणि त्याच्या समाजाला शोधणे अवघड होते. पुष्कळदा तो स्वतःच्याच समाजाची घृणा करू लागतो. तो आपली पार्श्वभूमी विसरण्याचा प्रयत्न करतो, पण त्याला ती विसरता येत नाही. आपले आई-वडील हे अस्पृश्यच आहेत, त्यांची स्थिती दुर्धर आहे हेही क्षणभर तो विसरण्याचा प्रयत्न करतो, पण आत कुठे तरी प्रतारणेची टोके घाव करीत असतात. एका परीने ही पराभूततेची जाणीवच असते. असे का घडत आहे? कदाचित् सवर्णीय / मध्यमवर्गीय जगाचे आकर्षणही असेल. आपल्या जीवनाविषयीचा न्यूनगंडही असेल. कदाचित् मध्यमवर्गीयांकडून आलेली लाचही असेल. 'दलितांनो! तुम्ही स्वतःची अशी चित्रणे का करता? दलितांची दुःखे अशी असतात का? दलितांनी दलितांवरच लिहावे का? दलितांऐवजी चांगल्या माणसांची चित्रणे करा. आम्ही तुम्हाला प्रसिद्धी देऊ. प्रतिष्ठा देऊ. पैसा देऊ. कल्पनेच्या जगात वावरा. कल्पनेचे जग सुंदर असते. कल्पनाविलास हा साहित्याचा मूलधर्म आहे. तुम्ही हिंदू समाजव्यवस्थेविषयी कशाला कडवट लिहिता? चाकोरी सोडू नका. विद्रोही साहित्य नाकारा.' अशा विचारधारेतूनही दलित लेखक आपला चेहरा बदलू लागल्याची काही चिन्हे दिसू लागली आहेत. दलित साहित्याच्या निर्मितीसामर्थ्याला हे आव्हान आहे. अर्थात दुसरेही चित्र आढळून यते की, दलित लेखक आपल्या जगात मश्गूल असतो. तो सवर्णीय होण्याचा प्रयत्न करीत नाही. तो आपले व्यक्तिमत्व आपल्या साहित्यातून मांडतो. त्याचे हसणे, रडणे, बोलणे, जगणे सर्वस्वी त्याचे असते. त्याचे दुःख त्याचे असते. त्याची वेदना त्याची असते. तो आपले स्वत्व गहाण टाकत नाही. स्वतःला शब्दांकित करण्यात त्याला कोणतेही भय वाटत नाही. कधी तो स्वतःसंबंधी, स्वतःच्या समाजासंबंधी रोखठोक होतो. आत्मटीकेचे शस्त्र तो उगारतो. त्यामुळे त्याला स्वतःच्या समाजाकडूनही निंदा ऐकावी लागते. आमचे दुःख, दैन्य, दारिद्र्य, लाचारी, अज्ञान, अगतिकता साहित्यामध्ये का मांडता अशी टीका सहावी लागते. परंतु कलावंत हा मुक्त असला पाहिजे. त्याने त्याच्या पूर्वपिढ्यांनी जे अनुभविले ते मुक्तपणे मांडले पाहिजे. दलित लेखकाला विरोधाच्या पार्श्वभूमीवर लेखन करावे लागते. तो विरोध सवर्णीयांचा असतो आणि स्वकीयांचाही असतो. अशा द्वंद्वात त्याला आपल्या अनुभवांशी इमान राखावयाचे असते. आणि निर्भयपणे आपले अंतर्मन उघडे करायचे असते. स्वत्व राखणारा कलावंत श्रेष्ठ कलावंत असतो. कारण तो स्वतःच्या जीवनाशी पलायनवाद स्वीकारीत नाही. पराभूतता हा शब्द त्याच्या कोशात नसतो. प्रसिद्ध निग्रो कवी लँग्स्टन ह्यूजने जे म्हटले ते दलित कवींना तंतोतंत लागू पडते. 'An artist must be free to choose what he does, certainly, but he must also never be afraid to do what he might choose.' दलित साहित्य-निर्मितीचे भवितव्य यातच सामावलेले आहे.

□

## साभार स्वीकार

### कथा

☆ गोतावळा : अज्ञानबाबू; चांगुणा प्रकाशन, सातारा; १९८७ रु. ४० ☆ कविता करणारा कावळा : शांता ज. शेळके; शैलेंद्र प्रकाशन, पुणे; १९८७ रु. १०

# दलित साहित्य : नागसेनवनाचे सिंहावलोकन

प्रा. रा. ग. जाधव

⊠ ⊠

सुमारे वीस वर्षांपूर्वीचा औरंगाबाद येथील मिलिंद महाविद्यालयाचा नागसेनवनाचा विशाल परिसर. आपल्या सांस्कृतिक अभिव्यक्तीसाठी समुत्सुक बनलेल्या सृजनशील मनांची कुजबूज परिसरभर पसरलेली. त्या भारलेल्या वातावरणाचा एक घटक मीही होतो. दलित साहित्याची काही सत्ये, काही स्वप्ने त्यावेळी दिसत होती, दाखविली जात होती. आज दोन दशकानंतर त्या सत्यांकडे, स्वप्नांकडे वळून पाहाताना बरेच समाधान वाटते. थोडेसे असमाधानही.

वाङ्मयीन अभिव्यक्ती हा माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे. म्हणून दलित कथाकार, कवी, ललित लेखक, समीक्षक यांना प्रचलित मराठी वाङ्मयीन संस्कृतीत प्रवेश करण्यास अडथळा येत असेल, अडचणी येत असतील, तर स्वतःची प्रकाशने सुरू करून हा अडथळा पार पाडावा अशी काहीशी सरळ भूमिका त्यावेळी घेण्यात आली, असे मला वाटते. त्याचप्रमाणे नवोदित दलित लेखक-कवींना मार्गदर्शक ठरेल. असा एक उद्‌बोधक सर्वांगीण साहित्यविचार सुसूत्र करीत जावा, असेही त्यावेळी जाणवत होते. दलित साहित्याविषयी रूढ मराठी साहित्य आणि समीक्षा यांच्या प्रतिक्रिया कशा प्रकारच्या संभवतील, याचाही वैचारिक पातळीवर मागोवा घेण्याचा प्रयत्न त्यावेळी करण्यात आला. मराठी साहित्याचे अध्ययन-अध्यापन, पुराणकथा. विद्रोह बौद्ध धर्म, पुरावास्तव, सामाजिक जाणिवा यांसारखे विषय वेधक ठरत होते. दलित प्रज्ञेने व प्रतिमेने त्यावेळी नियतीशी जणू एक करार केला होता व नागसेनवन चांगल्या साहित्यकृतीचे स्वागत करण्यासाठी आतुर झाले होते.

त्यानंतरच्या काळात समर्थ दलित कवी–लेखक पुढे आले आणि कथा, काव्य, कादंबरी, आत्मचरित्र अशा विविध प्रकारच्या साहित्यनिर्मितीने अवघे मराठी साहित्यक्षेत्रच भारून टाकले. मराठीत १९४५ नंतरच्या नवसाहित्याच्या पहिल्या प्रभावकाळात जुन्या रीतीने, जुन्या जाणिवांनी लिहिणे जसे मागे पडले किंवा मागासलेपणाचे वाटू लागले, त्याचप्रमाणे दलित साहित्याच्या पहिल्या प्रभावकाळात आपल्या निर्मितीला दलित जाणिवांचे वळण असण्याची वा राखण्याची काहीशी स्वेच्छासक्ती मराठीत निर्माण झाली. दलित प्रतिभेने नियतीशी केलेला करार यशस्वी रीतीने पूर्ण करून दाखविला. दलित साहित्य सुस्थिर झाले. मान्यता पावले. मराठीच्या उच्च अभ्यासक्रमात त्याचा प्रवेश झाला. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद एका दलित लेखकाला प्राप्त झाले. साहित्य अकादमी, इतर सांस्कृतिक संस्था व राज्य शासन यांचे पुरस्कार अनेक दलित साहित्यकृतींनी मिळविले. दलित साहित्यिकांच्या पहिल्या प्रभावी पिढीच्या मागोमाग नवी पिढी पुढे आली व ही परंपरा पुढेही जात राहील.

पहिल्या पर्वात जो दलित साहित्यविचार झाला, तो वैचारिक पातळीवर. त्याला प्रत्यक्ष साहित्यकृतींचा आधार नव्हता. दलित संवेदनशीलतेला, सर्जनशीलतेला डोळस करण्याचे, आविष्काराच्या दिशा दाखविण्याचे, तिच्या संभाव्य अडीअडचणींचा परिहार करणारे, वाङ्मयीन आविष्कारांचे सामर्थ्य वाढविणारे वैचारिक मार्गदर्शनाचे कार्य प्रारंभीच्या दलित साहित्यविचाराने केले. त्या साहित्यविचारास अभिप्रेत असलेल्या साहित्यकृतीही नंतर निर्माण झाल्या. विद्रोहाचे महाभाष्य यशवंत मनोहरांनी काव्यबद्ध केले. केशव मेश्रामांनी पुरावास्तवाचे ऐतिहासिक संवेदन कादंबरीच्या रूपाने मांडले. नामदेव ढसाळांनी नागर दलितत्वाचे एक नवे परिमाण निर्माण केले. दया पवार, पार्थ पोळके, लक्ष्मण माने, कोंडविलकर आदींनी आत्मचरित्राचे नवे रूप साकार केले.

आज मागे वळून पाहाताना जे मोठे समाधान लाभते ते या सिद्धीचे. या लखलखीतपणे उजाडलेल्या निळ्या

पहाटेचे. दलित प्रतिभावंतांनी मराठी साहित्य व संस्कृती श्रीमंत केली. या दोहोंचे ऋण फेडले. या दोहोंच्या परंपरांची एक नवी घडी घालून दिली. वीस वर्षांपूर्वीच्या एका स्वप्नाची यशस्वी समाप्ती झाली.

तथापि स्वप्नाची समाप्ती झाली तरी सत्याचे दूत पुढील दिवसांच्या रूपाने समोर येऊन ठाकतातच. त्यांची दखल घेणे आवश्यक ठरते. दलित सर्जनशीलतेची जोपासना करणे, तिची गतिमानता अकुंठित राखणे, वाङ्मयीन निर्मितीला तिच्यामार्फत जेवढे जास्त व चांगले असे देता येईल तेवढे देण्यासाठी दलित निर्मितीक्षम मनांना दिग्दर्शन करणे हे काम, मला वाटते, दलित साहित्याच्या पहिल्या पर्वात जसे करावयाचे होते, तसेच ते उत्तरोत्तरही प्रत्यक्ष साहित्यकृतींच्या विश्लेषणाच्या आधारे अधिक मूर्त, अधिक विकसनशील स्वरूपात पुढे चालविणे आवश्यक होते. या प्रकारच्या वाङ्मयीन भूमिकेचा संदर्भ अवघी मराठी वाङ्मयीन संस्कृती व साहित्य हा होता. तथापि या वाङ्मयीन भूमिकेचा कळत–नकळत संकोच झाला की काय, अशी एक शंका माझ्यासारख्याला डाचत राहाते. असा संकोच झाल्याचे जाणवते हे मात्र खरे, आणि याची जबाबदारी दलित-दलितेतर या विभक्तवादी दृष्टिकोनात आहे असे मला वाटते. हा विभक्तवादी दृष्टिकोन उभयपक्ष्यात आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. त्याचप्रमाणे त्याला काही सन्मान्य अपवादही उभयपक्षीयात आहेत हेही महत्त्वाचे आहे. नवजात व उत्तम दलित साहित्यकृतींच्या वाङ्मयीन रसास्वादाची, समीक्षात्मक विश्लेषणाची जबाबदारी विभक्तवादी दृष्टिकोनामुळे मनमोकळेपणाने, शुद्ध वाङ्मयीन दृष्टीने कुणीच स्वीकारली नाही. मला काय त्याचे? अशी आत्मतुष्ट, आत्मकेंद्रित भूमिका घेण्यात आली. काहीशा असाहायपणेच दलित साहित्याचे स्वागत करण्यात आले आणि अनेकदां साहित्यकृती न उघडता तिचे मानभावी दांभिकपणे कौतुक करण्यात आले. आपल्या एकूणच साहित्यसंस्कृतीचे हे नवविकसित दालन म्हणून निखळ आत्मीयतेने दलित साहित्याकडे पाहिले गेले नाही. आत्मीयता म्हणजे उत्तरदायित्वाचा स्वीकार. पहिली गोष्ट टाळण्यात आली व म्हणून दुसरी गोष्ट उपस्थित होऊ शकली नाही.

कथा, काव्य, कादंबरी, आत्मचरित्र इत्यादी प्रकार प्रभावीपणे हाताळणाऱ्या दलित साहित्यिकांनी आणि त्यांच्या रसिक चाहत्यांनी दलित नवनिर्मितीचा आनंद अनुभवला. तथापि अंतर्मुख होऊन, आत्मपरीक्षण करून त्या निर्मितीचा सर्वांगीण वेध घेतला नाही. अनुकूल व प्रतिकूल समीक्षेची गांभीर्याने दखल घेतली नाही. प्रतिकूल समीक्षेची पूर्वग्रहदूषित म्हणून व अनुकूल समीक्षेची आपल्या माणसांची म्हणून वरवरची दखल घेण्यात आली. 'बलुतं'सारख्या आत्मलेखनावर अर्थात स्वकीयांकडूनही अनपेक्षित टीकेची झोड उठविण्यात आली. तथापि तिच्यातही काही उद्बोधक अंश आहे किंवा काय हे पाहाणे, पुढील दलित आत्मलेखनाच्या दृष्टीने मार्गदर्शक ठरू शकले असते. साहित्यिक हाच स्वतःचा खराखुरा समीक्षक असतो. प्रतिभावंत दलित लेखकांनी आणि त्यांच्या चाहत्या रसिकवर्गाने कळत-नकळत दलित या विशेषणावर अधिक भर देऊन साहित्य या विशेष्याकडे पुरेसे लक्ष दिले नाही असे वाटते. दलित वास्तव आणि दलित जाणिवा एवढ्याच सामग्रीवर चांगली दलित साहित्यकृती निर्माण होत नाही, त्यासाठी इतर काही गोष्टींची, साधनेची, परिश्रमांची गरज असते. नव्या दलित साहित्य कृतींच्या आगमनाबरोबरच दलित साहित्यिक आणि रसिक यांनी या दृष्टीने विचारमंथन केले असते तर दलित साहित्यातील आवर्ताला वेळीच आळा बसला असता.

त्याचप्रमाणे जातीयवादी म्हणा किंवा पूर्वग्रहदूषित म्हणा अथवा पक्षपाती म्हणा, अशीही टीका दलित साहित्यकृतींवर झाली, असे म्हटले जाते. त्या टीकेतील अवाङ्मयीन भूमिकेचाही समर्थपणे प्रतिकार करणे आवश्यक होते. त्यामुळे दलित-दलितेतर असा जो विग्रह साहित्यबाह्य कारणांसाठी करण्यात येतो, त्यालाही वेळीच आळा बसला असता.

दलित साहित्यकृतींच्या निर्मितीपूर्वी दलित साहित्यविचार अनेकविध अंगांनी करण्यात आला. मात्र त्या निर्मितीनंतर त्याला साचेबंद विचारांच्या क्षेत्रातून बाहेर काढण्याचा प्रयत्न झाला नाही. प्रतिकूल टीकेचा आधार दलित साहित्यकृतीचे यथार्थ वाङ्मयीन विश्लेषण हा नव्हता तर अनुकूल समीक्षेची भिस्त वरवरच्या वाङ्मयीन निरीक्षणांवर होती. प्रत्यक्ष साहित्यनिर्मिती आणि समीक्षा यांचे नाते पुरेसे परस्परोपजीवी राहिले नाही. त्यामुळे दलित साहित्यविचार हा सतत सामाजिक

विचाराच्या दिशेने ठिकठिकाणी ताणला गेला. साहित्यकृतींचा मागोवा घेत पुढे पुढे जाण्याची दृष्टी मागे पडली आणि सामाजिक विचारांच्या उलटसुलट अभिनिवेशांनी एका कृतक् वितंडवादात दलित साहित्यविचार गुंतून पडला. दलित साहित्याचा आशयविषय, दलित जाणिवा, दलित कलेचे आकृतिबंध, दलित कलावंत—साहित्यिक या सर्वांच्या बाबतीत गुण आणि संख्या या दोन्ही दृष्टींनी प्रत्यक्षात विकास—विस्तार घडत होता व याचा पुरावा नव्या नव्या साहित्यकृतीतून पुढे येत होता. या निर्मितीशी दलित साहित्यविचाराचा जिवंत संबंध राहिला नाही. नवोदित व नवविस्तारित दलित विश्वाचा वेध घेऊ शकणारी सर्जनशील मने इथे होतीच, पण त्यांना निर्मितीच्या नव्या वाटा दाखविणारी व त्या वाटा प्रत्यक्षातील दलित साहित्यकृतींच्या विश्लेषणातून सूचित करणारी समीक्षा निर्माण होऊ शकली नाही. मार्क्सवाद, आंबेडकरवाद यांसारख्या विचारप्रणालींच्या मंथनातून उद्याच्या दलित साहित्याला दिशा दाखविण्याचे प्रयत्न होऊ लागले. वेगळे साहित्यशास्त्र, वेगळे सौंदर्यशास्त्र यांचा शोध घेण्याची खटपट सुरू झाली. वेगळेपणाचे एक प्रकारचे अतिभावन (ऑब्सेशन) निर्माण झाले. मराठी साहित्याच्या मध्यधारेशी अतूट नाते राखणारे प्रभावी दलित साहित्य, ते नाते कसे अतूट आहे हे दाखविणाऱ्या समर्थ समीक्षेची वाट बघत राहिले.

दलित साहित्याच्या क्षेत्रात वेगळ्या विचारप्रणालीच्या अधिष्ठानाची खटपट सुरू झाली. यासाठी सामाजिक—राजकीय आंदोलनाची साध्य—साधने कळत-नकळत दलित साहित्यक्षेत्रात अवतीर्ण झाली. आपल्या समाजात मुळातच असलेले जातिजमातींमधील मानसिक अंतराय एका बाजूने दूर करण्याचा प्रयत्न करीत असतानाच, दुसऱ्या बाजूने त्या मानसिक अंतरायांचे दृढीकरण करणारी विचारप्रणालींची हत्यारे परजण्यात आली. सांस्कृतिक विवेकाचे दिवाळे काढणारे राजकीय नेतृत्व आणि काही निर्णय यांनी समाजातील मानसिक परात्मभावाची (एलिअनेशनची) प्रक्रिया अधिकच प्रखर बनविली. सांस्कृतिक अस्मिता आणि पृथक्तावाद यांचा संभ्रम होत राहिला. संकुचित निष्ठा नि अस्मिता यांनी व्यापक एकात्म सांस्कृतिक समूहमनाच्या चिरफळ्या केल्या. साहित्यातील सवत्यासुभ्यांचा प्रश्न साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरुन चर्चिला गेला.

दलित साहित्याच्या वैचारिक पातळीवरील संकोचाला वर म्हटल्याप्रमाणे आपल्या समाजातील एकूणच सांस्कृतिक विचारांचा संकोच जबाबदार आहे हे खरे आहे. फुटीरतावादी विचार आपापल्या अनुयायांच्या मदतीने व सवत्यासुभ्यांच्या आधारे तथाकथित सामाजिक परिवर्तनाची साद देत आहेत. प्रत्येकालाच समग्र क्रांती हवी आहे आणि प्रत्येकाची आपापली अशी क्रांतिकारक विचारप्रणालीही तयार आहे सांस्कृतिक आकांक्षेचे नवे विस्तारित वातावरण शेवटी साकल्यात्मक सांस्कृतिक हिताहिताचा शांतपणाने मागोवा घेण्याच्या मनःस्थितीत नाही. या संकुचित निष्ठांनी समाजमन विदीर्ण होत चालले आहे. आणि विभक्त अस्मितांनी समाजहिताचे व्यापक परिदर्शन (परस्पेक्टिव्ह) धूसर बनविलेले आहे. आपल्या सगळ्याच सांस्कृतिक क्षेत्राचे राजकीयीकरण झालेले आहे आणि म्हणून सत्तासंपादन हेच संस्कृतिकारणाचेही उद्दिष्ट झालेले आहे. कलासाहित्याच्या प्रकृतीशी व विकासाशी हे विसंगत आहे, एवढेच नव्हे तर ते अनिष्टही आहे. राजकारणप्रवण विचारप्रणाल्या साहित्याच्या क्षेत्रात प्रभाव गाजवू लागल्या आहेत. तथापि सर्जनशीलतेचा दृष्टिपरिघ हा विचारप्रणालीय काचांच्या दृष्टिपरिघापेक्षा व्यापक असतो आणि कलासाहित्याचे एक मर्म विचारप्रणालीय दृष्टीने पाहता आले तरी त्यांची इतर मर्मे त्या दृष्टीच्या कक्षेत येत नाहीत. नामवंत दलित साहित्यकृतींची मराठी व्यथा या प्रकारची आहे. दलित विद्रोह व वेदना यांची व्यथा साचेबंदपणाने जाणून घेणाऱ्या समीक्षकांनी दलित साहित्यकृतींची ही व्यथा लक्षात घेतली नाही. तेही विद्यमान सांस्कृतिक वातावरणाच्या लाटेत साहित्यनिष्ठेचे भान हरवून बसले. पश्चिमी कला—साहित्यक्षेत्रात गेल्या शतकाच्या अखेरीपासून अनेक कला—वाङ्मयीन विचारप्रणाल्या व जाहीरनामे निर्माण झाले. नव्या कला—वाङ्मयीन निर्मितीचे कालोचित असे वैचारिक समर्थन व स्पष्टीकरण त्यातून मिळते. पण सर्जनशीलतेचा विकास आणि गतिमानता अबाधित राखण्यात त्या विचारप्रणाल्यांचा किंवा जाहीरनाम्यांचा फारसा उपयोग झालेला नाही. वाङ्मयीन निर्मितीचे खरे बलस्थान व खरी प्रेरणा जीवनाच्या यथार्थ आकलनात आणि मूल्यमापनातच असते, आणि

जीवनाचे यथार्थ आकलन व मूल्यमापन कोणत्याही विचारप्रणालीच्या चौकटीत बंदिस्त करण्यात फायदा नसतो.

दुसरे एक : दलित साहित्याचा अभ्यास हा समाजाच्या भाषिक वाङ्मयीन व्यवहारात एकजीव करण्याचे काम पुरेशा समाधानकारकपणे करण्यात आले नाही. केवळ उच्च मराठीच्या अभ्यासक्रमात दलित साहित्य अंतर्भूत करून हे काम होणार नाही असे मला वाटते. शालेय पाठ्यपुस्तकातून दलित साहित्याचा अंतर्भाव झाला आहे. आणि उच्च मराठीच्या अभ्यासक्रमातही शिफारस केली जाणारी दलित साहित्याची संपादित पुस्तके तयार झाली आहेत. मात्र या सर्व पाठ्यपुस्तकीय साहित्याचे यथार्थ आकलन कसे करावे हे मात्र नीटपणे मांडले गेलेले नाही. शैक्षणिक अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तके ही समाजाची वाङ्मयीन अभिरुची घडविणारी अत्यंत महत्त्वाची साधने आहेत. पण आदर्श ठरेल असे दलित साहित्याचे पाठ्यपुस्तक अजून निर्माण झालेले नाही. अपुऱ्या, अधुऱ्या, एकांगी वा उथळ पाठ्यपुस्तकांनी दलित साहित्याकडे पाहाण्याचा साचेबंद दृष्टिकोन रूढ होण्याची भीती आहे. तीच गोष्ट अभ्यासक्रमात समाविष्ट झालेल्या दलित साहित्यकृतींच्या बाबतीतही संभवते. केवळ सामाजिक अंगानेच पाठ्यपुस्तकातूनही दलित साहित्याचे विवेचन करण्यात येते. पुष्कळदा वाटते, आपला एकूणच साहित्यविचार केवढा प्रगल्भ आणि विकसित होण्याची गरज होती, तसा तो विकसित झाला नाही. याची किंमत दलित साहित्यासारख्या नव्या प्रवाहाला चुकती करावी लागेल हे ध्यानात ठेवले पाहिजे. प्रगल्भ, समतोल साहित्यविचार ही केवळ दलित साहित्याचीच गरज नाही, तर ती आपल्या एकूणच वाङ्मयीन संस्कृतीची गरज आहे. आणि संस्कृती व साहित्य यांच्यातील द्वंद्व यथार्थपणे जाणणे, हे समतोल साहित्यविचाराचे लक्ष्य आहे. स्वतंत्र नि वेगळा साहित्यविचार व सौंदर्यशास्त्र ही दलित साहित्याची गरज नाही. याचा अर्थ साहित्यनिर्मिती दलित या विशेषणाने काही बाबतीत लक्षणीय ठरत असली तरी तिचा वाङ्मयीन वेध घेणारा साहित्यविचार त्या विशेषणाने सीमित करण्याची गरज नाही. त्याचे खरे विशेषण मराठी हेच राखणे इष्ट ठरेल.

दलित साहित्याच्या संदर्भात आता नव्या व्यापक भूमिकेची गरज आहे व ही गरज दलित–दलितेतर या विभक्तीच्या निरपेक्षतेने आहे. त्याचप्रमाणे ही गरज व्यापक मराठी संस्कृतीच्या व साहित्याच्या संदर्भात आहे. मूलतः ही गरज समाजाच्या सर्जनशीलतेच्या सुप्त आणि उपेक्षित चैतन्यकेंद्रांचा विकास घडवून आणण्यासाठी आहे. नाना जातिजमातींमधील नवशिक्षित निर्मितिक्षम मने वाङ्मयीन अभिव्यक्तीच्या आकांक्षेने झपाटली जात आहेत. स्त्रिया, व्यावसायिक क्षेत्रातील माणसे, लष्करी व प्रशासकीय खात्यातील व्यक्ती, सामाजिक कार्यकर्ते इत्यादी वाङ्मयीन संस्कृतीच्या दालनात प्रवेश करण्यासाठी उत्सुक आहेत. विशिष्ट विचारप्रणालीचे बंधन वा बांधिलकी आपण ठायी ठायी सवतेसुभे उभारून पुरस्कृत करू लागलो तर नवोदित अभिव्यक्तिक्षम मनांची घातक कुचंबणा होण्याचा धोका आहे. दलितता ही आता केवळ वेदना आणि विद्रोहाची बाब राहिली नाही, तर ते अवघ्या समाजाचे आत्मशोध आणि आत्मबोध करून घेण्याचे विस्तृत आवाहन ठरले आहे. जातीजमातींची परंपरागत दलितता व आधुनिकतेने अधोरेखित केलेली दलितता यांच्यासंबंधीचे एक अपराधी समूहमन तयार झाले आहे. या अपराधी मनाचे ओझे वागविणारी जी सर्जनशील माणसे आहेत, ती दलित–दलितेतर या भेदाच्या पलीकडे उभी आहेत. या भेदांनी निर्माण केलेल्या विशिष्ट विचारप्रणाली अंगिकारण्याचा वा अव्हेरण्याचा विकल्प त्यांच्याजवळ आहे. हा विकल्प आपण नाकारता कामा नये. जन्मसिद्ध जातिविशेष आपण त्याज्य मानले आहेत, म्हणून जन्मसिद्ध दलितता हाच दलित साहित्याचा विषय समजण्याचे कारण नाही. त्याचप्रमाणे राजकीय नि सामाजिक आंदोलने आणि विचारप्रणाली आणि दलित साहित्य यांची समीकरणे मांडण्यातही फायदा नाही. दलितता ही मानव्याची कुरूप अन्याय्य अवस्था असेल तर तिचे चित्रण आधुनिक मनाला निश्चितच प्रत्ययकारी वाटते. पण दलिततेला विशेषणे लावून तिचा संकोच करता कामा नये. अवघ्या जगातील कामगारांना एका महामानवाने साद घातली होती. साहित्यक्षेत्री दलितत्वाची मक्तेदारी निर्माण होऊ नये, त्या क्षेत्राने दलिततेच्या सगळ्याच बळींना साद घातली तर दलित साहित्याचा प्रस्थानहेतू सफल होईल.

दलितपणाच्या अज्ञात ओसाडभूमीकडे प्रस्थान

करण्यासाठी सर्वांनीच प्रयत्न केले पाहिजेत. संस्कृति-वंचितता म्हणजे दलितता होय. आपल्या समाजातील स्त्री ही दलिततेचे सर्वांत मोठे रूप आहे. तिला जाति-जमातीच्या, धर्मांच्या मर्यादा नाहीत. कुटुंबापासून राजकीय क्षेत्रापर्यंत दलिततेची नाना रूपे अवघडून उभी आहेत. आजउद्याच्या दलित सर्जनशीलतेने या रूपांची आव्हाने पेलण्यास पुढे आले पाहिजे.

दलित साहित्यातील आवर्ताचा अलीकडे अनेकदा निर्देश करण्यात येतो. हा विषय वादाचा किंवा खरें तर वितंडवादाचा होऊही नये. दलित लेखक-कवींनी, त्यांच्या अभ्यासू रसिकवर्गाने आणि एकूणच मराठी साहित्याबद्दल आत्मीयता बाळगणाऱ्या अभ्यासकांनी अंतर्मुख होऊन या आवर्ताचा मागोवा घेतला पाहिजे. साहित्यक्षेत्रात आवर्तन हा एक नित्यनूतन प्रश्न असतो. कालमानानुसार त्याचे संदर्भ बदललेले असतात व म्हणून एकूणच वाङ्मयीन संस्कृतीला तो वरचेवर आव्हान देत असतो. नव्या साहित्यप्रवाहाच्या खंडन-मंडनाचे आवर्त हे साधन नव्हे आणि एखाद्या मताच्या विजयाचे वा पराजयाचे ते गमकही नव्हे. 'आवर्त' हा प्रश्न मोठा व महत्त्वाचा अभ्यासविषय आहे. विद्रोह, सामाजिक न्याय व परिवर्तन इत्यादीसंबंधी विशिष्ट भूमिका असणे, कथाकाव्यादि साहित्यनिर्मितीत त्या भूमिकांचा साचेबंद पुरस्कार करणे, या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. आणि त्यांचे वेगळेपण साहित्यनिर्मितीच्या संदर्भात शोधले पाहिजे. दलिततेची आपण स्वीकार-लेली भूमिका ही अवतीभवतीच्या प्रत्यक्ष वास्तवाशी निरंतरपणे ताडून पाहाणेही आवश्यक आहे. आपल्या अनुभवक्षेत्राचा आशय आणि आकार यांचा गुणात्मक आणि संख्यात्मक दृष्टींनी संकोच करणारे जे जे काही आहे असे वाटते, ते ते कटाक्षाने दूर सारले पाहिजे. स्वानुभवांचे रंगरूप हे आत्मनिष्ठेच्या मर्ढेकरी तत्त्वा-नुसार सतत पारखले पाहिजे. एके काळी आपल्या समा-जात सृजनशीलतेचा संकोच करण्यात आला होता. तशा प्रकारचा संकोच पुन्हा घडू नये यासाठी दलितांसकट समाजातील सगळ्या सृजनशील मनांनी दक्ष राहिले पाहिजे. आवर्त हे क्षीण अदक्ष आणि कृत्रिम अशा सर्जनशीलतेचे निदर्शक असते. म्हणजे आवर्ताची मुळे साहित्याचा विषय होणाऱ्या अनुभवक्षेत्रात किंवा वास्तवात नसतात, तर ती त्या अनुभवक्षेत्राचा आणि वास्तवाचा वेध घेणाऱ्या संवेदन-क्षमतेत असतात. दलित आणि इतरही मराठी साहित्यात आवर्त संभवते. तेव्हा या वस्तुस्थितीचा विचार संबंधितांनी करणे इष्ट ठरते. दलितांनी दलित विषया-वरच लिहावे आणि दलितेतरांनी दलितेतर विषयांवरच लिहावे, अशा प्रकारचे व्यक्तिगत आणि सामूहिक दंडक त्याज्यच मानले पाहिजेत. सामाजिक आंदोलनाचे जे दलित आशय, विषय व आकार आहेत, तेच आशय, विषय व आकार सर्जनशीलतेचेही आहेत, हेही समीकरण संकोचकारक ठरते. थोडक्यात, अधिक खुल्या मनाने, अधिक मोकळेपणाने आणि अधिक दक्षतेने अवतीभोवती पाहाणे ही दलित सर्जनशीलतेची गरज आहे. आंदोल-नात्मक आणि विचारप्रणालीय अशा संकुचित कक्षेत सतत मनाने गुंतून राहाणे निर्मितिक्षमतेला पोषक ठरणार नाही. विद्रोह विचारसरणीतील विद्रोह्य परंपरांची सतत बेरीज-वजाबाकी मांडण्यातही फारसा अर्थ नाही. कारण याबाबतीत आधुनिकतेचे जे निकष संभवतात, ते निकष समाजातील सर्वच जाणकारांनी मान्य केलेले आहेत. अनिष्ट व अन्याय्य परंपरांसंबंधी समाजाचे अपराधी मन जागृत करावयाचे, तर त्या मनाचा मनपणा शाबूत ठेवला पाहिजे. आपली अपराधी जाणीव जपण्याचा समतोलपणा त्याला राखता आला पाहिजे. आणि मान-सिक अंतरायाला ते बळी पडणार नाही याचीही काळजी घेतली पाहिजे. विद्रोह्य समाज व परंपरा यांना सतत आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करण्याने हे साध्य होईल काय ? साहित्याचा अवतार यासाठी असतो काय ? हृदयपरिवर्तनाची वाङ्मयीन रीत अशी नसते असे मला वाटते.

मराठी साहित्याच्या इतिहासात एकदा भगवी पहाट अवतरली, नंतर निळी, पुढे तांबडी. पण या सर्व पहाटा इतिहासाची अपत्ये असतात. प्रतिभा ज्या कला-निर्मितीचा वसा घेऊन नियतीशी करार करीत असते, ती कलानिर्मिती इतिहासाचे केवळ अपत्य ठरू इच्छीत नाही. ती इतिहासाच्या दोन पावले पुढे राहाते. दलित साहित्याच्या नागसेनवनात मनाने सिंहावलोकन करीत असताना आज हेच जाणवते. हे स्वप्न तर नाही ना ? उद्याचे मराठी साहित्यच याचे उत्तर देईल.

□

# ‘अस्मितादर्श’चे ऐतिहासिक कार्य

प्रा. डॉ. कृष्णा किरवले

एखादे वाङ्मयीन नियतकालिक सलगपणे वीस वर्षे वाटचाल करते याला फार मोठा अर्थ आहे. वस्तुतः ही वाटचाल काटेरी असते. अन्यान्य कारणांनी अशी नियतकालिके बंद पडतात. काहींचे ऐतिहासिक कार्य संपलेले असते म्हणून त्यांचे थांबणे अपरिहार्य असते. परंतु ज्या नियतकालिकास प्रयोजनमूल्य आहे असे नियतकालिक अपवादानेच टिकू शकते. दलित साहित्याचे मुखपत्र म्हणून दोन दशके आपला समर्थ व समृद्ध प्रवास करणारे ‘अस्मितादर्श’सारखे नियतकालिक रौप्यमहोत्सवाकडे डोळे उघडे ठेवून प्रवास करीत आहे ही घटना ऐतिहासिक अशीच आहे.

‘अस्मितादर्श’ म्हणजे अस्मितेचा आरसा. ही अस्मिता कोणाची? डॉ. बाबासाहेब आंबेडकर नावाच्या सूर्यकुलातील पुरुषाने ज्या बहिष्कृतांची अस्मिता जागवली ती ही अस्मिता होय. या दलितांच्या आत्मजागृतीची ठिणगी शब्दबद्ध झाली आणि ती ‘अस्मितादर्श’सारख्या नव्या वाङ्मयीन जाणिवा आणि वाङ्मयीन प्रवृत्ती जोपासणाऱ्या नियतकालिकाने तीस प्रकाशरूप दिले आणि ‘अस्मितादर्श’ ही एक सांस्कृतिक चळवळ झाली. ‘अस्मितादर्श’मधील दर्जेदार साहित्याने महाराष्ट्रातीलच नव्हे तर भारतातल्या भिन्न भिन्न प्रांतातील साहित्यिकांना व साहित्यप्रेमींना तसेच परदेशातील साहित्य व समाज या विषयाच्या अभ्यासकांना अभ्यासविषय पुरविले आणि दलित साहित्याची बैठक भक्कम झाली.

‘अस्मितादर्श’ने सातत्याने नव्या जाणिवांचे लेखन करणाऱ्या नव्या लेखकांचा शोध घेतला आहे. प्रारंभीच्या काळात नव्या लेखकाला प्रोत्साहनाची नितांत गरज असते. नाही तर तेजस्वी अंकुरही करपून जाण्याची भीती असते. दलितातील नव्या लेखकांच्या उन्मेषांना जपणे, संवर्धित करणे आणि त्यांना जगण्याचे आश्वासन देणे अशा अवस्थेत अपरिहार्य असते. ‘अ. द.’ ने आपल्या कर्तव्यभावनेने ते कार्य केले आहे हे दोन दशकातील वाटचाल पाहाताना सहजच लक्षात येते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची मानवी संवेदना, क्रांतीचे तत्त्वज्ञान आणि सामाजिक न्यायमूल्यांची जाणीव ‘अस्मितादर्श’ने प्रेरणा मानली आणि नियतकालिकांच्या जगात भक्कम असे पाय रोवले.

‘अस्मितादर्श’ने दलित साहित्य चळवळीचा पुरस्कार केला तेव्हा या साहित्याकडे व चळवळीकडे साशंकतेने पाहिले गेले. ती कशी ठेचता येईल याची जाहीर चर्चाही झाली. साहित्य हे एकच असते, दलित साहित्य असे वेगळे नसते, आणि त्याच्या वहनाचे कार्य करणाऱ्या नियतकालिकाची गरज तरी काय? अशा विचारांनी एक प्रकारची भीती निर्माण केली गेली. वस्तुतः ही नव्या उपक्रमांना नाकारण्याची शक्कल होती. परंतु त्यातही साहित्याभ्यासकांचा असा एक वर्ग होता, ज्याने साहित्यातील नव्या वियाणांना अचूकपणे हेरले होते. मराठी साहित्याचे अनुभवक्षेत्र दलित अनुभवांनी विस्तारणार आहे ह्याचे स्वागतच त्यांनी केले होते. दलित साहित्यातील दलित आणि साहित्य ह्या दोहोंचाही अपरिहार्यपणे विचार करायला हवा, म्हणजे पारंपरिक निखळ साहित्याचा विचार करून चालणार नाही, तर साहित्य आणि समाज, साहित्य आणि संस्कृती असा विचार करावा लागणार आहे, अशी दृष्टी मांडली गेली. साहित्याच्या संदर्भात ही चर्चा महत्त्वाची होती.

दलित ही संज्ञा एका विशिष्ट जातीचा संकेत करणारी नाही, तर ती एक जाणीव आहे, ह्यामुळे दलित साहित्य हे कोण्या एका मोठ्या वर्तुळातील छोटे वर्तुळ वगैरे कल्पना चुकीच्या होत्या. ग्रामीण समाज मोठा आहे म्हणून ग्रामीण साहित्याचा परीघ मोठा आहे. म्हणून हेच खरे मराठी साहित्य, असा आग्रहही धरण्यात आला. परंतु दलित साहित्य हे पारंपरिक समाजव्यवस्थेला आणि साहित्यकल्पनांना छेद देत गतिमान झाले आहे, ते नव्या मानवी संवेदनांना सामोरे जाऊन नवे

अनुभवविश्व शब्दांकित करीत आहे हे दुर्लक्षिता येत नाही. 'अस्मितादर्श' मधून अशा नव्या वाङ्मयीन जाणिवांचे साहित्य प्रकाशित होऊ लागले. या साहित्याचे स्वरूप वैविध्यपूर्ण असे आहे. कथा, कविता, नाट्य, लघुकादंबरी ही 'अ. द.' च्या अंकातून तर प्रकाशित झालीच, परंतु साहित्य, समाज व संस्कृतीविषयक संशोधनपर व वैचारिक लेखनही प्रकाशित झालें. दलित जगाशी संबंधित असणाऱ्या प्रश्नांचा मागोवा घेण्यात आला. त्या दृष्टीने काही लेखमालांचा निर्देश करणे प्रस्तुत ठरावे. प्रा. कु. ल. महाले हृयांचे विश्वविख्यात विचारवंत डॉ. डी. डी. कोसंबी यांच्या इतिहास व संस्कृतीसंबंधाने व्यक्त केलेल्या विचारांचा परामर्श घेणारे लेख, श्री. प. सु. मोरे हृयांचे आदिवासींच्या जीवन व साहित्याचे दर्शन घडविणारे लेख, निग्रो जीवन आणि साहित्याचा डॉ. जनार्दन वाघमारे हृयांनी चितारलेला आलेख, सुधाकर गायकवाड हृयांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारधनाचा घेतलेला मागोवा, दलित कवितेची मूलभूत समीक्षा करणारे डॉ. म. सु. पाटील यांचे लेख, इंग्रजपूर्व प्राचीन सत्ता आणि अस्पृश्यता यांची मीमांसा करणारे डॉ. एन. जी. भवरे यांचे लेख अभ्यासकांना उपयुक्त ठरलेले आहेत. डॉ. इंदुमती शेवडे यांची दलित कथेवरील लेखमालाही उद्बोधक व अभ्यासपूर्ण आहे. प्रा. म. भि. चिटणीस आणि प्रा. रावसाहेब कसबे यांनी आपल्या अनेक लेखातून दलित मानस, समाजव्यवस्था, धर्मदास्य यासंबंधाने मूलभूत अशी चर्चा केलेली आहे. संतसाहित्य आणि दलित साहित्य, मार्क्सवाद आणि दलित साहित्य, ग्रामीण साहित्य आणि दलित साहित्य अशी तौलनिक चर्चा 'अ. द.' मधून आलीच आहे. पण त्याचबरोबर वाङ्मयीन व समीक्षाविषयक अनेक प्रश्नांचा ऊहापोह करण्यात आला आहे. मराठीतील अनेक मान्यवरांनी साहित्य आणि समीक्षा या संदर्भात मांडलेले विचार महत्त्वपूर्ण आहेत. त्यामुळे दलित साहित्यिकांची आणि दलित साहित्याच्या अभ्यासकांची फार मोठी सोय झाली.

'अस्मितादर्श'चे एक वैशिष्ट्य म्हणजे आयोजिलेले परिसंवाद. परिसंवादांचे विषय वाङ्मयीन तर आहेतच, परंतु भारतीय जीवनाला ग्रासणाऱ्या अनेक प्रश्नांना लक्ष्य करून विचारविमर्ष केला आहे. दलितांच्या सांस्कृतिक चळवळीच्या भवितव्याचा विचार करताना डॉ. आंबेडकरांनी दिलेला वैचारिक वारसा लक्षात घेऊन, त्याचे संदर्भ समजावून घेण्याची गरज ग. त्र्यं. माडखोलकर यांनी विशद केली होती (अ. द. दि. अं. १९७४), तर दलितांना निराळ्या सवलती दिल्या जातात, पण निराळे शिक्षण दिले जात नाही अशी तक्रार प्रा. नरहर कुरुंदकर यांनी केली होती (अ. द. दि. अं. १९७४). 'धर्मदास्य, लोकशाहीविवेक आणि दलित-मुक्ती' या परिसंवादात (१९७७ दि. अं.) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी धर्मदास्यासंबंधी केलेली चिकित्सा, 'गेल्या आठ वर्षातील मराठी वाङ्मय. १९६० ते १९६८ : या परिसंवादातील (दि. अं. १९६८) प्रा. भालचंद्र नेमाडे यांनी मराठी वाङ्मयाचा काढलेला एक्सरे, आणि त्यानंतर 'दलित स्त्री : काल, आज आणि उद्या', 'दलित कथा : वाटा आणि वळणे', 'मराठी साहित्यातील सामाजिक लोकशाहीचा विचार' यांसारख्या परिसंवादात प्रा. वा. ल. कुलकर्णी, डॉ. भालचंद्र फडके यांच्यापासून तो प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. रा. ग. जाधव यांच्यापर्यंतचा सहभाग मौलिक असाच आहे. 'दलित कवितेचे निराळेपण', 'दलित रंगभूमी : स्वरूप आणि दिशा', नामांतर : एक सांस्कृतिक चळवळ' या परिसंवादातील प्रा. व. दि. कुलकर्णी, ताराचंद्र खांडेकर, श्री. वसंत मून इ. लेखकांनी आपल्या विचारप्रवर्तक अशा भूमिका मांडल्या आहेत. या सर्व परिसंवादातील विचारातून दलित साहित्य व समाजविषयक अनेक अनुत्तरित प्रश्नांना वाचा फोडली असून, साहित्य व समाजाची समीक्षा केलेली आहे.

मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात ज्याची खूप चर्चा झाली असे 'अस्मितादर्श' चे काही विशेषांक संदर्भग्रंथ म्हणूनच उल्लेखावे लागतील. 'दलित साहित्य विशेषांक', 'दलित कथा विशेषांक', 'दलित कविता विशेषांक', 'शिक्षण व संस्कृती विशेषांक', 'दलित स्त्री विशेषांक', 'दलित आत्मकथन विशेषांक', 'दलित शाहीर व शाहिरी विशेषांक' या विशेषांकांनी दलित वाङ्मयाच्या अनुषंगाने संभवणाऱ्या अनेक प्रश्नांची विशेषत्वाने चर्चा केली आहे. अनेक शोधप्रबंधांना मूलद्रव्य हृयाच विशेषांकांनी पुरविले आहे. किती तरी अलक्षित व अज्ञात विषयांना स्पर्श केल्यामुळे मराठी वाङ्मयीन नियतकालिकांच्या इतिहासात हृया विशेषांकांचे गौरवपूर्ण

स्थान आहे.

सामाजिक क्षेत्रात आयुष्य वेचलेल्या स्त्री-पुरुषांच्या मुलाखती, महाडच्या व काळाराम मंदिरप्रवेश सत्याग्रहात सामील झालेल्या व्यक्तींचे अनुभव, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, बाबूराव बागूल यांच्या मुलाखतीतून व्यक्त झालेले चिंतन, डॉ. गंगाधर पानतावणे ह्यांनी सुप्रसिद्ध लेखक भगवानदास यांच्या 'मैं भंगी हूँ' या ख्यातकीर्त पुस्तकातील काही प्रकरणांचा केलेला मराठी अनुवाद, विविध साहित्यसंमेलनातील अध्यक्षीय भाषणे, पु. ल. देशपांडे, डॉ. सदा कऱ्हाडे, पु. श्री. नेरूरकर, केशव मेश्राम प्रभृतींनी मराठी साहित्यातील वृत्ती-प्रवृत्तींवर केलेली मुक्त चर्चा, जुन्या पिढीतील नामवंत लेखक रा. ना. चव्हाण यांचे आधुनिक काळातील समाजचिंतकांच्या जीवन व कार्याची चिकित्सा करणारे लेख, तसेच सिंधू संस्कृतीसंबंधीच्या महत्त्वपूर्ण संशोधनाचा मागोवा घेणारे संशोधक प्र. रा. देशमुख यांचे लेख, तसेच प्रा. शरद्चंद्र मुक्तिबोध यांचे दलित साहित्याची मीमांसा करणारे लेख, असे विविध प्रकारचे लेखन 'अस्मितादर्श' मध्ये प्रकाशित झाले आहे.

'अस्मितादर्श' ची मुखपृष्ठे आणि आतील रेखाटणे सामाजिक आशयांकित अशीच असतात. दलित चित्रकला आपले स्वत्व शोधू लागली आहे ह्याचेच ते प्रतीक होय. या चित्रविश्वातून दलित जाणिवा प्रतीकात्मरूपाने प्रकट होताना दिसतात. दलित जाणिवांची विविध रूपे जशी काव्यातून व्यक्त होत आहेत तशीच दलित चित्रकार आपल्या चित्रातून आपल्या जाणिवा व्यक्त करीत आहेत. अस्मितादर्शची मुखपृष्ठे व रेखाटणे सामाजिक आशय आणि जाणिवांनी व्याप्त आहेत. भ. मा. परसवाळे, भाऊ समर्थ, श्रीधर अंभोरे, प्रकाश कामतीकर, दासू भगत, राजीव गायकवाड, दिलीप सूर्यवंशी ह्या चित्रकारांचे योगदान सदैव 'अ. द.' ला लाभले आहे. श्रीधर अंभोरे यांना तर सामाजिक आशयाच्या 'अस्मितादर्श' मधील चित्रांबद्दल 'फाय फाउंडेशन' चे दशसहस्र रुपयांचे पारितोषिकही प्राप्त झाले आहे.

दलित साहित्याचे संपन्न असे दालन म्हणजे कविता. मराठी कवितेलाच एक नवा आशय देण्याचे कार्य दलित कवितेने केले आहे. 'अस्मितादर्श' मधील प्रकाशित होणाऱ्या कवितांकडे कटाक्ष टाकताना असे लक्षात येईल की, दलित कवींची एक पिढीच्या पिढीच येऊन उदयाला आली आहे. अनेक कवींच्या पहिल्या कविता 'अ. द.' नेच प्रकाशित केल्या आहेत. आणि त्यानंतर समर्थ अशी कविता घडत गेली आहे. नामदेव ढसाळ, ज. वि. पवार, त्र्यंबक सपकाळे, फ. मु. शिंदे, दामोदर मोरे यांसारख्या नामवंत कवींचे पहिले लेखन येथेच प्रकाशित झाले आहे. दया पवार, यशवंत मनोहर, वामन निंबाळकर, शरणकुमार लिंबाळे, माधव कोंडविलकर, वसेकरद्वय, ऋषिकेश कांबळे इ. कवींची कविता विशेषत्वाने 'अस्मितादर्श' मधूनच प्रकाशित झाली आहे. हे सारे अस्मितादर्श परिवारातील आहेत. आजच्या बहुतांशी सर्व दलित कवींच्या कविता 'अ. द.' मधून प्रकाशित झाल्या आहेत. कथालेखनाच्या क्षेत्रातही किती तरी भूषण वाटावीत अशी नावे आहेत. योगीराज वाघमारे, भास्कर चंदनशीव, भिमराव शिरवाळे, योगेंद्र मेश्राम, अमिताभ वामन होवाळ ही बिनीची नावे. शंकरराव खरातांचे सातत्याने कथालेखन 'अ. द.' मधून प्रकाशित होत असते. एकांकिका लेखनाच्या क्षेत्रातील दत्ता भगत व प्रेमानंद गज्वी ही नावे 'अस्मितादर्श' चीच. आता ही नावे प्रतिष्ठित झाली आहेत. आत्मकथनाच्या क्षेत्रातीलही पहिले लेखन अस्मितादर्शमधूनच आले. प्र. ई. सोनकांबळे यांचे 'आठवणींचे पक्षी' आणि प्रा. कुमुद पावडे ह्यांचा 'अंतःस्फोट' अस्मितादर्शनेच घडविलेले.

दोन बाबींचा उल्लेख करणेही जरूर आहे. प्रकाशनाच्या क्षेत्रातील 'अ. द.' चे पाऊल प्रतिष्ठित होते. परंतु ते मध्येच खंडित झालेले दिसते. परंतु 'अ. द.' प्रकाशनाची चार पुस्तके दलित साहित्य चळवळीच्या इतिहासात महत्त्वपूर्ण मानली जातात. कवी फ. मुं. शिंदे यांचा 'जुलूस' हा काव्यसंग्रह प्रकाशित करून प्रकाशनाने या क्षेत्रात पदार्पण केले. त्यानंतर वामन निंबाळकरांचा 'गावकुसाबाहेरील कविता' आणि त्र्यंबक सपकाळे यांचा 'सुरुंग' हे काव्यसंग्रह प्रकाशित झाले. गंगाधर पानतावणे यांचे 'मूल्यवेध' हे समीक्षेचे पुस्तकही प्रकाशित करण्यात आले. या चारही पुस्तकांची चर्चा विपुल झाली ती त्यातील अंगभूत गुणांमुळे. 'सुरुंग' ला तर महाराष्ट्र शासनाचा 'केशवसुत पुरस्कार' ही प्राप्त झाला.

दुसरी उल्लेखनीय बाब म्हणजे १९७४ सालापासून भरविण्यात येणारा अस्मितादर्श लेखक, वाचक व

साहित्यप्रेमींचा वार्षिक साहित्य मेळावा. महाराष्ट्रात एखाद्या वाङ्मयीन नियतकालिकाने दरवर्षी भरविलेला साहित्यमेळावा म्हणून केवळ 'अ. द.' चाच उल्लेख करावा लागेल. असा पायंडा याच नियतकालिकाने पाडला. आता काही वाङ्मयीन नियतकालिके असे मेळावे भरवू लागली आहेत. या मेळाव्यास जत्रेचे स्वरूप नसते, तर सर्व लेखक स्वखर्चाने या मेळाव्यात सहभागी होतात. दोन दिवस वाङ्मयीन व सांस्कृतिक प्रश्नांवर या मेळाव्यात चर्चा होते. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून आणि महाराष्ट्राबाहेरूनही दलित व दलितेतर लेखक यात आवर्जून सहभागी होतात. हा मेळावा म्हणजे वाङ्मयीन निर्मितीचा ताळेबंद हिशेब आणि नवे संकल्प यांचे प्रतीकच. अनेक नव्या लेखकांना नवी दृष्टी प्राप्त होते. दलित साहित्याच्या चळवळीला दिशा देण्याचे महत्त्वपूर्ण कार्य या मेळाव्याने केले आहे.

गेली दोन दशके समर्थपणे वाङ्मयीन क्षेत्रात कार्य करणाऱ्या 'अस्मितादर्श' ला मुंबई मराठी पत्रकार संघाचे उत्कृष्ट दिवाळी विशेषांकाचे पारितोषिक १९७६ साली प्राप्त झाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेनेही १९८० सालच्या दिवाळी अंकास उत्कृष्ट संपादनाचे पारितोषिक देऊन गौरविले आहे.

कविवर्य कुसुमाग्रज यांनी नासिकच्या १९ व्या 'अ. द.' मेळाव्याच्या वेळी मेळाव्याचे उद्घाटन करताना 'अस्मितादर्श' च्या ऐतिहासिक कार्याविषयी जे उद्गार काढले होते ते येथे उद्धृत करणे प्रस्तुत व आवश्यक आहे. ते म्हणाले होते,.'अस्मितादर्श मासिक गेली १९ वर्षे चाललेले आहे. आणि या सर्व पूर्वीच्या इतिहासाकडे पाहून खरोखर मला अतिशय आश्चर्य वाटते की, काहीही भांडवल नसताना, कोणत्याही प्रकारचे साहाय्य नसताना हे मासिक इथपर्यंत येऊन पोहोचलेले आहे. वाङ्मयीन मासिकांच्या बाबतीत आपल्याला माहिती आहे. केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर सर्वत्रच वाङ्मयीन मासिके ही सहसा तग धरीत नाहीत. टिकत नाहीत. माळावरचं रोपटं केव्हा उमलतं आणि केव्हा नाहीसं होतं हे ज्याप्रमाणे समजत नाही त्याप्रमाणे ही मासिकं असतात. केव्हा उदयाला येतात आणि केव्हा विलयाला जातात हे लक्षात येत नाही. सुदैवाने अस्मितादर्शच्या बाबतीत असे झालेले नाही याचे कारण सुदैव, दैव किंवा नशीब नसून ते सर्व श्रेय एका माणसाचे आहे, आणि ते म्हणजे प्रा. पानतावणे यांचे. खरोखर मी विचार करायला लागतो. आणि ह्या संबंधामध्ये मलाही थोडासा अनुभव आहे. माझ्या मित्रांचाही अनुभव आहे. तेव्हा या माणसाने या मासिकासाठी किती संकटं सहन केली असतील, प्रपंचामधल्या सर्वसाधारण सर्व सुखसोयींना आपल्या घराचे दरवाजे कितीदा बंद केले असतील आणि वैफल्याचे, निराशेचे डोंगरघाट निष्ठेने कितीदा ओलांडून गेले असतील याची कल्पना मी कवी असून मला करता येत नाही, इतकी प्रचंड साधना या मासिकाच्या पाठीमागे आहे. आणि म्हणून थोडीशीही अतिशयोक्ती न करता मी असे म्हणेन की, मराठी मासिकांच्या इतिहासात, विशेषत: मराठी सांस्कृतिक-वाङ्मयीन मासिकांच्या इतिहासात 'अस्मितादर्श आणि पानतावणे' ही अक्षरे सोनेरी अक्षरात नव्हे, तर सोन्याच्या अक्षरात लिहायला पाहिजेत इतके त्यांचे मोल आहे.'

## साभार स्वीकार

### कविता

**यक्षरात्र** : अरुणा ढेरे; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. २५ ✡ **नववधू** : द. दा. दीक्षित; सौ. शालिनी दीक्षित, वडोदे; १९८५ रु. १८ ✡ **भावपिसारा** : दत्ता डांगे संपा ; आविष्कार साहित्यमंडळ, नांदेड; १९८७ रु. १० ✡ **प्रणव** : जगदीश देवपूरकर; कविता प्रकाशन, धुळे; १९८७ रु. १५ ✡ **आकाशपाखरू** : सौ. सिंधू कुलकर्णी; सौ. इंदुमती बडवे, पुणे; १९८७ रु. १५ ✡ **निरन्वय** : नीरजा; मधुश्री प्रकाशन, पर्वती, पुणे ९; १९८७ रु. १५

# कन्नड दलित साहित्य

## (डॉ. शांतिनाथ देसाई यांची मुलाखत)

### डॉ. प्रभाकर पाटील

(डॉ. शांतिनाथ देसाई हे कन्नडमधील अग्रगण्य कादंबरीकार आणि नवकथाकार आहेत. सध्या ते कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठात इंग्लिश विभाग प्रमुख म्हणून काम करतात. त्यांच्या 'मुक्ती', 'विक्षेप', 'सृष्टी', 'संबंध' इ. कादंबऱ्या आणि 'राक्षस', 'मंजुगड्डे', 'क्षितिज', 'परिवर्तन' इ. कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'राक्षस' या कथासंग्रहास कर्नाटक साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभला आहे. 'साहित्य मत्तु भाषे', 'नवसाहित्यदर्शन' इ. समीक्षाग्रंथ त्यांनी लिहिले आहेत. ह. ना. आपटे यांच्या 'मी' या मराठी कादंबरीचा त्यांनी कन्नडमध्ये अनुवाद केला असून, आठ इंग्रजी ग्रंथांचे संपादनही केले आहे. त्यांचे अनेक संशोधनपर लेख विविध नियतकालिकातून प्रसिद्ध झाले आहेत. डॉ. शांतिनाथ देसाई या कन्नडमधील नामवंत साहित्यिकाचे कन्नड दलित साहित्यविषयक विचार मुलाखतरूपाने पुढे देत आहोत. ही मुलाखत डॉ. देसाई यांचे सहकारी डॉ. प्रभाकर पाटील यांनी घेतलेली आहे.)

**डॉ. प्रभाकर पाटील**–मराठीमध्ये जसे दलित वाङ्मय आहे, म्हणजे दलितांनी दलित जीवनाविषयी लिहिलेले वाङ्मय, तसे कन्नडमध्ये आहे काय? अर्थात असणारच. परंतु ती जशी इथे एक वाङ्मयीन आणि सांस्कृतिक चळवळ आहे तशी ती कन्नडमध्ये आहे का?

**डॉ. शांतिनाथ देसाई**– तुम्ही ज्या अर्थाने दलित साहित्य म्हणता आहात त्या अर्थाने कन्नडमध्ये ७० च्या नंतर तशा प्रकारच्या साहित्याची निर्मिती होऊ लागली. परंतु ती स्वतंत्ररीत्या वाङ्मयीन–सांस्कृतिक अशी चळवळ झाली नाही. महाराष्ट्रात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा राजकीय व शैक्षणिक क्षेत्रामध्ये प्रत्यक्ष व जबरदस्त प्रभाव असल्यामुळे दलित साहित्याची निर्मिती ६० ते ७० च्या दरम्यान उत्कटतेने सुरू झाली. पण कन्नडमध्ये डॉ. आंबेडकरांचा प्रभाव थोडा उशीरा झाला व त्याचे स्वरूप राजकीय नव्हते. त्यामुळे कन्नडमधील दलित वाङ्मयाचे चळवळीत रूपांतर झाले नाही.

**प्र. पा.**– कन्नड दलित साहित्य हे आंतरप्रांतीय प्रभावाचे व भौगोलिक जवळीक असण्याचे उदाहरण आहे असे म्हणता येईल का?

**शां. दे.**– एका अर्थाने असे म्हणता येईल. एक समीक्षक असे म्हणतो की 'शेजारच्या महाराष्ट्र राज्यातील दलित पँथरचे ध्येय–धोरण कर्नाटकातील दलित तरुणांनी स्वीकारले होते.' कन्नड दलित लेखकांनी तसे मराठी दलित वाङ्मय वाचलेले नव्हते. त्याविषयी त्यांनी ऐकले होते. व कदाचित् ते वाङ्मय त्यांना भाषांतरित स्वरूपात माहिती असावे. वस्तुत: वेगवेगळ्या प्रांतातील दलित साहित्य हे समान सामाजिक व सांस्कृतिक प्रक्रियेचे फळ आहे.

**प्र. पा.**– ज्याला खऱ्या अर्थाने दलित कृती म्हणता येईल अशा प्रकारचे साहित्य कन्नडमध्ये नेमके केव्हा प्रसिद्ध झाले?

**शां. दे.**– मला वाटते की, १९७२–१९७३ मध्ये प्रसिद्ध झालेला सिद्धलिंगय्या यांचा 'होलेमादिगरहाडु' (The songs of the matangas) काव्यसंग्रह ही पहिली दलित साहित्यकृती म्हणता येईल. आमच्यासारख्या नवसाहित्यिकांना सिद्धलिंगय्या यांची कविता विद्रोही, उद्रेकी, तसेच अतिशय साधी, घोषणात्मक स्वरूपाची अशी वाटली. पण नंतरच्या दलित काव्यावर त्यांचा ठसा मात्र कायम स्वरूपाचा उमटला. त्याच वर्षी दुसरा एक दलित लेखक, की ज्याने नवसाहित्याच्या

परंपरेत राहून सूक्ष्मतेचे व संकीर्णतेचे भान राखून लेखन केले, त्याचा 'द्यावनूरू' नावाचा कथासंग्रह प्रसिद्ध झाला. त्याचे नाव देवनूर महादेव. समीक्षकांनी त्यांची कथा उचलून धरली. पण सिद्धलिंगय्यांच्या काव्यातील बंडखोरपणामुळे ते अस्वस्थ झाले. या नवीन प्रकट होत असलेल्या दलित प्रज्ञेला एक नाट्यमय अभिव्यक्ती १९७४ मध्ये एका दलित मंत्र्याने–बसवलिंगप्पा यांनी दिली. म्हैसूरमध्ये केलेल्या एका सार्वजनिक भाषणामध्ये त्यांनी एक खळबळजनक विधान केले: 'आजपर्यंतचे कन्नड साहित्य भुसा आहे.' त्यांच्या मते हे कन्नड साहित्य हिंदू धर्मातील वर्णव्यवस्थेचा पुरस्कार करणारे असल्यामुळे सद्य:स्थितीशी गैरलागू असून निरुपयोगी आहे. याच वर्षी दलित युवकांनी 'कर्नाटक दलित संघर्ष समिती' स्थापना केली. या कामात ब्राह्मणविरोधी लेखकसंघ 'बोक्कट' निर्माण होऊन, त्याने दलित लेखकांना आपल्यात समाविष्ट करून घेतले. यातून १९७५ च्या सुमारास 'बंडायसाहित्य' ही चळवळ सुरू झाली.

**प्र. पा.–** म्हणजे दलित साहित्याने आपले स्वत:चे अस्तित्व घालवले का ?

**शां. दे.–** एका दृष्टीने हे खरे असले तरी दलित साहित्याला एक व्यापक चौकट मिळाली. म्हणजेच त्यांनी सर्व प्रकारच्या शोषणाविरुद्ध व पुरोहितशाहीविरुद्ध बंड करण्याचा मानवतावादी दृष्टिकोन स्वीकारला.

**प्र. पा.–** मराठीतील दलित साहित्याच्या तुलनेने कन्नडमध्ये असे साहित्य किती प्रमाणात लिहिले जाते ?

**शां. दे.–** खरे सांगायचे तर त्याचे प्रमाण खूपच कमी आहे. काव्य व लघुकथा या वाङ्मयीन प्रकारांमध्ये पुष्कळसे लिहिले गेले आहे. दोन-तीन कादंबऱ्या व तीन-चार नाटके सोडली तर दलित साहित्याची अभिव्यक्ती या प्रकारात फारशी झालेली नाही.

**प्र. पा.–** तुमच्या मते चांगले असे दलित साहित्यिक कोण ? व त्यांच्या नाव घेण्यासारख्या साहित्यकृती कोणत्या ?

**शां. दे.–**देवनूर महादेव आणि सण्णप्पा हे उच्च प्रतीचे कथालेखक आहेत. देवनूर महादेवांचा 'द्यावनूरू' हा कथासंग्रह, 'ओडताळ' ही प्रदीर्घ कथा व 'कुसुमबाले' ही कादंबरी या साहित्यकृती श्रेष्ठ दर्जाच्या आहेत. 'ओडताळ' ही तर 'क्लासिक' गणली जाते. सिद्धलिंगय्या व चन्नण्णा वालीकर हे चांगले कवी म्हणून प्रसिद्ध आहेत.

**प्र. पा.–** मराठीमध्ये दलित साहित्य प्रामुख्याने आत्मचरित्र या प्रकारात आढळते. तशी कन्नडमध्ये दलित आत्मचरित्रे आहेत का ?

**शां. दे.–** कन्नडमध्ये आत्मचरित्रे नाहीत. आम्ही काहीजणांनी 'बलुतं' व 'उपरा' इत्यादी आत्मचरित्रातील काही उताऱ्यांची भाषांतरे 'लंकेश पत्रिके' व 'रुजुवातु' सारख्या नियतकालिकांमधून प्रसिद्ध केली. शिवाय आम्ही दलित साहित्यकाला अशा प्रकारचे लेखन करण्याची प्रेरणा दिली. तरी पण कन्नड दलित लेखकांनी यामध्ये काही आस्था दाखवली नाही.

**प्र. पा.–** याची कारणे कोणती असावीत ?

**शां. दे.–** हे सांगणे अवघड आहे. तरी पण असे म्हणता येईल की, महाराष्ट्रात वैचारिक क्रांती व अस्मितेची जाणीव प्रकर्षाने झाल्यामुळे लेखकांचा आत्मविश्वास आणि धीटपणा वाढला आणि ते स्वत:च्या जीवनाबद्दल स्पष्टपणे, उघडपणे व विश्लेषणात्मक स्वरूपाचे लेखन स्वत: करू लागले. शिवाय कन्नडमध्ये आत्मचरित्रांची परंपरा जवळजवळ नाहीच.

**प्र. पा.–** कन्नडमधील दलित साहित्यिक समाजाच्या कोणत्या स्तरातील आहेत ? त्यांची सामाजिक व आर्थिक स्थिती कशी आहे ?

**शां. दे.–** दलित लेखक हे सुशिक्षित असून ते सर्वसाधारणपणे महाविद्यालये व विद्यापीठात काम करणारे आहेत. काही सरकारी अधिकारीही आहेत. एका दलित अधिकाऱ्याने विद्रोही कवितांचा संग्रह प्रसिद्ध केल्यामुळे त्याला नोकरीतून सस्पेंड केले होते !

**प्र. पा.–** कन्नडमध्ये दलित नियतकालिके आहेत का ?

**शां. दे.–** 'सुद्दीसंगाती' नावाचे साप्ताहिक दोन वर्षांपूर्वी सुरू झाले आहे. त्याचे संपादक इंदुधर होन्नापूर हे आहेत. बरेचसे दलित लेखक यातून लेखन करतात. बेंगळूरहून 'शूद्र' म्हणून एक मासिक निघते. त्याचे संपादक हे दलित नाहीत.

**प्र. पा.–** 'सुद्दीसंगाती' मधून प्रसिद्ध होणाऱ्या साहित्याचे स्वरूप कोणते आहे ?

**शां. दे.–** त्यातून प्रसिद्ध होणाऱ्या साहित्याचा प्रकार केवळ दलित स्वरूपाचा नाही. बरेचसे लेखन हे निर्भय व टीकात्मक स्वरूपाचे असते. यातील धारावाही कादंबऱ्या या लोकप्रिय स्वरूपाच्या असतात. सिनेमाविषयक



अनुक्रमणिका

एक ७-८ पानांचे सदर असते.

**प्र. पा.**– साहित्यिक किंवा वृत्तपत्रीय लेखनावर आंबेडकरवाद किंवा मार्क्सवादाचा प्रभाव आहे का ?

**शां. दे.**– अर्थात आहेच. १९७९ मध्ये बेंगळूर येथे बंडाय साहित्य संमेलन झाले. त्याला मुंबईहून दया पवार, अहिल्याबाई रांगणेकर वगैरे मंडळी गेली होती व त्यांनी बंडाय चळवळीला एक तात्त्विक दिशा देण्याचा प्रयत्न केला होता.

**प्र. पा.**– मराठी दलित साहित्याची विशेषता आपणास कोणत्या दृष्टीने वाटते ?

**शां. दे.**–मराठी दलित साहित्याची व्याप्ती मोठी आहे. दलित आत्मचरित्राने तर मराठी साहित्यामध्ये अत्यंत मोलाची भर घातली आहे आणि सामाजिक बांधिलकीचे तत्त्व खोलवर रुजवले आहे. कन्नडमध्ये बंडाय व दलित साहित्याचा परिणाम असा झाला की, कन्नड नवसाहित्यिक हे अधिक समाजाभिमुख झाले.

**प्र. पा.**– आता एक थोडासा तात्त्विक स्वरूपाचा प्रश्न. दलित साहित्य प्रकार हा एक वेगळा साहित्य प्रकार मानता येईल का ?

**शां. दे.**– याला साहित्य प्रकार न म्हणता साहित्य प्रवाह म्हणणे योग्य ठरेल. साहित्याची प्रक्रिया ही सामाजिक व सांस्कृतिक प्रक्रियेचेच अंग असते. कोणताही साहित्य प्रवाह त्या त्या काळांच्या सामाजिक व सांस्कृतिक शक्तींची व प्रज्ञेची अभिव्यक्ती असते. विशिष्ट सामाजिक आणि सांस्कृतिक प्रक्रियेच्या चैतन्य-स्रोतातून निर्माण झालेली दलित साहित्य ही काल-विशिष्ट अशी प्रवृत्ती आहे. त्याचे वाङ्मयीन मूल्य पुढील गोष्टींवर अवलंबून असते.

अ) त्याचा आंतरिक सच्चेपणा.

ब) त्यात व्यक्त होणारा संमिश्र दलित अनुभूतीचा गाभा.

क) ध्येयवादाची व्यापक परिप्रेक्षा (उदा. मार्क्सवाद किंवा अस्तित्ववादी मानवतावाद) जी दलित अनुभवाच्या अभिव्यक्तीसाठी नैतिक अधिष्ठान प्राप्त करून देते. आणि

ड) अभिव्यक्तींची नवीन वळणे आणि नवीन तांत्रिक प्रयोग, ज्यांची दलित साहित्याच्या मांडणीसाठी आवश्यकता असते.

बाबूराव बागूल आणि देवनूर महादेव या दोघांनी केवळ मौलिक दलित साहित्याची निर्मितीच केली असे नाही, तर नवीन निकष निर्माण केले आहेत, असे मला वाटते. त्यांच्या योगाने कोणत्याही दलित साहित्याच्या विकासाच्या शक्यता आणि दिशा यांचे मूल्यमापन करता येऊ शकेल.

**प्र. पा.**–तुलनात्मकदृष्ट्या तुमच्या मते दोन्ही भाषातील कोणते लेखक श्रेष्ठ दर्जाचे व राष्ट्रीय पातळीवर भाषांतर करण्यायोग्य आहेत ?

**शां. दे.**– माझ्या मते मराठीतील बाबूराव बागूल व कन्नडमधील देवनूर महादेव हे श्रेष्ठ लेखक आहेत. हे दोघे दलित अनुभव पचवून त्याचे वस्तुनिष्ठ स्वरूप जीवननिष्ठेने आपल्या साहित्यकृतीत परिपक्व रीतीने व्यक्त करतात. बागूलांच्या दृष्टिकोनात मार्क्सवादाचा प्रभाव जाणवतो, तर देवनूरांमध्ये मानवतावादी अस्तित्ववाद दिसतो.

□ □

## साभार स्वीकार

### आत्मचरित्र, चरित्र

☆ **हिंदुहृदयसम्राट भगवान सावरकर** : रा. स. भट; रा. स. भट, ७७६ सदा., पुणे ३०; १९८७ रु. ४५ ☆ **सुभाषचंद्र बोस** : गजानन जोहरी; सुरेश एजन्सी, पुणे; १९८५ रु. २० ☆ **नागवा** : गणेश चौधरी; चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८७ रु. ३० ☆ **अमुचा पेला दुःखाचा** : बाळ राणे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ४५ ☆ **उचल्या** : लक्ष्मण गायकवाड; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ४५ ☆ (रवींद्रसिंगची आत्मकथा) **ड्रग्जच्याजाळ्यात** : सुजला निरसुरे अनु.; श्रीविद्या प्रका., पुणे ३०; १९८७ रु. ५० ☆ **मी पाहिलेले बालगंधर्व** : बबनराव नावडीकर; समाज शिक्षणमाला, पुणे ३०; १९८७ रु. ३

| लावू कोटि कोटि संकल्पाचे दीप<br>देऊ दुर्बलांना सहकार्याचा हात | राखू प्रकाशित विकासाचा रथ<br>वेगे पुढे नेऊ जगन्नाथाचा रथ |
|---|---|

# कन्नड दलित साहित्य : एक अवलोकन

डॉ. पंडित आवळीकर

कन्नड दलित साहित्य हे १९७०–१९८० या दशकात जन्माला आले आणि वाढीला लागले असे सामान्यत: म्हणता येईल. नेमकेच वर्ष सांगावयाचे झाले तर ते १९७३ असे सांगावे लागेल. कर्नाटकात १९७३ मध्ये 'एक विचित्र घटना' घडली. ते म्हणजे 'वसवलिंगप्प प्रकरण.'

वसवलिंगप्प हे दलितांचे पुढारी मंत्रिमंडळात असताना एका कार्यक्रमात म्हणाले की, 'समकालीन कन्नड साहित्य हे 'जनावराच्या चाऱ्यासारखे' आहे, जनावरांचा कडवा आहे.[१]' त्यावेळी त्यांनी 'भुसा साहित्य' असा शब्दप्रयोग केल्याचे मला स्मरते. या विधानानंतर कर्नाटकात सवर्ण आणि दलित यांच्यात उग्र संघर्ष झाला आणि या संघर्षातून दलित साहित्याच्या निर्मितीला एक तात्कालिक पण प्रवळ निमित्त मिळाले. त्यामुळे १९७३–१९७६ या काळात कन्नड दलित साहित्य जोमाने जन्मलेले दिसते. देवनूरु महादेव, सिद्धलिंगप्प आणि बेसगरहळ्ळी रामण्ण हे समर्थ आणि 'प्रवर्तक' दलित लेखक/कवी आणि त्यांच्या 'द्यावनूरु' (१९७३)[२], 'होलेमादिगरहाडु' (१९७५)[३] आणि 'हरकेयहण' (१९७६)[४] या लक्षणीय, खऱ्याखुऱ्या 'दलित' साहित्यकृती याच काळात उगवताना आणि तळपताना दिसतात. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या संपादकांनी मला लिहिले आहे : 'मराठीत दलित साहित्य ही संज्ञा पूर्वाश्रमीच्या अस्पृष्य वर्गाच्या संदर्भात विशेषत्वाने वापरली जाते. पूर्वाश्रमी अस्पृश्य असलेल्या, पण आपल्या लोकशाही संकल्पनेने भारावलेल्या नवशिक्षित व्यक्तीने (स्त्री वा पुरुष) स्वजीवनाच्या अनुरोधाने गेल्या २०/२५ वर्षात जी ललित साहित्य निर्मिती केली आहे, ती सामान्यत: दलित साहित्य या नावाने ओळखली जाते. दलित नसलेल्या व्यक्तीने केलेल्या या प्रकारच्या साहित्य निर्मितीला दलित साहित्य असे मराठीत आज तरी संबोधले जात नाही.'[५]

संपादकांनी स्पष्ट केलेली दलित साहित्यविषयक उपर्युक्त संकल्पना विवाद्य असली तरी चर्चा करीत न वसता सध्याच्या विवेचनापुरती पत्करली आहे आणि मराठीप्रमाणेच कन्नड 'दलित साहित्याचे प्रमुख निर्माते' पूर्वाश्रमीचे अस्पृश्य आहेत म्हणून त्यांच्याच लेखनाचा, वैशिष्ट्यांचा विचार मी केलेला आहे. कन्नड दलित साहित्याची सूची अगर जंत्री देण्याचा हा प्रयत्न नव्हे.

मराठीत आणि कन्नडमध्ये दलित साहित्याच्या तोंडवळयाचे साहित्य आहे, ते दलित साहित्यासारखे 'दिसले' तरी दलित साहित्य नव्हे. 'विद्रोही' किंवा 'ग्रामीण' या नावाखाली निपजणारे साहित्य जर जन्मसिद्ध दलितांनी लिहिले नसेल तर 'दलित' ठरणार नाही. 'तेव्हा जन्मसिद्ध दलित लेखकाची विद्रोह आणि नकार यांनी युक्त अशा दलित संवेदनेची अभिव्यक्ती करणारे, दलित जीवनानुभवांचे चित्रण करणारे साहित्य म्हणजे दलित साहित्य होय'[६] हे बाळकृष्ण कवठेकर यांचे म्हणणे येथे ध्यानी ठेवले पाहिजे. तशीच एखादी साहित्यकृती 'दलित' ठरविण्याची, 'दलित संवेदना' आणि 'दलित जीवनानुभव' यांची व त्यांच्या अभिव्यक्तीची, चित्रणाची 'निकष' म्हणूनही नीट तपासणी केली पाहिजे. नंतरच हे निकष त्या त्या साहित्यकृतीला लावले पाहिजेत. दलित संवेदना (Sensibility) ही अनुभूती आहे, कल्पना (Idea) नव्हे.

याच ठिकाणी दलित आणि दलितेतर यांची अनुभव घेण्याची शक्ती–पद्धत(च) नव्हे– कशी भिन्न आहे हे स्पष्ट करणारा भालचंद्र फडके यांचा उतारा उद्धृत करण्यासारखा आहे : 'दलितेतरांचा अनुभव संकल्पनात्मक आहे, तर दलित लेखकांचा अनुभव संवेदनात्मक असतो. एखादे नाटक वाचणे आणि तेच नाटक प्रयोग रूपात पाहाणे यात फरक आहेच. तसे दलित लेखकाचे लेखन हा एक जिवंत अनुभव आहे. उलट दलितेतर लेखकाने जे लिहिले ते तितके उत्कट नसणे, जिवंत

नसणे स्वाभाविकच आहे.'[७] दलित साहित्यविषयक वादावर हा चांगला उतारा आहे.

कन्नड दलित साहित्याहून कन्नडमधील 'बंडाय' साहित्य (बंडखोर/विद्रोही साहित्य) वेगळे केले पाहिजे. म्हणूनच 'बंडाय' साहित्य आणि 'दलित' साहित्य यातील शांतिनाथ देसाई यांनी विवरलेला भेद महत्त्वाचा वाटतो : '६० च्या दशकातील नव्यतेविरुद्ध ७० च्या दशकात तीव्र प्रतिक्रिया उमटल्या आणि त्या ठिकाणी आत्मलिप्ततेच्या जागी सामाजिक बांधिलकी आली. सामाजिक बांधिलकीच्या चळवळीमुळे कन्नड वाङ्मयात एकीकडे बंडखोर साहित्य (बंडाय साहित्य) निर्माण होऊ लागले, तर दुसऱ्या बाजूने दलित साहित्य. पण या काळात हे दोन्ही प्रवाह प्रत्यक्षात एकत्र आले बंडखोर साहित्याने पुरोहितशाहीच्या प्रत्येक कृतीविरुद्ध बंड केले, तर दलित वाङ्मयाने (नावाप्रमाणेच) हिंदू समाजातील जातिव्यवस्थेचे दुष्परिणाम आणि सामाजिक क्रांतीची गरज या गोष्टी प्रतिपादिल्या.'[८]

'बंडाय' साहित्याचे बलदंड प्रवर्तक चंद्रशेखर पाटील (चं. पा.) यांच्या जोरकस लेखनाचा आणि 'संक्रमण' या त्यांच्या वाङ्मयीन नियतकालिकाचा कन्नड दलित साहित्याला लागलेला प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष हातभार हा अधिक चिंतन–मननाचा विषय आहे. चेन्नण्ण वालीकार, सोमशेखर इम्रापूर, बुद्दण्ण हिंगमिरे हे जन्माने दलित नसले तरी अनुक्रमे अंबिग, रेड्डी आणि रैत–वक्कलिग अशा उपेक्षित जनांगातून आलेले आहेत. त्यांनी लिहिलेले ललित साहित्य 'दलित' ठरावे असे असले तरी त्यांनी विशेषतः बुद्दण्ण हिंगमिरे यांनी 'दलित' साहित्याच्या चळवळीला प्रेरणा आणि तात्त्विक अधिष्ठान देण्याचे कार्य केले आहे. 'दलित' नावाचे एक (अ) नियतकालिक त्यांनी १९७३–१९७५ या काळात चालविले आणि स्वतः काही दलित साहित्यविषयक भूमिकाही मांडली. हिंगमिरे यांचे आणि त्यांच्या 'दलित' या नियतकालिकाचे ऐतिहासिक महत्त्व मी पुढे सांगणारच आहे. पण त्यापूर्वी 'दलित' साहित्यसदृश लेखन करणाऱ्या, पण 'बंडाय' साहित्याच्या निर्मात्यांपैकी मुख्य अशा लेखकांचा नामोलेख करून ठेवतो : पी. लंकेश, पूर्णचंद्र तेजस्वी, के. सदाशिव, चंद्रशेखर कंबार इ.

कन्नड दलित साहित्याची पार्श्वभूमी समजायला बुद्दण्ण हिंगमिरे यांचे 'नमगे अगत्यविरुव दलित साहित्य'[९] आणि 'दलित साहित्य'[१०] हे दोन लेख साहाय्यक ठरणारे आहेत. गोपालकृष्ण अडिग यांच्या 'हसिदि हुट्टु होट्टे, कोडु अन्नवनु' (भुकेले आहे पोट, दे अन्न) सारखी ओळ असलेल्या कविता आणि शिवराम कारंत यांची 'चोमनदुडी' सारखी कादंबरी हे दलित साहित्य सदृश लेखन असले (दिसले) तरी दलित साहित्य-लिहावयाचे अडिगांचे मुख्य ध्येय नव्हते, आणि कारंतांची कृती कलात्मक म्हणून तिच्यातील 'मुख्य समस्या प्रभावी झाली नाही' हे हिंगमिरे यांचे म्हणणे अडिग-कारंतांच्या मराठीतील विंदा करंदीकर–ग. त्र्यं. माडखोलकरांसारख्या समानधर्म्यांना पण लागू आहे. अशा तकलुपी दलित साहित्याची आज कन्नडला गरज नाही असे सांगून हिंगमिरे म्हणतात : 'नागरिकतेपुढे प्रश्नरूपाने उभ्या राहाणाऱ्या दलितवर्गीयांच्या जीवन–समस्यांची अभिव्यक्ती करणारे साहित्य आज आम्हाला हवे आहे.'[११]

'दलित साहित्य' मध्ये 'तुत्रिन चील' (घासांची पिशवी, पोट) (बेंद्रे), 'कल्की' (कुवेंपु), 'एकलव्य' (कैलासं), 'हरिजन्वार (तोड जानवे) (श्रीरंग) यांसारख्या कृतींबद्दल हिंगमिरे जे म्हणतात तेच 'तुतारी' (केशवसुत), 'श्यामसुंदर' (श्री. कृ. कोल्हटकर), 'कार्तिकी' (र. वा. दिघे), 'वंदे भारतम्' (प्र. के. अत्रे) यांबाबत कमीअधिक खरे आहे. हिंगमिरे लिहितात; 'असल्या साहित्यात सामाजिक कळकळ पुरेशी असूनही ते कलात्मकतेखेरीज रोमँटिक मूल्यांना अधिक महत्त्व देत आले आहे.'[१२] दलित साहित्याआधीचे मराठी,/कन्नडमधील तथाकथित 'पुरोगामी' साहित्यही रोमँटिक साहित्याप्रमाणेच नकली होते, कचकड्याचे होते.

याच लेखात हिंगमिरे यांनी मराठी दलित साहित्याने कन्नड दलित साहित्याला प्रेरणा दिली याचा आवर्जून उल्लेख केला आहे :...'महाराष्ट्रीय दलित साहित्यिकांच्या पँथर गर्जनेने कन्नड दलित साहित्याला प्रेरणा दिली असे सांगता येईल.'[१३] अर्थात या प्रेरणेला 'दलित' नियतकालिकातून शंकरराव खरात ('देवी'), नामदेव ढसाळ ('डॉ. आंबेडकर'), यशवंत मनोहर ('आंबेडकर गाथा') या मराठी कृतींचे प्रसिद्ध झालेले कन्नड अनुवाद (मे ७४, जुलै ७४, फेब्रु. ७५) असे रूप होते. तसेच 'जनप्रगती' तून हिंगमिरे यांनी लिहिलेल्या



अनुक्रमणिका

'मराठी साहित्य मत्रु होस घोरणे गळु' (८ मार्च ८१) नारायण सुर्वे, आणि 'दलित चळवळ खेड्यात जन्मली पाहिजे' (३ मे ८० आणि २६ एप्रिल ८१), 'साहित्यिकाला कमिटमेंट पाहिजे' (सदा कऱ्हाडे यांची मुलाखत, २८ जून ८१), 'अर्जुन डांगळे' (१७ मे ८१) या लेखांनीही मराठी दलित साहित्याचा परिचय करून देण्याची मोठी कामगिरी बजावली आहे.

हिंगमिरे यांच्या 'दलितरेंदरे यारु?' ('दलित म्हणजे कोण?') या दलित लेखात दलित म्हणजे कोण याची व्याख्या आणि चर्चा आहे. दीनदुबळे, त्रस्त, गरीब, पीडित इ. मंडळी ती दलित, फक्त हरिजनांच्यात जन्मलेले ते दलित नव्हेत असे त्यांचे म्हणणे आहे.[१२]

त्यांची भूमिका ही मराठीतील 'दलित'/ 'दलित साहित्य' याविषयीच्या आपण सध्या स्वीकारलेल्या भूमिकेशी विरोधी आहे एवढे नमूद करून पुढे जाऊ आणि कन्नड दलित साहित्याचे प्रांजल प्रतिनिधित्व करणाऱ्या देवनूरू महादेव, सिद्धलिंगय्य आणि बेसगरहळ्ळी रामण्ण यांच्या सकस/सरस साहित्याकडे वळू.

देवनूरू महादेव (१९४९) हे कन्नड दलित कथेचे प्रवर्तक आणि शिल्पकारही. 'द्यावनूरू' (१९७३) हा त्यांचा कालानुक्रमाने आणि गुणानुक्रमानेही 'पहिला' ठरावा असा कथासंग्रह. या पुस्तकाच्या इंग्रजी नामकरणास 'Short Story Collection' असे म्हटले असले तरी त्याचे कन्नड वर्णन 'येळु प्रसंगगळु', /'सात प्रसंग' असे आहे. 'प्रसंग' याचा 'घटना' असा अर्थ घेतल्यास या 'गोष्टी' ठरतील.

'मारिकोंडवरू' (विकत घेतलेले गुलाम) (१९६८) 'ग्रस्तरु(१९७०), ओंदु दहनद कथे (एका दहनाची कथा) (१९७०), 'दत्त' (१९७१), 'डांबरू बंदुदु (डांबर आलेलं त्याची कथा) (१९७२), 'मूडल सीमेलि कोलेगिले मुतागि (पूर्व सीमेवरील खूनबीन इ.) (१९७३) आणि 'अमास' (अमावास्या) (१९७३) हे सात 'प्रसंग' कधी कथा, कधी आठवण, कधी व्यक्तिचित्र याचे रूप घेताना दिसतात. 'मारिकोंडवरु' ही कथा 'गुलाम' या नावाने[१३] आणि 'अमास' ही 'अमासा' या नावाने[१४] मराठीत अनुवादित झाली आहे.

'गुलाम' कथेतील गुलामी आणि जुलूम बीर-लक्ष्मी आणि किट्टप्प यांच्या परस्परसंघर्षातून एखादा पीळ उकलावा तसा प्रकारे डोळ्यापुढे येतात. बीरचा थंडपणा त्याने किट्टप्पाचा 'निकाल' न लावण्यात व्यक्त होतो. आणि येथेच देवनूरू महादेव यांच्या संयमाची नांदी म्हटली जाते. 'डांबरू बंदुदु' मध्येही अन्याय करणाऱ्या पाटलाच्या पोराला जिवे मारले जात नाही, तर हातांपायांना, तोंडाला डांबर फासून घेऊन रंगप्पाचे पोर डांबराच्या पिपाला जागच्या जागी चिकटून बसले होते, पण अजून जिवंत होते.

दलितांच्या 'अस्मिते' चा (Identity) शोध घेणारे देवनूरू 'ओंदु दहनदकथे' मध्ये उठून दिसतात. या अस्मितेलाच एक प्रकारचा 'तुटलेपणा' (Alination) चिकटलेला असतो. घरात एक म्हातारी मेलेली असतानासुद्धा न्यायदानाचे काम चाललेले असते. म्हातारी मेल्याचे दुःख कुणालाच नसते. त्यापेक्षा आपल्या अब्रूची भीती अधिक वाटत असते. परजातीतल्या एका मुलीशी होऊ घातलेल्या लग्नाला गावच्या बड्या धेंडाकडून विरोध होतो. त्याबद्दल दंड दिला जातो. आणि शेवटी ते प्रकरण आपापसातच, दुसऱ्या कुणावर तरी ढकलून मिटवायचे ठरते. पण कथानिवेदक 'मी' या सगळ्याला कंटाळतो. आपली आजी मेल्याचे दुःख त्याला एकटलालाच असते. ते दुःखसुद्धा तो मोकळेपणाने व्यक्त करू शकत नाही. अगदी एकटाच अलिप्तपणाने तो तिची उत्तरक्रिया पार पाडतो.

'दत्त' मधील आनंद हा लहान असतानाच त्याला एका घरी दत्तक दिले जाते. त्यानंतर काही वर्षांनी दत्तक आईवडील मरतात. मुलगाच आता अनाथ झाल्याने त्याचे जनक आईवडील त्याला पुन्हा घरी बोलावतात. नव्यानेच जन्मल्यासारखे जगणे आपल्याला जमेल की नाही याची आनंदला काळजी वाटते. तब्बल सोळा वर्षांनी परतल्यावर एका धार्मिक विधीनुसार त्याला पुन्हा घरात घेतले जाते. पण काही केल्या त्याचे मन तेथे रमत नाही. एकदा मनात घर करून बसलेले परकेपण काही नाहीसे होत नाही.

एक दिवस आनंद आपल्या धाकट्या बहिणीला विचारतो : 'मी तुझा भाऊ आहे असं तुला खरंच वाटतं?' या प्रश्नावर गोंधळून ती त्यालाच विचारते : 'तू माझा भाऊच आहेस ना?'

आणि दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे त्याच्या आई-वडिलांना चिठ्ठी सापडते : 'तुमचा मुलगा तुमच्या वाट्याला नाही.'

'ओंदुदहुनद कथे 'मधील 'मी' काय किंवा 'दत्त'-मधील आनंद काय, आणि या दोन्ही कथा काय एकाच वेळी दलित मनाच्या/जीवनाच्या/समाजाच्या अस्मिता-शोधाचे आणि तुटलेपणाच्या वेदनेचे प्रतीक बनतात. एक आगळीच प्रतीकात्मकता (Symbolic quality) या लेखनात येते आणि 'दलित' कृती म्हणून कोणतेही खोटया दिलदारपणाचे झुकते माप तिच्या पदरात टाकण्याची आवश्यकता न उरता एक 'ललित' कृती म्हणूनही कोणत्याही शिष्ट (?) मान्य फूटपट्टयांवर तिला मोजता येते.

देवनुरू महादेव यांचे हे 'प्रसंग' लेखन आणि 'ओडलाळ' (१९८१) हे 'प्रसंग' चित्रण मला तरी रूढ कथांहून वेगळे, एकच साचेबंद वाङ्मयरूप नाकारणारे असे वाटते. प्र. ई. सोनकांवळे यांच्या 'आठवणींचे पक्षी' या श्रेष्ठ कृतीसारखे. सोनकांवळे यांचे ते उघड-उघड आत्मकथन आहे. देवनूरू महादेव यांचे ते अप्रत्यक्ष आत्मकथन आहे. हे दोघे एकमेकांचे समानधर्मी आहेत आणि 'संयम' हा त्या दोघातील लक्षणीय विशेष आहे. 'यांच्या कथात दिसणारी चित्रक शक्ती, जीवननिष्ठा, भावप्रयोगाचा ताजेपणा यांमुळे हे अलीकडच्या मुख्य लेखकातील एक असे म्हणता येईल.'[१६] हा यू. आर. अनंतमूर्ती यांच्या देवनूरू महादेव यांच्यासंबंधीचा अभिप्राय सोनकांवळे यांच्याबाबतही तितकाच खरा आहे.

'ओडलाळ' (पोटाची आग) मधील साकव्वाचा कोंबडी शोध असो, की घराच्या वाटणीतील भावाभावांची वादावादी असो, पुट्टगौरीने काढलेले मोराचे चित्र असो, की झोपडीची झडती घेणाऱ्या रेवण्णनवरचे वर्णन असो, त्यातील 'चित्रक' शक्ती आणि एकंदर लेखनाचा टवटवीतपणा यातून देवनूरू महादेव यांचे अनन्य सामर्थ्य व्यक्त होते. सोनकांवळे यांचे 'आठवणींचे पक्षी' आजही का आठवतात तेही येथे उलगडते.

कन्नड दलित कवीत अग्रस्थानी आहेत सिद्धलिंगय्य. त्यांचा पहिला कवितासंग्रह 'होले मादिगर हाडु'/'महार-मांगांची गाणी' (१९७५) हा. ते बेंगळुरु विद्यापीठात एम्. ए. ला असताना प्रसिद्ध झाला. दीनदुबळयांच्यावर झालेल्या अन्यायाची चीड हा त्यांच्या कवितांचा प्रमुख विषय आहे. नुसतेच दलित नव्हेत तर इतर पददलितही त्यांच्या कवितात येतात आणि सिद्धलिंगय्य त्यांचेसुद्धा प्रतिनिधित्व करतात असे वाटते. परंतु मुख्यत्वे दलितांची दुःखे हाच त्यांच्या कवितेचा गाभा ठरतो. 'बंडाय' साहित्याचा पुरोहितशाहीवरील हल्ला 'नामविभूतीयलि धर्मविल्ल'/'नावात आणि विभूतीत'[१७] धर्म नाही', 'जुट्टुजनिवारदलि धर्मविल्ल'/'उष्टयात–जानव्यात धर्म नाही' यांसारख्या पंक्तीत आढळतो. वरील ओळी 'सुंटरगाळि' या कवितेतील आहेत आणि सबंध कविता धर्माच्या नावावर चाललेली गरीबांची फसवणूक चितारते.

'नन्नजन गळु'/'माझे लोक' या कवितेत सिद्धलिगय्यांनी आपल्या लोकांवर झालेला अन्याय वर्णिलेला आहे.

भुकेने मरणारे, दगड वाहून नेणारे
हातपाय धरणारे माझे लोक
माडया चढविणारे बंगले बांधणारे
पायात सापडणारे माझे लोक
रस्त्यात पडणारे, सद्दी नसलेले
आतल्या आत रडणारे माझे लोक

या ओळी विषमतेचे केवढे प्रत्ययकारक चित्रण करतात!

सोने खणून काढणारें अन्न न पाहाणारे
वस्त्रे विणणारे उघडयाने जाणारे

हे लोक 'नरेचि केला हीन किती नर' या उक्तीचे जणू उदाहरण आहेत. त्यांचे दुःख कमी म्हणूनच की काय, दारिद्रय, उपास, अपमान यांच्या आगीबरोबरच त्यांच्याबद्दलच्या कृतक्-करुणेने भरल्या 'भाषणात जळून राख होणारे' हे लोक 'कवीची माणसे' आहेत.

सिद्धलिगय्य 'काय आहे' हे जसे रंगवतात तसे 'काय व्हावे' हेही सांगतात. एका डोळयात 'वास्तव' आणि दुसऱ्या डोळयात 'स्वप्न' पेलणारा आणि झेलणारा हा सव्यसाची कवी आहे. 'क्रांतिपद' या कवितेत क्रांतीची सुरुवात कशी असेल आणि क्रांतीनंतर दलितांना कसा न्याय मिळेल हे कवी चित्रित करतो.

झोपडया गडगडत आहेत बंगले थरकापत आहेत
जिकडे तिकडे घुमत आहे नवक्रांतीचे गान
मतं हत होत आहेत जनपथ उमटत आहेत
असमानता होत आहे क्रांतीचा सोपान

या पंक्तीत कवीने 'पाहिलेली' क्रांती भरून राहिलेली आहे. मसणातली वावटळ क्रांतिगीते गात आहे...

'हुब्ब'/'सण' या कवितेत, ज्या दिवशी आम्ही

शोषकांना धडा शिकवू त्या दिवशी आम्ही सण साजरा करू अशी प्रतिज्ञा आहे. आणि

रांडीच्यांना क्रांतिकारकांच्या कोर्टात
मार्क्सकडून जजमेंट द्यायला लावतो
त्याला फाशी होईल

हा आवेश उसना नाही, अंगचा आहे. 'भविषद्‌गीते'-मध्ये भावी काळात क्रांती होईल तेव्हा सर्वत्र लाल रक्त वाहात राहील अशी आशाही व्यक्त झाली आहे. 'नावु'/'आम्ही' या कवितेत 'नावु हसिद हुलिगळु'/'आम्ही भुकेले वाघ' आहोत, आम्हाला 'तत्वगित्व बेड नमगे'/'तत्वबित्त्व नको आम्हाला.' 'बेकु नमगे अन्न'/'पाहिजे आम्हाला अन्न' अशी रोखठोक मागणी आहे. 'पँथर' आणि 'वाघ' हेही जवळजवळ ठेवून पाहाण्यासारखे आहेत. 'सिद्धलिंगय्यां-सारख्या दलित लेखकांच्या वाङ्मयात दलित वाङ्मया-तील लढाऊ प्रवृत्ती दिसून येते'[१८] हे शांतिनाथ देसाई यांचे विधान यथार्थ वाटते.

सिद्धलिंगय्यांची कविता हे 'गीत' आहे, 'गाणे' आहे. त्यांनी स्वतःच ही 'गाणी' जोषात, लयीत गायिली/वाचली तरच त्यांचा उद्देश स्पष्ट होईल असे म्हटले आहे.[१९] 'साविरारु नदिगळु'/'हजारों नद्या' (१९७९) या संग्रहातील 'दलितरु बरुवरु'/'दलित येणार आहेत' ही कविता मराठीत प्रसिद्ध झालेली आहे.[२०] या कवितेच्या अखेरच्या ओळी सिद्धलिंगय्यांचे स्वप्न सशब्द करीत आहेत :

पूर्वेला लाल रंग दिसतो आहे
गरीबांचा दिवस उगवतो आहे
दलित येणार आहेत, रस्ता सोडा
दलित आले, राज्य सोडा

सिद्धलिंगय्यांची दलित साहित्यासंबंधीची भूमिका अशी : 'जे शूद्र साहित्यावर टीका करतात, त्याला नावे ठेवतात, त्याची हेटाळणी करतात, त्यांनी आमच्या वाट्याला आलेली दुःखे प्रत्यक्ष सहन करणे तर सोडाच, ती साधी बघितलीही नाहीत. त्यामुळे परंपरागत मूल्ये उराशी कवटाळणाऱ्या समीक्षकांना आमच्या साहित्याचे मूल्यमापन करण्याची क्षमताच नाही. आमचा राग, द्वेष, मूल्यविवेक यांना कलामूल्य नाही म्हणून कोणी धिक्कारीत असेल, तर कलेची मूलभूत व्याख्याच बदलावी लागेल. आणि ही व्याख्या बदलल्यानंतरच साहित्याचे मूल्यमापन करता येईल.'[२१]

सिद्धलिंगय्यांची कविता 'काव्य' म्हणूनही लक्षणीय आहे हे कोणत्याही निकषांवर नाकारता येणार नाही.

कन्नड दलित साहित्यातील तिसरे महत्त्वाचे लेखक म्हणजे बेसगरहळ्ळी रामण्ण. त्यांच्या 'हरकेय हण' (१९७६) या कथासंग्रहात 'हरकेय हण' (देवापुढील पैसा, नवसाचा), 'गांधी संतान', 'कक्करन युगादि', 'नेरळुगळु' ('सावल्या') आणि 'बाविगे बिद्द देव्व' ('विहिरीत पडलेले भूत') या कथा आहेत. रामण्णांच्या नंतरच्या संग्रहांपेक्षा हा पहिलाच संग्रह अनेक दृष्टींनी अधिक विचारार्ह आहे. त्यांच्या कथांपैकी 'गांधी संतान' ही कथा 'गांधी' या शीर्षकाखाली मराठीत अवतरलेली आहे.[२२] ही कथा कारुण्य आणि उपहास यांचे विलक्षण मिश्रण रामण्ण कसे करू शकतात याची निदर्शक आहे.

दंडिगम्माच्या देवळाचे महार पुजारी आणि गावचा पाटील श्यानभोग यांच्यातील पैशावरून झालेले भांडण पोलीस, एम्. एल्. ए. यांचे खरे स्वरूप आणि देवीपुढे जमलेल्या पैशाचे काय करायचे हा न सुटलेला प्रश्न याचे चित्रण 'हरकेय हण'मध्ये आहे. 'कक्करचा पाडवा' कसा साजरा होतो हे सांगताना रामण्णांच्या लेखणीला तलवारीची धार चढते. पाडव्याच्या दिवशी त्याला गोडधोड काही मिळत तर नाहीच, उसनेपासनेही मिळत नाही, आणि वर दुष्काळात थोडा माहिना तसे त्याच्या मुलीला त्याच दिवशी मुलगा होतो. 'मुलगा झाला हो' हे त्याच्या घरचे 'नाट्य' फार वेगळे(च) असते. त्याला नर्स म्हणते : 'तू नशीबवान आहेस. पाडव्याच्या दिवशी तुला सोन्यासारखा नातू झाला.' परंतु या 'सोन्या'चा केवळ शब्दालंकार एवढाच 'अर्थ' असल्याने तो उद्‌गारतो : 'एल्ल नन्न हणेबर. इन्नू एनेनु बरददो ई हणेलि.' ('सगळं माझं नशीब. अजून काय काय लिहिलंय या कपाळावर!')

त्याच्या कपाळावर लगेचच काय लिहिले होते ते त्याला वाचता आले नाही, आणि जे लिहिले होते त्यातूनही वाचता आले नाही. ज्या जोश्याचे सोवळे-ओवळे प्रचंड होते त्याच्याच घरची बाई विहिरीत जीव देते, उडी मारते, तेव्हा तिला वाचवायची विनंती जोशीबुवा करतात : कुणाला? 'अस्पृश्य' कक्करला! मागेल ते द्यायलाही तयार होतात. यशोदम्माला वाच-वायला तो विहिरीत उडी टाकतो, पण ती त्याला

दोन्ही हातांनी मिठी मारते आणि पाण्यात खेचते. एका ब्राह्मणाच्या बाईने एका महाराला अशी मिठी मारावी या कल्पनेने तो भांबावतो, त्याचा तोल जातो, आणि तो व यशोदम्मा दोघेही आत बुडतात.

ही बातमी कळल्यावर श्वानभोग म्हणतात, 'महार ब्राह्मणांच्या घरात गेल्यावर दैव काय गप्प राहातं? बघा काय गत झाली! ब्राह्मण बाईला हलक्या जातीचा शिवतो म्हणजे काय!'[२४] पण खरा कळस आहे तो या सद्गृहस्थाने कक्करच्या बायकोचे केलेले सांत्वन: 'ब्राह्मण बाईला वाचवता वाचवता मरण येणं म्हणजे अत्यंत पवित्र असं मरण. कोटीत एकालाही असलं मरण येत नाही!'[२५]

संध्याकाळी खोलीबाहेर पडल्यावर दिसणारी गलिच्छ आणि चांगल्या वस्तीतील माणसे आणि त्यांची जगण्याची इच्छा एका टोकाला आणि दुसऱ्या टोकाला रस्त्यात मरून पडलेला एक बेवारशी माणूस यांचा अन्वयार्थ 'नेरळुगळु' या गोष्टीत लावायचा प्रयत्न रामण्ण करतात. मेलेला तो कोण? याचे कोण? याला कुणी ओळखते का? हे प्रश्न आणि 'या'चे उत्तर: 'त्याच्याभोवती दोन बोटांवर पडलेली त्याची सावली' आणि 'हा' परतला: 'अखेर येणारी एक सावली– तुझ्याबरोबर."[२६]

या कथेला येणारा एक अंतिम सत्याचा अर्थ रामण्णांची कथाकार म्हणून श्रेष्ठता सुचविणारा आहे.

देवनूरू महादेव, सिद्धलिंगय्य आणि बेसगरहळ्ळी रामण्ण यांच्यावर भर देऊन केलेले हे कन्नड दलित साहित्याचे अवलोकन म्हणजे सर्वेक्षण नव्हेच. फार तर त्याला नमुना–पाहाणी (Sample survey) किंवा 'शलाका' परीक्षा म्हणता येईल.

कन्नड दलित साहित्यात वेगवेगळ्या वाङ्मय प्रकारांची भर पडायला हवी. मराठीप्रमाणे आत्मकथनाचीही निर्मिती झाली पाहिजे. कन्नड रंगभूमी हेही दलित नाटककारांना आव्हानच आहे. 'मराठी दलित साहित्याची पाळेमुळे जशी घट्ट आहेत तशी कन्नड दलित साहित्यानेही मिळविली पाहिजेत'[२७] हे वुद्दण्ण हिगमिरे यांचे विधान आज या घडीलाही मार्गदर्शक ठरणारे आहे. कन्नड दलित साहित्याची समीक्षाही अजून समृद्ध झाली पाहिजे.

हे होण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा द्रष्टा इशारा सतत नजरेपुढे हवा. 'आपण आपल्या जीवनाकडे, कर्तव्यधर्माकडे आणि संस्कृतीकडे दुर्लक्ष करीत आहोत. थोडे अंतर्मुख होऊन विचार केलात तर आपली जीवनमूल्ये आणि सांस्कृतिक मूल्ये कशी करपून जात आहेत याचे भेसूर चित्र उभे राहील. कारणे काहीही असोत, पण आपण अधःपतनाच्या, अवनतीच्या मार्गावरून जात आहोत असेंच आढळून येईल. तेव्हा तत्परतेने सावध होऊन जीवन व संस्कृतिविषयक मूल्ये साहित्यकारांनी जोपासली पाहिजेत, ती सतेज बनविली पाहिजेत, वृद्धिंगत केली पाहिजेत. तुमच्या कथा-कादंबरीतील सीता आता लक्ष्मणरेषा ओलांडून जात आहे. दुर्योधनाच्या दरबारात द्रौपदी–वस्त्रहरण होत आहे आणि दुष्यंत शकुंतलेला ओळख देत नाही. ती वनवासी होत आहे. म्हणून मला साहित्यकारांना आवर्जून सांगायचे आहे की, उदात्त जीवनमूल्ये व सांस्कृतिक मूल्ये यांचा आपल्या साहित्य प्रकारातून आविष्कार करा. आपले लक्ष आकुंचित, मर्यादित ठेवू नका. ते विशाल बनवा. आपली वाणी चार भिंतींपुरती राखू नका, तिचा विस्तार होऊ द्या.'[२७]

## टीपा

१. मराठवाडा, दिवाळी ८५, 'शूद्र साहित्य व कर्नाटकातील दलित चळवळ', व्ही. टी. राजशेखर, पृ. १०९.
२. द्यावनूरू, देवनूर महादेव, के. देवेगौड, नेल–मने प्रकाशन, मैसूरु, १९७३.
३. होलेमादिगर हाडु, सिद्धलिंगय्य, मुंगारु प्रकाशन, बेंगळूरु, १९७५.
४. हरकेय हुण, बेसगरहळ्ळी रामण्ण, नेल–मने प्रकाशन, मैसूरु, १९७६.
५. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या संपादकांचे पत्र.
६. दलित साहित्य : एक आकलन, बाळकृष्ण कवठेकर, अजब पुस्तकालय, कोल्हापूर, १९८१, पृ. ४.
७. दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह, भालचंद्र फडके, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९७७, पृ. २७.
८. सम्बन्ध, हिंदी ग्रंथालय, सांगली, जून १९८५,

पृ. २६४–६५; 'समकालीन कन्नड साहित्य : एक टिप्पण', शांतिनाथ देसाई; अनुवादक : सुधाकर गोकाककर.

९. दलित, (सं.) बुद्दण्ण हिंगमिरे, सोमशेखर इम्रापूर, चेन्नण्ण वालीकार, प्रशांत पब्लिकेशन्स, हुबळी, जाने. १९७४.

१०. दलित, उपर्युक्त.

११. दलित, उपर्युक्त.

१२. जनप्रगती, २० मे १९७९.

१३. सम्वन्ध, उपर्युक्त, पृ. १२०–१२९.

१४. कन्नड नवकथा, (सं.) अ. रा. तोरो, मेहता पब्लिशिंग हाउस, पुणे, १९८१, पृ. १३८–१४६.
आणि
मराठवाडा, दिवाळी ८५, औरंगाबाद, पृ. ५०–५६
'अमासा' ऐवजी सर्वत्र 'अमास' असे हवे होते.

१५. ओडलाळ, देवनूरु - महादेव, नेल–मने प्रकाशन, मैसूरु, १९८१.

१६. कन्नड साहित्य संकलन, (सं.) यू. आर. अनंतमूर्ती, भारतीय भाषा संस्थान, मैसूरु, १९७६, पृ. ३१७.

१७. 'विभूति' म्हणजे 'भस्म' आणि 'थोर व्यक्ती', अवतार.

१८. सम्वन्ध, उपर्युक्त, पृ. २६५.

१९. होलेमादिगर हाडु, उपर्युक्त.

२०. मराठवाडा, दिवाळी ८५, पृ. ६३.

२१. तत्रैव, पृ. ११२.

२२. सम्वन्ध, उपर्युक्त, पृ. ११३–११९.

२३. हरकेय हण, उपर्युक्त, पृ. ५७.

२४. तत्रैव, पृ. ५७.

२५. तत्रैव, पृ. ७०.

२६. नागपूर दलित साहित्य संमेलन, स्मरणिका, जानेवारी १९७६, पृ. ८.

☐

अनुक्रमणिका

# गुजराती दलित साहित्य

**गुलाबदास ब्रोकर**

अनुवाद : प्रा. यशवंत कळमकर

गेल्या काही वर्षांत भारताच्या या प्रदेशातील साहित्यात एक नवीन प्रवाह निर्माण झाला आहे. या प्रवाहातून निर्माण झालेले साहित्य दलित साहित्य, म्हणजे पददलित जाती व वर्ग, विशेषतः अस्पृश्य वर्गाचे साहित्य, म्हणून ओळखले जाते. हे नाव त्या शब्दाच्या दोन्ही अर्थांनी खरे आहे. या जातीपातींनी ग्रासलेल्या समाजातील पददलितांच्या भयंकर जीवनाचे प्रतिबिंब त्या साहित्यात पडले आहे. आणि त्यांच्या वेदना आणि संताप त्यातून व्यक्त होतो. शिवाय समाजाच्या तळाशी आपल्याला जखडून ठेवणाऱ्या बंधनापासून मुक्त होण्याची आकांक्षा हे साहित्य व्यक्त करते. या अर्थाने हे साहित्य दलित साहित्य आहे यात शंका नाही. दुसऱ्या अर्थानेदेखील ते दलित साहित्य आहे. कारण ह्यातील बरेचसे किंवा जवळजवळ सर्वच साहित्य याच समाजातील लोकांनी निर्माण केलेले आहे. समाजातील इतर वर्गांच्या लोकांनी हीच परिस्थिती प्रतिबिंबित करणारे लेखन केलेही असेल, व त्यात (दलितांविषयी) खूप सहानुभूतीदेखील असेल, पण दलित या शब्दाच्या खऱ्या अर्थानुसार त्या साहित्याला क्वचितच दलित साहित्य म्हटले जाईल.

महाराष्ट्रात दलित साहित्याची निर्मिती या शतकाच्या सहाव्या दशकापासून झाली. पण गेल्या पंधरा-वीस वर्षातच मराठी साहित्याचे एक प्रभावी दालन म्हणून त्याला मान्यता मिळाली. दलित साहित्यातील काही लेखकांना आज मराठी साहित्यात मोठे मानाचे स्थान आहे.

गुजरातीमध्ये मराठीपाठोपाठ दलित चळवळ सुरू होणे अपरिहार्यच होते. कारण भारताच्या सर्वच भागात दलितांची स्थिती जरी सारख्याच स्वरूपाची असली, तरी महाराष्ट्र व गुजरात या एकमेकांशी संलग्न असलेल्या राज्यांमध्ये हे प्रश्न जास्तच सारखे आहेत. म्हणूनच गुजराती साहित्यात ही प्रतिक्रिया उमटणे अपरिहार्यच होते. गुजरातीत गेल्या दहा-पंधरा वर्षांत दलितांच्या स्थितीचे वर्णन करणारे साहित्य निर्मिण्याचे प्रयत्न झाले आणि त्यात या विशिष्ट परिस्थितीत जगणाऱ्या या लोकांच्या आकांक्षांचे प्रतिध्वनी उमटले आहेत. हे लेखन बहुतेक कवितेच्या स्वरूपात असून 'दलितबंधू', 'परिवर्तन' आणि 'गरुड' अशा नियतकालिकातून ते प्रसिद्ध झालेले आहे. काही लोकांनी एकत्र येऊन एक मंडळ स्थापले आहे व ते स्वतःला 'दलित पँथर' म्हणवून घेतात. जेव्हा या 'दलित पँथर्स'नी एकत्र येऊन आपले 'आक्रोश' नावाचे नियतकालिका १९७८ साली सुरू केले, तेव्हा एक साहित्यिक गट म्हणून दलितांचा आवाज पहिल्यांदा दुमदुमला. त्या नियतकालिकात पददलित जातींच्या वेदना व क्षोभ व्यक्त करणाऱ्या काही प्रभावी कविता प्रसिद्ध झाल्या होत्या.

जरी सुरुवात अशी प्रभावशाली झाली होती;तरी ती सुरुवातच होती. 'गुजरात लोकायन'ने डिसेंबर १९८१ मध्ये 'दलित कविता' या नावाने एक संग्रह प्रकाशित केला, तेव्हाच खरी दलित कविता गुजरातीत आली, असे म्हणावे लागेल. हे प्रकाशन म्हणजे पुढे अजून प्रकाशित होणाऱ्या समर्थ दलित साहित्याची नांदीच होती. त्यानंतर गेल्या पाच-सहा वर्षांत बरीच (दलित) कविता लिहिली गेली. त्यातील काही कवितांमध्ये धुमसती आग व आकर्षकता होतीच, पण त्याबरोबर स्वतःचे असे वाङ्मयीन मूल्यदेखील होते. पण दलित गद्य वाङ्मय मात्र बऱ्याच उशीरा निर्माण झाले. गेल्या दोन-तीन वर्षांतच उल्लेखनीय अशा काही कथा, आठवणी व इतर चांगल्या साहित्यिक दर्जाचे लेखन नव्या वाटा धुंडाळीत गुजराती साहित्यात आलेले दिसून येते. 'नया मार्ग' नावाच्या नियतकालिकात हे नवी प्रवृत्ती दाखविणारे लेखन दिसून येते. जरी गुजरातीत ह्या प्रकारच्या साहित्य निर्मितीस सुरुवात होऊन एक दशक किंवा थोडा अधिक काळ लोटला असला,तरी या साहित्याने गुजरातच्या भूमीत चांगलेच मूळ धरले आहे. आणि त्यातून दर्जेदार साहित्य निर्माण झालेले आहे. या साहित्याला स्वतःचा आवाज आहे आणि गुजराती साहित्यात एक स्वयंप्रेरित शक्ती म्हणून ते उभे राहात आहे.

आपल्या सृजनाच्या पहिल्या उमाळ्यात दलित साहित्य

दुःख, वेदना व क्षोभ–विशेषतः क्षोभ–या भावनांनी परिपूर्ण असावे हे साहजिकच होते. समाजाच्या एका वर्गाने दुसऱ्या आपल्याइतक्याच माणूस म्हणून जगण्यास पात्र असलेल्या वर्गाला अशा मानहानीकारक व हृदयद्रावक परिस्थितीत लोटून दिले, की त्यांच्या सामाजिक अस्तित्वालाच काय, पण जगण्यालादेखील अर्थ उरला नाही, अशा स्थितीविरुद्ध तो क्षोभ होता.

हे सर्व आशय–वेदना, दुःख व क्षोभ–दलपत चौहान, नीरव पटेल, मनसुख वाघेला, शंकर पटेल, चंदू महेरिया, प्रवीण गघवी आणि इतरांच्या 'दलित कविता' या १९८१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या संग्रहातील कवितातून मोठ्या कर्णभेदी सुरात व्यक्त झालेले आहेत. उदाहरण म्हणून सांगायचे तर दलपत चौहानच्या 'अस्पृश्य' या कवितेतील वेदना व संताप यांची जाणीव कोणालाही झाल्याशिवाय राहाणार नाही. त्या कवितेत त्यांनी अस्पृश्य मुलांच्या शाळेतील पहिल्या दिवसाचे वर्णन केलेले आहे. ही शाळा एका लहान शहरातली किंवा खेड्यातली असावी, जिथे जातिभेदाचा प्रभाव बराच मोठा असावा. त्या मुलाला त्याचा जाच चांगलाच जाणवला असावा. कारण तो म्हणतो —

शाळा प्रवेशाचा तो पहिला दिवस—
एक अनुभव–जगबुडीचा–प्रलयाचा

त्याचप्रमाणे आपल्या 'जेतलपूरचे हत्याकांड' या कवितेत नीरव पटेल संतापाने कडाडतात —

'मी या हिंदुस्तानचे कबरस्तान करीन.'

या संग्रहातल्या इतर कवींच्या कवितांमधूनदेखील असाच कठोर, जळजळीत संताप व्यक्त झाला आहे. 'आक्रोश' हे नावच मुळी या कवींना अस्पृश्य म्हणून शिक्का उठविलेल्या लोकांवर, झालेल्या अन्यायाची, विषमतेची येणारी चीड व त्यांच्या मनात खोलवर मुरलेला राग व्यक्त करणारे सूचक असे नाव आहे.

१९८१ मध्ये या कविता प्रसिद्ध झाल्यानंतर सहा वर्षे लोटली. या काळात काही महत्त्वाचे दलित साहित्य पुस्तकरूपाने व नियमकालिकातून प्रसिद्ध झाले आहे. दलपत चौहानसारख्या आघाडीच्या दलित साहित्यिकांनी आपले कविता संग्रह प्रसिद्ध केले आहेत. वर उल्लेखिलेले कवी व लेखकदेखील या नवीन क्षेत्रात बरेच काम करीत आहेत.

या काळात या साहित्याचा चढा सूर मात्र उतरलेला दिसत नाही. दलित साहित्य संघाने १९८४ मध्ये प्रसिद्ध केलेल्या काव्यसंग्रहाचे नाव आहे 'विस्फोट'. त्यात अशा काही चढ्या सुरातील कविता आहेतच. पण थोडा अर्थपूर्ण बदलदेखील त्याची जागा घेताना दिसून येत आहे. जळजळीत राग, कर्णकर्कश सूर व घणाघाती हल्ला करणारे कठोर शब्द यांची जागा हळूहळू उपरोध व व्यंजकताप्रचुर भाषा, तसेच टिंगलखोर सूर व उपरोधिक हास्य घेत आहे. या उपरोधिकतेचे एक सुंदर उदाहरण फिलिप क्लार्क यांच्या कवितेतील तीन-चार ओळींमध्ये दिसून येते. उपरोध व्यक्त करण्यासाठी त्यांनी वैद्यकीय परिभाषेचा उपयोग केला आहे. ज्यामुळे ओठावर हास्य तर येतेच, पण डोळ्यात पाणीदेखील तरळते. त्या ओळी अशा —

'काल लोकशाहीच्या जठरात
प्राणांतिक दुखू लागलं
डॉक्टरांनी तपासलं, अन् म्हणाले :
जठर प्रदेशात कुठं तरी आहे 'सत्ता' नावाचा
मोठा ट्यूमर.'

काही कवितांमधून संतापाच्या साध्या सरळ भावनेच्या जागी कोरडी ठणठणीत स्पष्ट विधाने येतात. उदाहरणार्थ, बाळकृष्ण आनंद यांच्या एका कवितेत एक लहान मुलगा आपल्या वडिलांना शाळेत काय घडले ते सांगतो. तो म्हणतो –

'बाबा
शाळेत प्रार्थनेनंतर सर्वांनी प्रतिज्ञा म्हटली –
भारत माझा देश आहे
आणि सर्व भारतीय माझे बंधू-भगिनी आहेत
पण माझ्याकडे पाहात जोशीमास्तर पुटपुटले –
पण हरिजन नाहीत, हरिजन नव्हेतच.'

याखेरीज 'अस्मिता' या १९८४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या संग्रहाचे वैशिष्ट्य असे की, त्यात वेदना, क्षोभ वा उपरोध यांचा स्पर्शदेखील नसलेल्या शुद्ध कविता इतर कवितांबरोबरच आढळून येतात. उदाहरणार्थ, मोहन मधुकर आपल्या एका कवितेत म्हणतात –

'आपण असू सोने तर आपले मूल्य मोठे
पण एरवी आपण मातीमोल
म्हणून आपण फुलांसारखे फुलू या
आणि घेऊ ओंजळ भरभरून
आपल्याभोवती ओसंडणारा हा सूर्यप्रकाश.'

शंकर पटेल यांच्या 'कविता प्रत्येक नागरिकाची' या कवितेतदेखील अशीच संस्कारात्मक भावना सुंदर शब्दात व्यक्त झालेली आहे. दलित वाङ्मयाचा तोल सांभाळण्याच्या

दृष्टीने या ओळी फारच आशादायक आहेत. प्रचार, राग, द्वेष यांचा लवलेशदेखील खालील ओळींत दिसून येत नाही —

‘ अशी क्रांती येऊ देत की
प्रत्येक दिवशी उषःकाली उपवने फुलावीत
आणि सरोवराकाठी संध्याकाळी
. सारस युग्माच्या दर्शनाने मी धन्य व्हावे. ’

दलित वाङ्मयाबद्दल आतापर्यंत मी फक्त कवितेबद्दल बोललो आहे. कारण १९८४–८५ पर्यंतचे बहुतांश दलित वाङ्मय कवितेच्या स्वरूपात लिहिले गेले आहे. पण गेल्या दोन-तीन वर्षांत दलित कथा व कादंबरीच्या क्षेत्रात फार मोलाची भर पडलेली आहे. हे साहित्य मोठ्या आस्थेने आणि कलात्मक जाणिवेने जोसेफ मक्वान यांनी निर्मिले आहे. त्यांनी आपल्या लेखनाने केवळ दलित साहित्यातच नव्हे, तर गुजराती साहित्यजगतात हेवा वाटण्याजोगी कीर्ती मिळविलेली आहे. जोसेफ मक्वान यांचे पुस्तक ‘ व्यथानन वीटक ’ त्यांना परिचित असलेल्या व्यक्तींविषयीच्या खऱ्या-खुऱ्या अनुभवातून लिहिलेल्या लघुकथांचे पुस्तक आहे. गुजराती साहित्यजगात खळबळ उडवून देणाऱ्या इतरही कथा व कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या असून त्यामुळे साहित्य-क्षेत्रात त्यांना मानाचे स्थान मिळाले आहे. त्यांच्या लेखनाची पार्श्वभूमी, आशय, व्यक्तीचित्रे आणि अंतरंग हे बहुतांशी दलित जगातीलच आहेत. असे असूनदेखील त्यांच्याविषयी बोलताना लोक दलित साहित्याच्या नव्हे, तर एकूण गुजराती साहित्याच्या संदर्भातच बोलत असतात. त्यांच्या लेखनात क्षोभाचा आविष्कार नाही, की जळजळीत शब्दात व तितक्याच जळजळीत रूपकात ते प्रचारकीही लिहीत नाहीत. त्यांचे लेखन हे खऱ्या अर्थाने साहित्य आहे.

नीरव पटेल यांनीदेखील ‘ मातृवंदना ’ या संग्रहात हृदय हेलावणारा लेख लिहिला आहे. याच संग्रहात गुजराती-मधील श्रेष्ठ लेखकांनी आपापल्या मातांविषयी लिहिलेले अनेक हृद्य लेख आहेत. या सर्व लेखात नीरव पटेल यांचा लेख उठून दिसतो.

उर्जशी परमार यांच्या लघुकथांचे दलित साहित्य म्हणून वर्गीकरण करावे की नाही याबद्दल मला शंका आहे. पण त्या लघुकथांचे आशय बऱ्याच वेळा दलित आशयांशी जवळीक सांगणारे आहेत आणि त्या कथा उत्कृष्ट आहेत.

हे सर्व लेखन—गद्यातले व पद्यातले— देखील गुजराती दलित साहित्याबद्दलच्या आशा उंचावणारे आहे आणि सुरुवातीच्या मरगळलेल्या अवस्थेतून बाहेर पडून दलित साहित्याने आपले मानाचे स्थान मिळविले आहे असे यावरून दिसून येते.

□





अनुक्रमणिका

# हिंदीतील दलित साहित्य

डॉ. मु. ब. शहा

स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्यातली एक विलक्षण युगप्रवर्तक घटना म्हणजे 'दलित साहित्या'ची निर्मिती. देशातल्या अन्य कुठल्याही भाषेत या काळी अशा तऱ्हेच्या स्वतंत्र अस्मिता असलेल्या साहित्याची निर्मिती झालेली नाही. पूर्वाश्रमी अस्पृश्य असलेल्या पण शिक्षणाची महाद्वारे उघडी झाल्यामुळे व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारख्या महापुरुषाच्या प्रेरणेने नव्या समाजरचनेची तीव्र ओढ लागलेल्या सुशिक्षित अस्पृश्य समाजाने आपले जे दाहक अनुभव शब्दबद्ध केले त्यातून 'दलित साहित्य' आकाराला येत गेले. 'दलित' या शब्दात नेमका कोणाकोणाचा समावेश करावयाचा यावर एकमत होण्याची शक्यता दिसत नाही. आज तरी केवळ अस्पृश्य असलेल्या समाजाने निर्माण केलेले साहित्य 'दलित साहित्य' या सदरात मोडते. आंबेडकरी प्रेरणा ही या साहित्याची मुख्य प्रेरणा असून वर्णव्यवस्थेच्या चौकटीत सर्व समाज बंद करून टाकणारा व अस्पृश्यतेला मान्यता देणारा हिंदू धर्म आणि समाज, त्याच्या विरोधाचे मुख्य केंद्र आहे. या विरोधातूनं निर्माण झालेल्या सामाजिक चळवळींना मदत करणारे एक लखलखते हत्यार म्हणजे दलित साहित्य.

दलित साहित्याची अशी पार्श्वभूमी हिंदीत नाही. एक तर हिंदी साहित्यात आंबेडकरी प्रेरणेचे स्रोत जवळपास नाहीतच. शैक्षणिकदृष्ट्या अत्यंत मागासलेल्या व कमालीच्या दरिद्री असलेल्या हिंदी प्रदेशात सामाजिक आंदोलनेही कमी व शिक्षण सर्वदूर पोहोचविणाऱ्या फुले, शिंदे, भाऊराव पाटलांसारख्यांच्या परंपराही कमी. किंबहुना जवळपास नाहीतच. त्यामुळे हिंदी साहित्य जगतात कुणी नामवंत दलित साहित्यकार आज तरी दिसत नाही. आधुनिक हिंदी साहित्यातले बहुतेक लेखक मध्यमवर्गीय आहेत व त्यांच्या जाणिवाही बहुतांशी मध्यमवर्गीयच आहेत. पण केवळ शूद्रातिशूद्रांचेच नव्हे, तर सवर्णांचेही असे विद्रोही व परिवर्तनवादी साहित्य असू शकते, हे मान्य केले तर हिंदी साहित्यात दलित जाणिवांचा क्रमबद्ध विकास शोधता येऊ शकतो.

### कबीर : आद्य विद्रोही

मराठीमध्ये दलित वेदनेचे आदिरूप संत चोखा मेळाच्या अभंगात आढळत असेल, तर हिंदीत ते कबिराच्या काव्यात शोधायला हवे. 'आपण हीन जातीत जन्माला आलो, कारण आपले पूर्वसंचित, कृष्णनिंदा घडली म्हणून महाराचा जन्म मिळाला.' अशी चोखोबांची प्रामाणिक समजूत होती. ते याबद्दल स्वत:लाच बोल लावतात. जातीच्या नावाखाली घोर अत्याचार करणाऱ्या प्रस्थापित समाजाविरुद्ध ते चकार शब्दही उच्चारीत नाहीत. मग विद्रोहाची गोष्टच वेगळी. पण कबीर तर साक्षात् विद्रोहच आहे. देवधर्म, जात-पात, मुल्ला-मौलवी, मंदिर-मस्जिद, पूजापाठ या सर्वांवर कबिराने अत्यंत तीव्र हल्ले चढविले. इतके तीव्र की, त्यांच्या समोर आजची प्रखर दलित कविताही सौम्य वाटावी.

> **जो तू बामन बामनी जाया**
> **आन बाट व्हें क्यों नही आया ?**

असे ब्राह्मणांना व

> **मसजिद भीतर मुल्ला पुकारे**
> **क्या साहब तेरा बहिरा हं ?**

असे मुल्ला-मौलवींना कबीरच विचारू शकत होते. 'जुलाहा' जातीत (म्हणजे धड हिंदू नाही व धड मुसलमानही नाही) वाटलेल्या कबिराने धर्माच्या आणि साहित्याच्या प्रांतात विद्रोहाचा जो झेंडा रोवला, त्याच्या छायेत पुढे संतकाव्याची वाटचाल झाली. खरे तर आजही उत्तर भारतातल्या बहुजन समाजाच्या विश्वासाची दोनच ठिकाणे आहेत. त्यातले पहिले कबीर व दुसरे तुळशीदास. हिंदीतले संतकाव्य सामाजिक समतेसाठी संघर्ष करणारे काव्य ठरले. त्याच्या मुळाशी

प्रेरणा कबिराचीच आहे. संतकाव्य परंपरेतले अनेक संतही जन्माने निम्न वर्णातले होते, त्यामुळे ते दलित साहित्यात वसू शकले.

## आधुनिक साहित्यातले भारतेंदु युग

संतकाव्यामध्ये असलेला सामाजिक समतेचा संदेश नंतरच्या काळातही कधी क्षीण तर कधी तीव्र स्वरूपात प्रसारित होत राहिला. चिली विश्वविद्यालयात भाषण देत असताना पाब्लो नेरुदाने सांगितले होते की, 'कवी म्हणजे कोणी 'लघू ईश्वर' नव्हे. तो दैवी आग चोरून आणणारा प्रॉमिथिअस किंवा कुठल्या विशिष्ट जातीत जन्मला आलेला देवदूतही नव्हे. तो एक कारागीर असतो. त्याचे कार्य म्हणजे कविकर्म. इतर कार्यांपेक्षा ते तेव्हा महत्त्वपूर्ण ठरते, जेव्हा तो सामाजिक प्रतिक्रियावादी शक्तींचा सामना करण्याचे ठरवितो. ते काम जोखमीचे आहे. कारण कवी केवळ 'सत्याचा रखवालदारच' असू शकतो.' साहित्यामध्ये त्या त्या काळी काही असे 'सत्याचे रखवालदार' निर्माण होत असतात.

हिंदीतल्या भारतेंदुकालीन कवितेचा विचार करताना स्पष्टपणे हे जाणवते की, याकाळची कविता बहुतांशी वस्तुनिष्ठ व वर्णनात्मक आहे. देशाची दारूण अवस्था, गुलामगिरी, आर्थिक शोषण याविषयी कवींना वाईट वाटते. बालविवाह, विधवाविवाहाला विरोध इत्यादींविषयी त्यांच्या मनात राग आहे व तो उफाळूनही येतो. पण एकूणच या कवितेत विद्रोहाचे स्वर सौम्यतर आहेत. कवींचा रोख समन्वय साधण्याकडे अधिक असल्यामुळे ते जें जे त्यांना अयोग्य वाटते, त्याचा केवळ निर्देश करण्यात समाधान मानतात. वर्णव्यवस्था, अस्पृश्यता, धर्माच्या नावावर चालणारे अनाचार गैर वाटणे वेगळे व त्याविरुद्ध खुलेपणाने उभे राहाणे वेगळे. भारतेंदु हरिश्चंद्र, बद्रीनारायण चौधरी 'प्रेमघन', प्रतापनारायण मिश्र, जगमोहन सिह, अम्बिकारत व्यास इत्यादी कवीमंडळी मनाने श्रद्धाळू, धार्मिक व समन्वयवादी आहेत. धर्म ते मानतातच आणि शक्यतो धार्मिक वादविवादापासून वेगळे राहातात.

यांच्यात अस्पृश्य कुणीही नाही, पण अस्पृश्यतेचे समर्थनही कुणी केलेले नाही. भारतेंदु हरिश्चंद्र सार्वजनिक जीवनात समाजसुधारक, पण व्यक्तिगत जीवनात अत्यंत कर्मठ, धर्मपरायण व श्रद्धासंपन्न होते. पं. बाळकृष्ण भट्टांना 'कट्टर ब्राह्मणनिष्ठ' तर बालमुकुंद गुप्तांना 'सनातनी' म्हणता येईल. खरे तर कवितेपेक्षा किंवा कथा-कादंबरीपेक्षाही या युगातले निबंधसाहित्य हे अधिक प्रगतिशील, उदार व जनतेच्या जवळचेच आहे.

## द्विवेदी युग

प. महावीरप्रसाद द्विवेदींच्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या युगाची कविता मुख्यत: राष्ट्रीय आणि सांस्कृतिक आहे. सामान्य माणसाला प्रतिष्ठा प्रथमत: याच काव्यात लाभली. सामाजिक अनिष्ट रूढींवर तीव्र हल्लेही या काळात झाले. दलित-पीडित समाजाच्या दु:खाला या कवितेत मिळालेला स्वर अधिक सच्चा होता. श्रीधर पाठक, अयोध्यासिंह उपाध्याय, मैथिलीशरण गुप्त, माखनलाल चतुर्वेदी, सियारामशरण गुप्त, बालकृष्ण शर्मा 'नवीन', रामधारीसिंह 'दिनकर' इत्यादी कवींनी वर्णव्यवस्थेचा प्रखर विरोध तर केलाच, पण या व्यवस्थेचा जनक असलेल्या मनूला प्रथमत:च खुल्लमखुल्ला प्रश्नही विचारला –

**और अधिक क्या कहे बापजी**
**कहते बुखता दिया**
**जटिल जातिका, अटल पताका जाल**
**है किसका लिया ?**
**मनूजी तुमने यह क्या किया ?**

द्विवेदीयुगीन कविता आदर्शवादी, उपदेशात्मक आणि म्हणूनच पुष्कळशी नीरस आहे. 'भारत-भारती', 'वीर पंचरत्न' सारख्या काही ओजस्वी रचना या काळात झालेल्या असल्या व कवी दिनकरची तेजोदीप्त वाणी झळाळत असली, तरी एकूण कवितेचा मार्ग संघर्षाचा, विद्रोहाचा नाही. दलित वर्गाच्या दु:खाचे वर्णन सहानुभूतिपूर्ण आहे, पण ते अनुभवजन्य असण्याचा प्रश्नच निर्माण होत नव्हता.

या युगातले एक श्रेष्ठ निबंधकार बाबू गुलाबराय यांनी आपल्या 'अधिकारी और अधिकृत' या निबंधात स्पष्टपणे लिहिले आहे की, 'जे लोक उच्चवर्गीय आहेत, त्यांना निम्नवर्गातील लोकांच्या अडचणींची व ते सहन करीत असलेल्या अपमानांची कल्पना येणार नाही. जाके पाय न फटी बिवाई, सो का जाने पीर पराई...'

त्यांचे हे कथन केवळ उच्चवर्गीय लोकांच्या बाबतीतच खरे होते असे नाही, समकालीन रचनाकारांच्या बाबतीतही खरे होते. गुप्तजींच्या काव्यात असलेली 'करुणा' व दिनकरांच्या कवितेतला 'हुंकार' कल्पनाजन्य आहेत.

## छायावादी कविता

पंत, प्रसाद, निराला आणि महादेवी वर्मासारख्या दिग्गज रचनाकारांनी सजविलेला छायावादी कवितेचा काळ 'शुद्ध कवितेचा काळ' मानला जातो. छायावादी कविता प्रत्ययाची आणि विरहाची, आत्मरतीची आणि आध्यात्मिकतेची कविता आहे. एकीकडे स्वातंत्र्याचे आंदोलन सुरू होते आणि दुसरीकडे बालकृष्ण शर्मा 'नवीन', बच्चन, नरेंद्र शर्मा, अंचल इत्यादी कवींच्या काव्यात प्रणयाचे बत रंग विलसत होते. प्रधानतः व्यक्तिनिष्ठ असलेल्या या काव्यामध्ये यत्रतत्र दलितांविषयीच्या सहानुभूतीच्या खुणा दिसून येतात. मार्क्सवादाच्या वाढत्या प्रभावामुळे दलितशोषितांबद्दलच्या जाणिवा अधिक तीव्रतेने जागृत होणे स्वाभाविकच होते. या कवींपैकी 'निराला' सर्वार्थाने दलित समाजाच्या निकट होते. गढाकोलासारख्या लहानशा खेड्यात दीनदलितांमध्ये त्यांचे प्रारंभिक आयुष्य गेले. जमीनदारी कसे व किती अत्याचार करू शकते हे त्यांनी प्रत्यक्ष पाहिले होते. स्वतः आयुष्यभर दारिद्र्याशी झुंजत राहिल्यामुळे दरिद्री समाजाच्या सर्व व्यथाकथांशी त्यांचा साक्षात संबंध राहिला. 'मैंने देखा' हे शब्द वेगवेगळ्या रूपात त्यांच्या कविता—कथांमध्ये त्यामुळेच येतात. 'भिक्षुक', 'विधवा', 'वह तोडती पत्थर', 'रानी और कानी' इत्यादी कविता, 'देवी', 'चतुरी चमार', 'बिल्लेसूर', 'बकविरा', 'कमला', 'सुकुल की बीवी', 'जानकी' इत्यादी कथासंस्मरणांमध्ये व 'वर्तमान हिंदू समाज', 'सामाजिक पराधीनता' सारख्या निबंधांमध्ये तळागाळातल्या लोकांचे, स्त्रियांचे प्रश्न ते प्रखरपणे मांडू शकले. निराला तर मुक्तभोगीच होते. पण आश्चर्य असे की, आपल्या कवितांमध्ये दलित समाजाविषयी काहीही न लिहिणाऱ्या महादेवींनी संस्मरण साहित्यात जी दलित व्यक्तिचित्रे रेखाटली ती अमर झाली. 'शृंखला की कडियाँ' निबंधसंग्रहात युगानुयुगे दडपल्या गेलेल्या स्त्रीवर्गाच्या दुःखाला वाचा फुटली. आधुनिक हिंदी साहित्यात याआधी स्त्रीमनाचा मागोवा घेणारे असे लिखाण नव्हतेच. सुमित्रानंदन पंतांच्या कवितेत 'ग्राम जीवना'ची विविध रूपे व्यक्त झाली.

उत्तर छायावादी काळात नरेंद्र शर्मा, भगवतीचरण वर्मा हे दलित जीवनाचा साक्षात्कार घडविणाऱ्या कवितांकडे वळले. कृषक, मजूर, स्त्री, दरिद्री आणि दलित हे सारेच आता काव्याचे प्रमुख विषय होऊ लागलेले दिसतात.

## प्रगतीवादी कविता

१९३५ च्या जवळपास भारतात मार्क्सवादी आंदोलनाचा प्रवेश झाला. १९३६ मध्ये सज्जाज जहीर व डॉ. मुल्कराज आनंद यांच्या प्रयत्नाने 'प्रोग्रेसिव्ह रायटर्स असोसिएशन'ची येथे स्थापना झाली. छायावादी, व्यक्तिवादी कवितेची प्रतिक्रिया प्रगतिवादी कवितेत होत गेली व सामाजिक वास्तवाची यथातथ्य अभिव्यक्ती हाच तिने मुख्यतः आपला उद्देश मानला. प्रगतिवादी कवितेने वर्ण्यविषय, भाषा, अलंकार, शब्द सर्व काही जनजीवनातून उचलले. ती खऱ्या अर्थाने जनकविता होती. निराला, सुमित्रानंदन पंत, केदारनाथ अग्रवाल, रामविलास शर्मा, नागार्जुन, शिवमंगलसिंह 'सुमन' त्रिलोचन, गजानन माधव मुक्तिबोध इत्यादी कवींनी चित्रित केलेले समाजजीवन वास्तवाच्या खूपच जवळ होते. काही एका प्रमाणात या साहित्याची भूमिका प्रचाराची असली तरी ते अधिक परिणामकारक, विविध सामाजिक प्रश्नांची दखल घेणारे व शोषितांच्या बाजूने शोषकांवर सरळ हल्ले चढविणारे होते. मात्र या साहित्याला प्राप्त झालेली ही जीवनदृष्टीसुद्धा यांत्रिक होती. मार्क्स, मार्क्सवाद, रशियन क्रांती, लाल सेना, लाल तारा, माओ ही अनेक कवींची प्रेरणास्थाने बनली व शोषितांवरचे हल्ले 'फॅशन' म्हणून काव्यात यायला लागले. भारतीय समाजात विषमता कमी नव्हती. तिचा प्रत्यक्ष अनुभव घेणाऱ्या निराला, नागार्जुन, केदारनाथ अग्रवाल, त्रिलोचन शास्त्री, शिवमंगल सिंह सुमन इत्यादींनी खऱ्या अर्थाने 'सर्वहारा' वर्गाचे प्रतिनिधित्व केले. मात्र त्रिलोचन शास्त्रींना दलितांचा उद्धारकर्ता गांधी-आंबेडकरांमध्ये दिसला नाही, त्यांना तो माओमध्ये दिसला !

तुम थे माओ, जीवन के सौ अंकुर फुटे
बंधन टूट, दलितों ने गौरव धन लूटे

प्रगतिवादाच्या पाठोपाठ येणाऱ्या प्रयोगवादी कवितेची मुक्तता काही प्रमाणात अशा 'नारेबाजी'पासून झाली असली तरी तिचा फार गहिरा व अनुभवजन्य संबंध शोपितांच्या जगाशी होता असे वाटत नाही. प्रगतिवादी कवितेची आधुनिकता वैचारिक होती व प्रयोगवादी कवितेत तेच सूत्र विकसित होत गेले. १९४३ ते १९५० या अवघ्या ७ वर्षांच्या काळात वाढलेल्या व संपून गेलेल्या प्रयोगवादी कवितेचा स्वर संघर्षाचा, विद्रोहाचा म्हणून प्रस्थापित होऊ शकला नाही. तसा तो होऊ शकतही नव्हता.

## समकालीन कविता

प्रगतिवादी कवितेनंतरच्या काव्यप्रवाहाचा विचार 'समकालीन कविता' या नावाखाली होऊ शकतो. या कवितेचे तीन मुख्य भाग पडतात. १९५० ते १९६० मधली कविता, जी 'नवी कविता' म्हणून ओळखली जाते. १९६० ते १९७० मधली कविता, जिचा उल्लेख नेहमी 'साठोत्तरी कविता' म्हणून होतो. व १९७० ते १९८० मधली कविता, जिला 'विचारकविता' म्हटले जाते. नवी कविता व्यक्तिवादी, दुर्बोध, मिथक बहुल आणि यंत्रयुगामुळे उत्पन्न झालेल्या मनोवृत्तीतून जन्माला आलेली आहे. जनतेत असलेली व जनतेकरिता लिहिली जाणारी प्रगतिवादी काव्यधारा 'नयी कविता आंदोलना'मुळे महानगरांमध्ये व मध्यमवर्गाच्या आशाआकांक्षा, वैफल्य, निराशा आणि घुसमटीत बंद झाली. विजयदेव नारायण साहींनी 'विराट ऐतिहासिक मानवा' ऐवजी कवितेत 'लघू मानवा'ची स्थापना केली. मात्र भवानीप्रसाद मिश्र, गिरिजाकुमार माथूर, सर्वेश्वरदयाळ सक्सेना, रामदरश मिश्र इत्यादी कविमंडळी 'नयी कवितेच्या' एकाकीपणा, नीरसता व विद्रूपतेच्या जंगलात हरवली नाहीत. त्यांच्या कवितांमधून — विशेषतः सर्वेश्वरदयाल सक्सेनांच्या— आजच्या दलित वर्गाची दारूण स्थिती उत्कटतेने प्रकट झालेली आढळते.

१९६० ते १९७० च्या काळात अनेक काव्यांदोलने झाली. भूखी पिढी, श्मशानी पिढी, सनातनी सूर्योदयी कविता, अकविता, सहज कविता, जनवादी कविता इत्यादी वेगवेगळ्या नावांनी ही आंदोलने ओळखली जातात. जगदीश चतुर्वेदी, सौमित्र मोहन, श्याम परमार, धूमिल, राजकमल चौधरी, मोना गुलाटी या कवींच्या कविता निषेध आणि नकाराच्या कविता आहेत. परंपरागत अर्थाने त्यांना सामाजिक कविता म्हणता येणार नाही. सामाजिक विद्रूपता व विसंगती स्पष्ट करणे हाच या कवितेचा मुख्य उद्देश असला, तरी या कवितेच्या लेखी सारेच काही निरर्थक असल्यामुळे विध्वंसाकडे तिचे लक्ष अधिक आहे. विचारकवितेचे आंदोलन चालवले अजभिल, श्रीहर्ष, विनोद शर्मा, शलभ, राजीव सक्सेना, विष्णू नागर इत्यादींनी. ७० ते ८० च्या दरम्यान बलदेव वंशी, नरेंद्रमोहन, चंद्रकांत देवताळे, हरीश पाठक ही मंडळीही अग्रभागी होती.

यात नरेंद्रमोहनच्या 'पुनर्वास का दंड'ला दलित काव्याचा दर्जा दिला जाऊ शकतो. पण ज्यांच्याविषयी जाणीवपूर्वक लिहायला हवे असे कवी आहेत नागार्जुन. 'प्रतिहिंसा' **ह्या माझ्या कवितेचा स्थायीभाव आहे'** असे सांगणाऱ्या नागार्जुनांचा काव्यसंसार सरकार आणि शोषणचक्रात सहभागी असलेल्या सर्वांच्या विरोधात प्रखर प्रतिक्रिया व्यक्त करणारा संसार आहे. ते स्वतः गरीबीत जन्मले, वाढले.

**पैदा हुआ था मैं**
**दीन-हीन अपठित किसी कृषककुल में**
**आ रहा हूं पीता अभाव का आसव ठेठ बचपनसे —**

कविता का आणि कुणासाठी करायची याविषयी त्यांच्या मनात किंचितही दुविधा नाही.

**लेखनी हो है हमारा फार**
**धरा है पट, सिन्धु है मसिपात्र**
**तुच्छ से तुच्छ जनकी जोवनी पर**
**हम लिखा करते कहानी, काव्य, रूपक-गीत**

या तुच्छाति तुच्छ माणसाला नागार्जुनांनी आपल्या कथा-काव्यांचा नायक बनविला. त्याला लुटणाऱ्यांचे वाभाडे काढले. त्यामुळे त्यांचा झुकाव राजनीतिक कविता लिहिण्याकडे अधिक झाला. त्यांनी लिहिलेल्या 'हरिजन गाथा' या दीर्घकाव्यात प्रथमतः मराठी दलित काव्याचा प्रतिध्वनी उमटताना दिसतो. आणखी एक कवी आहेत कुमारेंद्र पारसनाथ सिंह. 'भंगी कॉलनी १-२' ही त्यांची दीर्घ कविता आहे. 'भंगी कॉलनी'चे मानवीकरण करून त्यांनी स्त्रीवर आणि अस्पृश्यांवर होणाऱ्या

अत्याचारांचे मार्मिक वर्णन केले आहे. दीर्घ कवितांमध्ये त्रिलोचन शास्त्रीची 'नगई महरा' सुद्धा एक विशिष्ट कविता आहे. दलित समाजातल्या व्यक्तींची मानसिकता शास्त्री स्पष्ट करतात, त्यांच्या परंपरागत जीवनक्रमाचे अंकन करतात, पण ह्या कविता वाचून असे वाटते की, या कवितांमध्ये जो संघर्ष दाखवला आहे, वास्तविक जीवनात त्याची कधी कविता करणाऱ्यांशी, ती वाचणाऱ्यांशी गाठ पडते की नाही ?

**दलित माओं के**
**सब बच्चे अब बागी होंगे**
**अग्निपुत्र होंगे वे, अंतिम**
**विप्लव मे सहभागी होंगे**

हेही एक स्वप्न आहे. म. प्र., उ. प्र., बिहार, राजस्थानात सवर्णांनी अवर्णांच्या वस्त्या जाळण्याचे, त्यांचे सामूहिक हत्याकांड करण्याचे किती निर्घृण प्रकार घडले असतील याची गणतीच नाही. हे सर्व बदलून टाकण्याच्या आंदोलनाचे हत्यार 'हरिजन गाथे 'सारख्या व 'भंगी कॉलनी ' सारख्या कविता आहेत असे वाटत नाही.

मराठीमध्ये दलित साहित्य परिवर्तनाच्या आंदोलनाचे साधन आहे. सामाजिक समतेची प्रस्थापना व आजवर झालेल्या अन्यायांचा प्रखर विरोध हे त्याचे साध्य आहे.

निग्रो साहित्याचा प्रभाव हिंदीतल्या दलित साहित्यावर जाणवत नाही. आपल्या अस्मितेचे युद्ध लढणारी आफ्रिकी कविता केवळ परंपराभंजक नाही, परंपरेंतून स्वतःची ओळख प्रस्थापित करणारी कविता आहे. गेली अनेक वर्षे तेथली जनता ज्या राजनीतिक व साम्राज्यवादी शोषणाविरुद्ध खुला संघर्ष करते आहे, त्या संघर्षाचा परिणाम म्हणजे तेथली कविता. ती सतत संघर्षाच्या भूमीवर उभी आहे. तिच्यातही भविष्याची स्वप्ने आहेत, आकांक्षा आहेत, पण जीवनाशी तिचा संबंध कुठेही विच्छिन्न झालेला नाही, आणि संघर्षावरचा तिचा विश्वासही किंचित् ढळलेला नाही.

हिंदी कवितेत सामाजिक अन्यायाविरुद्ध संघर्ष करणाऱ्या बहुतेकांना प्रेरणा मार्क्सपासून घेतल्याशिवाय चालत नाही ! संघर्षाचा वसा घेतलेल्या 'धूमिल'-सारख्या कवींना तर नंतर नंतर कविकर्मच निरर्थक वाटायला लागते ! !

**कवितामे ज्ञानसे पहले मैं आपसे पूछता हूँ**
**जब इससे न चोली बन सकती है न चोगा**
**तो आपे कहो**
**इस ससुरी कविता को जंगल से जनता तक ढोने से**
**क्या होगा ?**

नागार्जुननी एक ठिकाणी म्हटले आहे : 'खरे तर 'क्रांतिकारी लेखन ' असे काही नसतेच. क्रांति हे एक आचरण आहे. क्रांतिकारी लेखक नसतो, जीवन असते.' कुठल्याही अर्थाने असे क्रांतिकारी जीवन जी माणसे जगली, त्यांच्यामध्ये अन्यायाविरुद्धची खरीखुरी चीड व संघर्ष करण्याची अजेय हिंमत आढळते. अशा लोकांमध्ये प्रथम क्रमांकावर प्रेमचंदांचे नाव घ्यावे लागेल.

प्रेमचंद म्हणजे दलितांचा मसीहा. भारतीय कृषक जीवनाची महागाथा लिहिणारे प्रेमचंद दलितांचे खरे-खुरे मसीहा आहेत. ते ज्या निम्न मध्यमवर्गात जन्माला आले, त्या वर्गात त्यांची प्रतिभा बंदिस्त झाली नाही. तळागाळातल्या समाजाची सर्व सुखदुःखें त्यांनी अत्यंत प्रामाणिकपणे चितारली. खरें तर प्रेमचंद साहित्यात जेवढे दलित विद्रोही आहेत तेवढे त्यांच्या समकालीन भारतीय भाषेतल्या कुठल्याही साहित्यात नसावेत. खुद्द प्रेमचंदांचा ब्राह्मणवर्गावर अतिशय राग असावा. त्यांना जमीनदारांपेक्षा, सावकारांपेक्षासुद्धा ब्राह्मणवर्ग अधिक शोषक व अत्याचारी वाटत असावा. त्यामुळे असेल, पण जे प्रेमचंदांनी आपल्या साहित्यात त्या काळी घडवून आणले तें अन्य कुणाही लेखकाने घडविले नाही. त्यांनी अस्पृश्य–ब्राह्मणांचे रोटी–बेटी संबंध स्पष्टपणे दाखविले. औदार्याने ब्राह्मणांनी हे संबंध स्वीकारले असे नाही, तर दलितांनी त्यांना तें स्वतःच्या सामूहिक बळावर स्वीकारायला लावले हें महत्त्वाचे. प्रेमचंद शेतकऱ्यालाही क्रांतीचा वाहक मानीत नाहीत व कामगारालाही मानीत नाहीत. त्यांच्या दृष्टीने क्रांतीचा वाहक दलित वर्ग आहे. म्हणून प्रेमचंद साहित्यात दलित अत्यंत आक्रमक आहेत, विलक्षण विद्रोही आहेत.

'कर्मभूमी ' तली म्हातारी सलोमी, तिला चाबकाने मारणाऱ्या हवालदाराच्या तोंडावर थुंकते. 'गोदान '-मधले चांभार पं. मातादीनची व्यवस्थित कणीक तिंबतात, शेवटी तर त्याच्या तोंडात हाडूक कोंबतात. पं. मातादीनला शेवटी सिलिया चांभारणीशी लग्न करावे लागते. 'कफन ' कथेतले घिसू आणि माधव चांभार

आहेत, पण ते धर्माची मुक्तपणे रेवडी उडवतात. 'दूध का दाम' कथेतला मुलगा भंगिणीचे दूध पिऊन मोठा होतो. 'मंत्र' कथेतला म्हातारा अस्पृश्य पं. लीलाधर चौबेला सांगतो, 'मी अशा किती तरी कुलीन ब्राह्मणांना जाणतो, जे रात्रंदिवस मद्यामध्ये बुडालेले असतात, मांसाहाराशिवाय ज्यांचे चालत नाही किती तरी असे आहेत, ज्यांना एक अक्षरही लिहिता येत नाही. पण त्यांच्याबरोबर भोजन करणे तुम्हाला सन्मानाचे वाटते. हे सर्व पाखंड तुम्हीच रचलेले आहे. तुम्ही म्हणता, आम्ही दारू पितो, पण तुम्ही तर दारू पिणाऱ्यांचे बूट चाटता. आम्ही मांस खातो म्हणून तुम्ही आमची घृणा करता, पण तुम्ही तर गोमांस खाणाऱ्यांसमोर नाक रगडता. याकरिता की, ते बलवान आहेत. उद्या आम्ही राजे झालो तर तुम्ही आमच्यासमोरही हात बांधून उभे राहाल.'

ही भाषा कमालीची आक्रमक आहे. आणि आक्रमक वाणी आणि वर्तन करणाऱ्या दलित पात्रांची निर्मिती हा प्रेमचंदांच्या साहित्याचा मोठा अलंकार म्हणावा लागेल. त्यांच्या 'रंगभूमी' चा नायक सूरदास जन्मांध चांभार आहे. तो भीक मागतो. पण वृत्तीने अपराजित आहे. 'हारे तो क्या हुआ? मैदान छोडकर भागे तो नही?' असे ठणकावून सांगतो.

कबिरानंतर दलितांच्या बाजूने इतके स्पष्ट ठणकावून सांगणारा दुसरा साहित्यकार हिंदीत झाला नाही. सवर्णातल्या उच्चतम वर्गाशी रोटीबेटीचे संबंध हे अस्पृश्य जगताचे एक मोठे स्वप्न आहे. प्रेमचंदांच्या साहित्यात त्या स्वप्नाची पूर्तता होते.

प्रेमचंद–निराला या गद्यकारांच्या परंपरेत आणखी एक नाव घ्यायला हवे ते म्हणजे श्री. अमृतलाल नागर यांचे. त्यांची 'नाच्यौ बहुत गोपाल' ही भंग्यांच्या जीवनावर लिहिलेली कादंबरी हादरवून टाकणारी आहे. स्वातंत्र्याच्या चाळीस वर्षांनंतरही भंग्यांच्या स्थितीत कसलाच फरक पडला नाही. 'मोठ्या लोकांनी घाण करावी, सगळेच करतात; पण आम्हीच असे कमनशिबी, नालायक निर्माण झालो, जे स्वतःचाही मैला उचलतात आणि दुसऱ्यांचाही. हा कुठला न्याय आहे?' भंगी युवकांचा हा प्रश्न आजही अनुत्तरित राहातो. आधी ब्राह्मणी असलेली, पण नंतर भंगीण व्हायला मजबूर झालेली निर्गुणिया या देशाचे स्वातंत्र्य शंभर टक्के खोटारडे असल्याचे निक्षून सांगते. 'आप की दुनिया मे बडे बडे गिरे हुए लोगों की तक़दीरे पलट गयी. अफरीका के लोग जो कल तक गोरों के गुलाम थे, अब खुद मुख्तयार हो गये. दुनिया मे इत्ता इत्ता इन्कलाब जिंदाबाद और आजादी के नारे लग गये, पर हम मेहतरों को किसी ने आजतक आजाद नही किया बाबूजी' हे तिचे म्हणणे दलितांची जीवघेणी व्यथा स्पष्ट करते. एक भंगीण नायिका असलेली समस्त भारतीय भाषांमधली 'नाच्यौ बहुत गोपाल' ही बहुधा पहिलीच कादंबरी असावी.

हिंदी गद्यात दलितांविषयी फारसे लिहिले गेलेले नाही. 'सौभाग्य के कीडे', 'मंदिर', 'मंत्र', 'घासवाली', 'सद्गति', 'ठाकूर का कुंआं', 'दूध का दाम' इत्यादी प्रेमचंदांच्या कथांनी हरिजनांची स्थिती स्पष्ट केलेली असली, तरी कथासाहित्यात लक्ष वेधून घेणारे स्थान प्राप्त करायला हरिजन समस्येला खूप वेळ लागला होता. १९२७ साली 'चांद' पत्रिकेने एक 'अछूतांक' प्रकाशित केला. प्रेमचंदांची 'मंदिर' ही कथा याच अंकात प्रकाशित झाली होती. प्रेमचंदांनंतर शिवपूजन सहाय, निराला, रामवृक्ष बेनीपुरी यांच्या काही मोजक्या कथा आहेत. मग दलितांच्या जीवनाविषयीची सजग जाणीव आठवते ती रांगेय-राघवची 'गदल', मार्कंडेयची 'बीच के लोग', शैलेश मरियानीची 'हत्यारे', मधुकर सिंहाची 'लहू पुकारे आदमी', सच्चिदानंद धूमकेतूची 'आखिरी कैफियत के बाद', रमेश उपाध्यायांची 'प्रौढ पाठशाला' आणि ज्ञानप्रकाशची 'प्रीतिभोज'. या कथांमध्ये राजकारणापासून ते व्यक्तिगत पातळीपर्यंत वेगवेगळ्या पद्धतीने दलितांचे शोषण कसे चालते एवढेच व्यक्त झालेले आहे.

कादंबऱ्यांमध्येही बहुतांशी अशीच परिस्थिती आहे. प्रेमचंदांच्या कादंबऱ्यांनंतर दलित जीवनाविषयीची उल्लेखनीय कादंबरी मिळते थेट १९७५ मध्ये लिहिली गेलेली श्री. गोपाल उपाध्याय यांची 'एक टुकडा इतिहास' हीच. ही कादंबरी तशी हिंदी साहित्याच्या इतिहासात दुर्लक्षितच राहिली. पण या कादंबरीची नायिका 'चनुली' च्या जीवनसंघर्षाच्या माध्यमातून श्री. गोपाल उपाध्याय यांनी दलितांच्या जीवनातील जवळपास सर्व प्रश्नांना वाचा फोडली. श्री. गोपाल उपाध्याय यांच्या मते आर्थिक दृष्टीने दलितांनी सबळ होणे हाच

दलितांवर होणाऱ्या अन्यायाला तोंड देण्याचा एकमेव मार्ग आहे.

आणखी दोन कादंबऱ्या आठवतात. श्री. गिरिराज किशोर यांच्या 'परिशिष्ट' आणि 'यथाप्रस्तावित'. दोन्ही कादंबऱ्यांमध्ये नोकरी व शिक्षणक्षेत्रात दलितांसाठी ठेवल्या गेलेल्या राखीव जागा, त्यामुळे सवर्ण विद्यार्थ्यांमध्ये निर्माण होणारा रोष, परिणामी दलितांमध्ये वाढत जाणारा हीनता-बोध व या सर्व गोष्टींमुळे निर्माण होणारे ताणतणाव यांचे चित्रण आहे. 'यथा-प्रस्थावित' मात्र प्रथमच याचा संकेत देते की, व्यक्तिगत पातळीवर होणारे दलितांच्या मुक्तीचे व विकासाचे प्रयत्न सफल होणार नाहीत. त्यासाठी सामुदायिक उठावच करावा लागेल व या उठावात केवळ दलित वर्गाचाच नव्हे, तर दडपल्या गेलेल्या सर्वांचा सहभाग आवश्यक ठरेल. दलित आंदोलनाचा संकेत देणारी आधुनिक काळातली 'यथाप्रस्तावित' ही पहिली कादंबरी असावी.

हरिजनांमधला धर्मांतरणाचा प्रश्न चितारला श्री. शैलेश मटियानी यांनी आपल्या 'गोपुली गफूरन' या कादंबरीत. विधवा असलेली गरीब हरिजन कन्या 'गोपुली' सामाजिक छळाला व दारिद्र्याला कंटाळून शेवटी सआदत मियाँची ठाकूरन बनते. किरिस्ताँव झालेली तिची मोठी बहीण तिला सांगते, 'धर्मामुळे काही होतजात नाही ताई. शेवटी जे काही होते, ते सर्व माणसामुळे. म्हणून धर्माने कोण झाले याचा तू विचार करू नकोस. याचा विचार कर की, ज्या माणसाच्या पदरी पडलीस त्याच्या मनात तुझे काय स्थान आहे.' हे सांगणे धर्मसंस्थेवर तीव्र प्रहार करणारे ठरते. तुलनेने कादंबऱ्यांपेक्षा कथासाहित्यात दलित समस्यांचे चित्रण अधिक कलात्मक व गंभीर आढळते. हाताच्या बोटावर मोजता येतील इतकेच कथा-कादंबरीकार दलित जीवनाची खरीखुरी व्यथा जाणणारे दिसतात. बाकी हिंदी साहित्यकारांची याविषयीची उदासीनता चिंतित करणारी आहे.

हिंदीतल्या गद्य साहित्यात पद्य साहित्यापेक्षा दलित चेतना अधिक आहे असे मला वाटते. सर्वच अशिक्षितांचे साहित्य म्हणजे दलित साहित्य असे मान्य केले तर हिंदी साहित्यामध्ये दलित साहित्याच्या अस्तित्वाच्या खुणा प्रारंभापासून आठवतील. ही दलित जाणीव केवळ भावनेवर किंवा कल्पनेवर अवलंबून असलेली आहे असे नाही. पुष्कळअंशी ती विवेक, विचार व अनुभवाच्या पातळीवरही आहे. डॉ. राममनोहर लोहियांपासून प्रेरणा घेतलेल्या युवा साहित्यकारांचा मोठा समूह हिंदीत कार्यरत आहे व त्यांच्या जाणिवा अधिक व्यापक, सखोल व चिंतनपरच दिसतात. अशा सर्वच लेखकांच्या रचनांचा आढावा जागेअभावी घेता आला नाही. मराठीत दलित आत्मचरित्रांचेसुद्धा आता एक स्वतंत्र दालन होऊ शकेल. गेल्या काही वर्षांत या आत्मकथानात्मक लिखाणाला खूपच बहर आलाय. हिंदीत कुणाही दलित जातीत जन्माला आलेल्या स्त्री किंवा पुरुषाचे असे आत्मचरित्र उपलब्ध नाही.

**संदर्भ :**


१) कविता और संघर्षचेतना- यश गुलाटी
२) कविता की वैचारिक भूमिका- डॉ. नरेंद्रमोहन
३) समकालीन हिन्दी कविता संवाद- डॉ. विनय अश्विनी पाराशर.
४) हिन्दी साहित्य में दलित चेतना- डॉ. आनंद वास्कर
५) आलोचना
६) भाषा


□ □

## साभार स्वीकार

### कथा

**मी एक रानफूल :** शांता वैद्य; चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८७ रु. ५० ☆ **लोकरंग :** चंद्रकुमार नलगे व गंगाधर पानतावणे-संपा.; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ५०

# बंगालीत दलित साहित्य का नाही ?

**वीणा आलासे**



कुठल्याही समाजाचा इतिहास हा त्या समाजातील मानवांनी स्वतःच घडविलेला असतो. या इतिहासाशी त्या विशिष्ट समाजाच्या भौगोलिक, नैसर्गिक, राजकीय परिस्थितीचा घनिष्ट संबंध असतो. आणि समाजाचा इतिहासच समाजाची संस्कृती घडवीत असतो. साहित्य, कला, विज्ञान व इतर ज्ञानशाखा या विशिष्ट समाजाच्या इतिहासातून घडलेल्या संस्कृतीची नाना उपांगे असतात. महाराष्ट्रात एकोणिसाव्या शतकापासूनच महात्मा ज्योतिबा फुले यांच्या नेतृत्वाखाली दलितमुक्तीच्या चळवळीस प्रारंभ झाला होता. बाबासाहेब आंबेडकरांनी सक्रियपणे या चळवळीला अधिक व्यापक अधिष्ठान प्राप्त करून दिले आणि १९६० नंतर दलित समाजातील पहिली पिढी सुशिक्षित होऊन बाहेर पडली त्या वेळी या पिढीने जातिवादाविरुद्ध एक बंडच उभे केले. समाजात चालू असलेल्या अन्यायमूलक परिस्थितीवर विदारक भाष्य करणाऱ्या कथा, कविता निर्माण होऊ लागल्या. मराठीच्या साहित्यिक इतिहासातली ही एक अत्यंत महत्त्वाची वैशिष्ट्यपूर्ण घटना आहे. दलित समाजाची अस्मिता जागृत झाली आणि एका विद्रोही जाणिवेतून काही लेखक स्वतःचे अनुभव सांगून तथाकथित कलावादी साहित्याला व समीक्षेला आव्हान देऊन सामना करण्यास उभे ठाकले ही गोष्ट कुठल्याही समाजाचे जिवंतपण दर्शविणारीच आहे. अशी विशिष्ट जाणीव, म्हणजे जातिवादामुळे अथवा अस्पृश्यतेमुळे निर्माण होणारी समाजविरोधी विद्रोही जाणीव बंगाली साहित्यात आहे का ? आणि नसल्यास ती का नाही ? हे प्रश्न मला वारंवार विचारले जातात. प्रश्नाचा पाठलाग करून मी माझी काही अनुमाने या लेखात मांडण्याचा प्रयत्न करणार आहे.

बंगाली साहित्यात आजपर्यंत दलित साहित्य अशा संज्ञेला प्राप्त ठरणारा साहित्यप्रवाह नाही ही गोष्ट अगदी सत्य आहे. याचा अर्थ सामाजिक अन्यायांविरुद्ध आवाज उठविणारे विद्रोही साहित्य नाही असा नव्हे. उलट बंगाली साहित्यात सामाजिक व राजकीय जाणिवा अतिशय तीव्र आहेत. पण सामान्यतः दलित साहित्य हे असे जातिवादामुळे निर्माण होणारे अन्याय ज्यांनी स्वतः भोगलेले आहे अशा लेखकांचे साहित्य मानले जाते. अस्पृश्यता स्वतः भोगलेला माणूस ज्या पोटतिडिकीने त्याचे अनुभव शब्दबद्ध करू शकतो तितका कोणी उच्चवर्णीय करू शकेल की नाही कोणास ठाऊक. मराठीतील दलित साहित्यिकांचाही हा दावा आहे की, ही जाणीव विशिष्ट अनुभवापोटी जन्मलेली जाणीव आहे. आणि अस्पृश्यता सोसलेल्या माणसांनी, अथवा अजूनही समाजात सुप्तपणे अस्तित्वात असलेल्या जातिवादी भेदभावांचे बळी होणारांनी, स्वतःचे मनुष्यत्व सिद्ध करण्यासाठी मांडलेले हे बंड आहे. असे स्वतः अस्पृश्यता भोगलेल्या माणसांनी स्वतःच्या न्याय्य मनुष्यत्वाच्या अधिकारासाठी लिहिलेले साहित्य बंगाली भाषेत दिसत नाही.

मग प्रश्न असा उपस्थित होतो की, याचा अर्थ बंगालमध्ये दलितच नाहीत की काय ? की ते अजूनही स्वतःची खेदजनक परिस्थिती स्वतःचे नशीब मानून चुपचाप सामाजिक पिळवणूक सहन करीत आहेत ? महाराष्ट्रातील दलित समाजात जी विद्रोही जाणीव दिसून येते ती इथल्या समाजात का नाही ? यातल्या कुठल्याही प्रश्नाचे उत्तर 'हो' किंवा 'नाही' अशा रोखठोक शब्दात देता येणे अशक्य आहे. या प्रश्नांचे उत्तर शोधण्यासाठी दोन्ही प्रदेशांच्या गेल्या ३०० वर्षांच्या इतिहासाकडे नजर टाकावी लागते.

एक गोष्ट प्रथमच मान्य करायला हवी ती ही की, संपूर्ण भारतवर्षात हिंदू समाजामध्ये जाती आणि उपजाती होत्या, आहेतही; वर्णभेद हा तर आपला वारसाच आहे. शूद्रवर्णीयांवर होणारे अत्याचार व त्यांना मिळणारी अपमानास्पद वागणूक हीदेखील भारतवर्षातील सर्व प्रदेशांमध्ये होती. असे असताना आज



अनुक्रमणिका

बंगालमध्ये शूद्र फारच कमी प्रमाणात दिसतात हे कसे ? कारण शोधायला समाजाच्या इतिहासात डूब घ्यावी लागेल. डॉ. सुकुमार सेन हे त्यांच्या 'बंगाली साहित्याचा इतिहास' या ग्रंथात लिहितात :

'सोळाव्या शतकाच्या अखेरच्या पंचवीस वर्षाच्या काळात बंगाल प्रांत परतंत्र झाला आणि राज्ययंत्रणा स्वदेशी लोकांच्या हातून गेली. आता प्रांतीय राज्यपाल व त्यांचे उच्च अधिकारी दिल्ली व आग्रा येथून येऊ लागले.'

म्हणजे सतराव्या शतकापासून बंगाल हा प्रांत पूर्णपणे मुसलमानांच्या राजकीय नेतृत्वाखाली होता.

मुसलमानांचे राजकीय धोरण हे नेहमीच त्यांच्या धार्मिक धोरणाशी निगडीत असल्यामुळे अधिकाधिक हिंदूंना इस्लाम धर्माची दीक्षा देऊन मुसलमान करवून घेणे सुरू झाले. संपूर्ण भारतावर स्वत:चे साम्राज्य स्थापन करण्याच्या दृष्टीने मुसलमानांची संख्या वाढविणे हे त्या काळच्या दिल्ली सरकारला अतिशय आवश्यक वाटत होते हे निर्विवाद. त्या दृष्टीने त्यांनी स्वधर्माचा प्रचार व प्रसार सुरू केला, आणि याला प्रथम बळी पडला तो हिंदू धर्मातील शूद्र, उपेक्षित, दलित समाज. कारण स्वत:च्या धर्मात आपली जी संभावना केली जाते त्यापेक्षा या दुसऱ्या धर्मामध्ये जातिभेद नाही, वर्णभेद नाही, अस्पृश्यता नाही, आणि ईश्वरप्राप्तीचा समान अधिकार प्राप्त होऊ शकतो, या गोष्टी उपेक्षित दलित समाजाला फार महत्त्वाच्या वाटल्या असणे सहज समजू शकते. हिंदू धर्मामध्ये ज्यांना मंदिराची पायरी चढण्याला मज्जाव त्यांना जर दुसऱ्या एका धर्मामध्ये सरळ मशिदीत प्रवेश मिळत असेल आणि सामूहिक प्रार्थनांमध्ये समान अधिकार मिळत असेल तर त्यांना तो दुसरा धर्मच अधिक श्रेयस्कर वाटणे साहजिकच नाही काय ? हिंदू धर्मावर दुसऱ्या धर्माचे आक्रमण होऊ शकण्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे त्यातील वर्णभेद हे आहे. बंगालमध्ये मुसलमानांचे राज्य दीर्घकाळ राहिल्यामुळे धर्मांतराची प्रक्रिया अतिशय दीर्घ काळापासून अखंड चालू राहिली ही वस्तुस्थिती आहे. समाजाच्या खालच्या स्तरातील उपेक्षित समाज ईश्वरप्राप्तीच्या इच्छेसाठी का होईना पण दुसऱ्या एका धर्माच्या तत्त्वांकडे आकर्षित होतो व त्या धर्माची दीक्षा घेऊन स्वत:ची सामाजिक परिस्थिती काही प्रमाणात सुधारण्याचा प्रयत्न करतो ही गोष्ट धर्मांतराच्या या प्रक्रियेने सिद्ध झालेली आहे.

बंगालमध्ये सुरू झालेल्या या व्यापक आणि प्रदीर्घ धर्मांतराचा परिणाम असा झालेला आहे की, आज पश्चिम बंगालमध्ये अंगमेहनतीची कामे करणारा संपूर्ण कामगार वर्ग हा मुसलमान आहे. या प्रदेशात जातीयवादामुळे निर्माण होणाऱ्या ताणतणावांपेक्षा धर्मभेदातून निर्माण होणारे ताणतणाव जास्त तीव्र स्वरूपाचे आहेत. ब्रिटिशांविरुद्ध चळवळ उभी करून भारताच्या स्वातंत्र्याचा लढा ऐन भरात आलेला असताना बंगालची फाळणी व्हावी हे कसले लक्षण आहे ? बंगालमधील धर्मांतरित मुसलमानांची संख्या इतकी जास्त आहे की, त्यांचे आज 'बांगला देश' नावाचे एक स्वतंत्र राष्ट्र निर्माण झाले आहे. या लहानशा देशाची राष्ट्रभाषा बंगाली आहे, त्यांचे सांस्कृतिक संचित बंगाली संस्कृतीशी निगडीत आहे, त्यांचे आचार, विचार बंगाली मातीत रुजलेले आहेत, खाण्यापिण्याच्या सवयी बंगाली धर्तीच्या आहेत, पण त्यांचा धर्म मात्र मुसलमान धर्म आहे. आज बांगला देशमध्ये बंगाली संस्कृतीच्या व भाषेच्या रक्षणासाठी जे रक्त सांडले जात आहे ते पश्चिम बंगालमधील बंगाल्यांना लाज आणेल असे आहे. रवींद्रसंगीत निर्भयपणे गाता यावे म्हणून 'बांगला देश' मध्ये पाकिस्तानी मुसलमानांशी झुंज द्यावी लागली त्यांना. आपल्या मातृभाषेवर उर्दूचे आक्रमण होऊ नये म्हणून चळवळ उभारावी लागते आहे. बंगालमधील धर्मांतरित मुसलमानांनी— आणि यांपैकी बहुजनसमाज हा शूद्रवर्णीय म्हणून संबोधल्या गेलेल्या हिंदूंचा—स्वत:च्या स्वत्वरक्षणासाठी इतका प्रचंड लढा दिलेला आहे की, त्यांचे एक स्वतंत्र राष्ट्र निर्माण झाले आहे असे मला आज म्हणावेसे वाटते आहे. असे म्हणणे अतिशय धाष्टर्याचे आहे ही गोष्ट खरी. आणि धर्मांतरितांच्या मूळ जाती शोधणे तितके सोपे नाही. कारण त्यांच्या पिढ्यान्‌पिढ्या मुसलमान धर्मातच वाढलेल्या आहेत. पण धर्मांतराची प्रक्रिया ज्या मूलकारणापासून सुरू होते ते कारण बघता हे विधान अतिशयोक्त ठरू नये.

या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील गेल्या ३०० वर्षातील सामाजिक परिस्थिती न्याहाळली तर आपणास असे दिसून येते की, महाराष्ट्राने सतराव्या शतकापासून सतत मुसलमानी आक्रमणांशी अतिशय समर्थपणे लढा दिलेला आहे. इस्लाम धर्मनिष्ठ राज्याला स्वधर्मनिष्ठ राज-

कारणाचा शह देऊन शिवाजीमहाराजांनी मराठा साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवली. त्यांच्या उदात्त धोरणांवर हे साम्राज्य फार काळ टिकू शकले नाही आणि पेशवे पंतप्रधान झाल्यानंतर तर महाराष्ट्रात ब्राह्मण्याचा सुकाळ झाला. ही वस्तुस्थिती असली तरी राजकीय यंत्रणा हिंदूंच्याच हातात राहिल्यामुळे इस्लाम धर्माची दीक्षा घेणारांची संख्या मात्र आटोक्यात राहिली हे खरे. अर्थात त्याबरोबरच हिंदू धर्माचे रक्षण व या धर्माच्या घडणीत अंतर्भूत असलेल्या जातिभेदांचे व वर्णभेदांचे रक्षणही आपोआप होत गेले. मंदिरात प्रवेश मिळत नसला तरी भक्तिपरंपरेतील संत कवींनी स्वतःच्या विहित कर्माच्या आधारेच मोक्षप्राप्ती होऊ शकते ही श्रद्धा जनमानसात रुजविली. मुसलमानांच्या धार्मिक आक्रमणाला थोपवून धरण्यास ही श्रद्धा उपयोगी पडली.

पुढे एकोणिसाव्या शतकात संपूर्ण भारतवर्ष ब्रिटिशांच्या हातात गेल्यावर आणि ब्रिटिशांच्या साहित्याचा व तत्त्वज्ञानाचा प्रभाव पडल्यानंतर आपल्या समाजात प्रबोधनाची चळवळ सुरू झाली. पाश्चात्त्य तत्त्वज्ञांच्या विशुद्ध मानवतावादाचा प्रभाव हा जसा बंगालवर तसाच महाराष्ट्रावरही पडला. आणि आपापल्या समाजाच्या घडणीत रुजून गेलेल्या अन्यायमूलक प्रथांवर, अंधविश्वासांवर घणाघात होऊ लागले. मिल, ह्यूम इत्यादींच्या तत्त्वज्ञानावर पोसलेली भारतीय सुशिक्षितांची पिढी, बरीचशी कृतीने व लेखनाद्वारे समाजातील विघातक प्रवृत्तींवर टीका करू लागली. यातूनच हळूहळू ब्रिटिशांच्या साम्राज्यवादी धोरणाविरुद्ध आवाज उठू लागला. आणि विसावे शतक उजाडल्यानंतर हाच आवाज अधिक तीव्र होऊन सामाजिक प्रबोधनाची धार बोथट होऊ लागली. हा सर्व इतिहास अतिशय जटिल, गुंतागुंतीचा व विविध चढउतारांचा असला तरी आपल्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट ही की, विसावे शतक उजाडल्यावरही आणि मानवतावादी प्रबोधनाची झुळूक लागून गेल्यानंतरही महाराष्ट्रात अस्पृश्यता राहिली. बंगालमध्ये जर फार पूर्वीच इतक्या व्यापक प्रमाणात धर्मांतर होऊन गेले नसते तर इथेही ती राहिली असती.

पण बंगालमध्ये धर्मांतर अगोदरच होऊन गेलेले असल्यामुळे धार्मिक मतभेद तीव्र होत गेले आणि विसावे शतक उजाडताच प्रांताची फाळणी होण्याचे संकट उभे राहिले. इकडे महाराष्ट्रात विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकापासूनच बाबासाहेब आंबेडकरांनी विशुद्ध मानवतावादी धोरणाने अस्पृश्यांची चळवळ उभी केली. अस्पृश्यांच्या प्रत्यक्ष जीवनात येणाऱ्या अन्न-पाण्याच्या प्रश्नांना वाचा फोडली. साधे पिण्यासाठी व वापरण्यासाठी पाणी मिळावे म्हणून महाराष्ट्रातील अस्पृश्यांना बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली जी झुंज द्यावी लागली ती महाराष्ट्रातील अस्पृश्यांच्या प्रश्नाची जाणीव देण्यास पुरेशी आहे.

याबाबतीत बंगाल हा प्रांत सुदैवी. अजूनही या प्रांतात प्रेते जाळणारे 'डोम' वगैरे जातींचे अस्पृश्य लोक आहेत. पण त्यांना पाण्याची मारामार सोसावी लागत नाही. बंगालमध्ये भरपूर नद्या आहेत, त्यांना भरपूर पाणी असते, आणि जागोजाग छोटी तळी—यांना 'पुकूर' म्हणतात—असंख्य आहेत. त्यामुळे या प्रदेशात नेहमीच मुबलक पाणी उपलब्ध असते आणि बंगाल्यांचा मुख्य आहार म्हणजे मासे, हेही या पाण्यातूनच मिळतात. या भौगोलिक परिस्थितीतील नैसर्गिक भेदामुळे महाराष्ट्रातल्यासारखा 'चवदार तळ्याचा' उठाव बंगालमध्ये होऊ शकत नाही. शिवाय या प्रदेशातून वाहणाऱ्या नद्या या गंगेच्या शाखा असल्यामुळे त्यांना पावित्र्याचेही वरदान लाभलेले आहे. त्यामुळे पाणी या अत्यंत जीवनावश्यक वस्तूच्या दुर्मिळतेमुळे निर्माण होणारे प्रश्न बंगालमध्ये नाहीत. अस्पृश्यता अतिशय तापदायक न होण्याचे हेही एक महत्त्वाचे कारण होय.

अस्पृश्यांचा प्रश्न हा भारतवर्षातील एक अतिशय महत्त्वाचा प्रश्न असून त्यामुळे या देशातील जनतेत फूट पडू शकते ही गोष्ट महात्मा गांधींनी हेरली आणि स्वातंत्र्याच्या लढ्याबरोबरच त्यांनी अस्पृश्योद्धाराचे कार्य हातात घेतले. पण त्यांच्या 'हरिजन' या शब्दामध्येही दलितांना वर्णवर्चस्वाची भावना जाणवली आणि अत्यंत काटेकोर मूल्यमापन करून बाबासाहेब आंबेडकरांनी दलितांचा उद्धार नव्हे तर दलितांचा अधिकार मागण्यासाठी आंदोलन उभे केले. आंबेडकर हे स्वतः दलित जमातीतील पण अत्यंत बुद्धिवादी गृहस्थ, स्वतंत्र भारताची घटना मांडणारे कायदेपंडित, पण त्यांच्यासारख्या बुद्धिवादी, मानवतावादी कायदेपंडितालाही या आपल्या समाजाच्या रंध्रारंध्रात मुरून गेलेल्या

जातीयतावादाची पाळेमुळे उखडून काढता आली नाहीत. किती झाले तरी अशिक्षित व धर्मभोळ्या समाजात वैचारिक बीजे रुजविणे हे फार जिकिरीचे व जवळजवळ अशक्यप्राय वाटणारे काम आहे. अशा खालच्या स्तरातील समाजाला एका धर्माऐवजी दुसरा एखादा अधिक मानवतावादी धर्म हाच पर्याय होऊ शकतो ही गोष्ट बाबासाहेबांना जाणवली आणि १९५६ साली नागपूरच्या दीक्षाभूमीवर त्यांनी स्वतःच्या हजारो जातबांधवांबरोबर सामूहिक धर्मांतर घडवून आणले. हजारो अस्पृश्य त्या दिवशी बौद्ध झाले आणि जणू काही एका धर्माने आपल्या अस्तित्वाला लावलेले लांच्छन त्यांनी धुऊन काढले असे म्हणावे लागेल.

महाराष्ट्रात १९५६ साली झालेले सामूहिक धर्मांतर आणि बंगालमध्ये तीनशे वर्षांच्या प्रदीर्घ काळात घडत गेलेले व्यापक धर्मांतर, या दोन घटना वधितल्या म्हणजे आज महाराष्ट्रातल्यासारखी दलित साहित्या-मागची विद्रोही जाणीव वंगालमध्ये का नाही हे स्पष्ट-पणे जाणवते. महाराष्ट्रातील धर्मांतरित पिढीला अजून आपल्या पूर्वधर्माची व त्यात मिळणाऱ्या अपमानास्पद वागणुकीची आठवण आहे. हे हीण अजून ताजा घाव होऊन राहिले आहे. आणि त्यातच शिक्षण मिळाल्या-मुळे या ताज्या घावांना वाचा फुटते आहे. याउलट बंगालमध्ये वर्णभेदाची नव्हे तर धर्मभेदाची जाणीव जास्त प्रमाणात आहे. आणि साहित्यापुरते बोलायचे झाल्यास धर्मभेदापेक्षाही वर्णभेदाची जाणीव अतिशय तीव्र आहे असे म्हणावे लागेल.

कारण असे की, प्रांताची फाळणी व त्यामुळे घरा-दारांचे उद्ध्वस्तपण आणि निर्वासित अवस्था वंगाल-मधल्या लोकांनी भोगली आहे. केवळ पोटासाठी मोताद झाले की माणसामाणसातले सर्व भेद केवळ अन्नाभोवती घोटाळतात. मूठभर भातासाठी जेव्हा दारोदार फिरावे लागते तेव्हा कोण कुठल्या जातीचा की धर्माचा हे प्रश्न उद्भवतच नाहीत. पूर्व बंगालमधून निर्वासित होऊन पश्चिम बंगालमध्ये येणाऱ्या माणसांनी असे प्रसंग भोगले होते. आणि म्हणूनच १९१७ साली रशियामध्ये जी क्रांती झाली तिचे प्रत्यक्ष परिणाम बंगाली साहित्यावर जास्त प्रमाणात झाले. माणसामाणसांमधले इतर सर्व भेद क्षुद्र स्वरूपाचे असतात, खरा भेद हा आर्थिक परिस्थितीत वर्गभेद आहे, आणि या भेदामुळे माणसाचे माणूसपण धोक्यात येऊ शकते, ही वर्गजाणीवनिष्ठ कम्युनिस्ट विचारसरणी बंगाली साहित्यिकांना जास्त मानवली. रवींद्रनाथ टागोरांच्या साहित्याविरुद्ध आवाज उठविणारा जो 'कल्लोल' नावाचा साहित्यिक पक्ष होता त्यातील बरीच मंडळी कम्युनिस्ट विचारसरणीने भारावलेली होती हे सत्य आहे.

ताराशंकर वंदोपाध्याय, माणिक वंदोपाध्याय, सुभाष मुखोपाध्याय, प्रेमेंद्र मित्र, विष्णू दे, काजी नझरुल इस्लाम, अचित्यकुमार सेनगुप्त, हुमायून कबीर, अन्नदाशंकर राय इत्यादी अनेक मान्यवर साहित्यिक १९३० सालच्या सुमारापासून लिहू लागले व त्यांच्या प्रगतिवादी लेखनाने बंगाली साहित्याचा चेहरामोहरा पालटून टाकला. अजूनही विशुद्ध कलावादी धोरणाने लेखन करणारे साहित्यिक बंगाली साहित्यात आहेत, पण सामाजिक व राजकीय जाणिवेतून लेखन करणारांचे प्रमाण जास्त आहे व त्यांचा सामान्य वाचकवर्गावर पगडाही आहे. या समर्थ साहित्यिकांच्या लेखनात वर्ग-वादाची जाणीव दिसून येते आणि अशा भेदग्रस्त आर्थिक परिस्थितीत माणसांचे परस्परसंबंध कधीही निरोगी स्वरू-पाचे राहू शकत नाहीत असा अढळ विश्वास दिसून येतो.

डाव्या विचारसरणीने प्रवृत्त झालेल्या काही मंड-ळींनी, ज्यात बलराज सहानी, शंभू मित्रा, कैफी आजमी इत्यादी लोक होते – १९४२ साली मुंबईत इंडियन पीपल्स थिएटर असोसिएशन स्थापन केली, हे सर्वविदित आहे. या चळवळीत जो जनजागृतीचा आदर्श नाटकां-साठी शिरोधार्य मानला होता त्या आदर्शाची फळे खरे तर मुंबईपासून हजारो मैल दूरवरच्या बंगाली रंग-भूमीवर दिसून आली. कम्युनिस्ट विचारसरणीच्या प्रभावामुळे बरटोल्ट ब्रेशट या जर्मन नाटककाराची नाटके रूपांतरित स्वरूपात बंगाली रंगभूमीवर जितकी झाली तितकी इतर कुठल्याही प्रांतात झालेली नाहीत.

महाराष्ट्र व बंगाल या दोन प्रांतांमधील जाणिवां-मध्ये हे जे सूक्ष्म भेद दिसून येतात त्यांची कारणेही अशी सामाजिक व राजकीय परिस्थितीशी निगडीत आहेत. कडवा धर्माभिमान–मग तो कोणत्याही धर्माच्या माणसांचा असो–हा शुद्ध मानवतावादाला हानिकारक असतो ही गोष्ट निर्विवाद सत्य आहे. दलित साहित्या-मागची विद्रोही जाणीव ही नकारात्मकतेने का होईना पण विशिष्ट धर्मातील अन्यायमूलक प्रेरणांना धक्का देणारी जाणीव आहे. ही जाणीव निर्माण होणे हे जितके महत्त्वाचे आहे तितकेच ही जाणीव केवळ अस्पृश्यतामूलक प्रश्नांशी निगडीत न राहाता अधिक व्यापक होत जाणेही आवश्यक आहे. दलित साहित्या-मागची प्रेरणा ही मानवतावादी प्रेरणा आहे. आणि कुठलीही मानवतावादी प्रेरणा ही नेहमीच बदलत्या परि-स्थितीबरोबर काळाचे भान ठेवून वेगाने बदलत असते.

□□



अनुक्रमणिका

# मल्याळम् साहित्य

(भंग्याचा पोर : टोटियुटे मकन)

**सौ. धनश्री हळबे**



इ. स. १९४७ साली प्रकाशित झालेली 'भंग्याचा पोर' ही श्री. तकळी शिवशंकर पिल्ले यांची अत्यंत गाजलेली एक सफल कादंबरी आहे. अत्यंत वास्तववादी आणि तितकीच कलात्मक. ज्यावेळच्या साहित्याच्या कल्पनेत भंग्याचा पोर एखाद्या कथेचा चरित्रनायक होऊ शकतो ही कल्पनाही पचवणं कठीण होतं अशा वेळी लिहिलेली. राजेमहाराजांच्या किंवा नायर लोकांच्या कथा–कहाण्यांऐवजी ज्याच्या अस्तित्वाचीही दखल घेतली जात नाही अशा चक्क एका अस्पृश्य, उपेक्षित भंग्यावर कादंबरी लिहून तकळींनी त्यावेळच्या समाजाला आणि साहित्याला एक जबरदस्त धक्का दिला होता. एका भंगी कुटुंबाच्या तीन पिढ्या या कादंबरीत आल्या आहेत – इशुक्कुमुत्तू, चुटलमुत्तू आणि त्याचा मुलगा मोहन.

कादंबरीला आरंभ इशुक्कुमुत्तू तापानं फणफणत असल्यामुळे कामावर जाऊ शकत नाही इथून होतो. रजेसाठी तो ओव्हरसिअरकडे निरोप पाठवतो. पण तीस वर्षं इमाने-इतबारे काम करूनही आणि एवढ्या काळात फक्त पाच-सहा दिवसच रजा घेतलेली असूनही 'तू आला नाहीस तर दुसऱ्या कुणाला तरी कामावर घेऊ' म्हणून ओव्हरसिअर त्याला दम देतो. इशुक्कुमुत्तूला ओव्हरसिअरच्या वागण्याचं नवल वाटतं. जन्मभर नेकीनं काम करून अन् वेळोवेळी ओव्हरसिअरचा हात ओला करूनही त्यानं अशी धमकी का द्यावी? तो तशा तापात रात्री कनवटीला दीड रुपया बांधून ओव्हरसिअरकडे जाऊन आपल्या मुलाला–चुटलमुत्तूला–माझ्या जागी घ्या म्हणून गळ घालतो अन् मुलासाठी नोकरी मिळवूनच परततो. दुसऱ्या दिवशी आपला झाडू, बादली त्याच्या हाती सोपवून त्याला आशीर्वाद देऊन तो कामावर पाठवतो. आपण भंगी आहोत आणि आपल्या हाती आलेली ही झाडू–बादली मरेपर्यंत आपल्याला चिकटून राहाणार याची चुटलमुत्तूला पूर्ण कल्पना असते. त्या रात्री त्याचा डोळा लागत नाही. पण भंगी झाल्यावर आपण कसं वागायचं याबद्दल त्यानं मनाशी आधीच निश्चय केलेला असतो. आपण दारू प्यायची नाही, खूप पैसा साठवायचा आणि बड्या माणसांसारखं वागायचं. सर्वसाधारण भंग्याला येणारे अनुभव त्यालाही पहिल्याच दिवशी येतात. लोकांनी देऊ केलेलं शिळंपाकं अन्न तो नाकारतो अन् उपाशीपोटी घरी येतो. त्याच्या वेगळेपणाला इथूनच सुरुवात होते. त्याचा बाप डोळ्यात प्राण आणून त्याची वाट पाहात असतो, पाण्यासाठी तडफडत असतो अन् चुटलमुत्तू घरी येण्याआधीच तो मरतो. चुटलमुत्तूच्या नवीन जीवनाला सुरुवात होते. एकट्यानं! तो भंगी असला तरी भंग्यांमध्ये रमत नाही. त्यांच्यात मिसळत नाही. त्यांचं दारिद्र्य, त्यांचा गलिच्छपणा, त्यांची व्यसनाधीनता–या साऱ्या गोष्टींचा त्याला अत्यंत तिटकारा आहे. त्यामुळे तो अगदी एकटा पडतो. मी जरी भंगी असलो तरी माझ्या मुलाला मी भंगी बनू देणार नाही हे त्यानं मनाशी पक्कं ठरवलेलं असतं. त्याच्या या जगावेगळ्या महत्त्वाकांक्षेसाठी तो काय हवं ते करायला तयार असतो. आपला एकुलता एक मित्र पिच्चांटी–त्याच्यावर तो चोरीचा आळ घेतो. स्वतः मजदूर युनियनचा आरंभ करून त्यातून अंग काढून घेतो. वर तीच युनियन मोडण्यासाठी अधिकाऱ्यांशी हातमिळवणी करतो. आपल्या पत्नीला–वल्लीला– तो मेहतराणीचं काम करू देत नाही. एवढंच नव्हे, तर तिला आपल्या जमातीतल्या स्त्रियांमध्ये मिसळूही देत नाही. तिच्यावर एकटीनं राहाण्याची सक्ती करतो.

गावात देवीची भयंकर साथ पसरते तेव्हा आपल्या जातभाईंशी हा अत्यंत निष्ठुरतेनं वागतो. देवीचा कोप होऊ नये म्हणून सर्वजण पूजा करण्याचं ठरवतात व त्यासाठी वर्गणी गोळा करण्यात येते. चुटलमुत्तूजवळ विश्वासानं दिलेल्या रकमेपैकी काही भाग स्वतःच हडप करण्यात याला कसलीही दिक्कत वाटत नाही. भंग्यांचा मुखिया बनून आपल्याच साथीदारांशी बेइमानी







करून त्यांचे पैसे तो लुटतो. नगरपालिकेचे ओव्हरसिअर अन् अध्यक्षांच्या बोलण्याला फसून आपल्या कमाईतला किती तरी हिस्सा जमीन आणि घर विकत घेण्याच्या इच्छेनं अध्यक्षांच्या हवाली करीत असतो. माणूस जो धंदा करतो त्याचा वास त्याच्या शरीराला येतो असा त्याचा विश्वास असतो. आपल्या अंगाला येणारी संडास साफ केल्याची घाण आपल्या मुलाला लागू नये म्हणून तो मुलाला हातसुद्धा लावत नाही. एक दिवस त्याचा मुलगा मोहन आपल्या आईजवळ मी आज बाबांबरोबर जेवणार म्हणून हट्ट धरतो. तर त्या रात्री चुटलमुत्तू जेवतच नाही. त्याच्या या विक्षिप्त वागण्याला त्याची पत्नी वल्ली कंटाळून जाते. ती त्याला सरळ सांगते, कितीही वेगळा काढलात तरी तुमचा मुलगा हा शेवटी भंग्याचाच पोर आहे. स्वतःच्या मोठं आणि वेगळं होण्याच्या महत्त्वाकांक्षेपायी स्वतःभोवती निष्ठुरतेचं वलयच त्यानं निर्माण केलं आहे. त्याची बायको वल्ली त्याला आपण हे मेहतराचं काम सोडून दूर कुठे तरी जाऊ म्हणून सुचवते. ते त्याला पटतंही, पण नगरपालिकेच्या अध्यक्षांजवळ पैसे देऊन ठेवलेले असतात ते मिळणार कसे ? हा एक प्रश्नच असतो.

अन् याच वेळी गावात कॉलऱ्याची भयंकर साथ सुरू होते. चुटलमुत्तूची स्मशानात रखवालदार म्हणून नियुक्ती होते. भंग्याच्या कामातून सुटका झाल्याचा त्याला आनंद होतो. पण माणसं साथीनं किडामुंगीच्या मौतीनं मरतात. मृत्यूचं ते थैमान रोज तो उघड्या डोळ्यांनी बघत राहातो. या वेळेपर्यंत मोहनला आपला बाप भंगी आहे हे कळून चुकतं. तिकडे म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष पैशांसंबंधी विचारल्यावर ते देण्याची टाळाटाळी करतात. तो अगदी हवालदिल होतो. पैसे मिळोत—न मिळोत, इथून कुठे तरी दूर निघून जायचं असं ती दोघं ठरवीत असतात. अन् एक दिवस ते दोघेही त्या भयंकर साथीला बळी पडतात.

तिसऱ्या पिढीतला मोहन हादेखील भंग्याचीच नोकरी करतो. पण भंग्याचं काम करणाऱ्या त्याच्या पिढीच्या राहाणीत व वागण्यात अगोदरच्या पिढ्यांपेक्षा बराच फरक पडलेला असतो. त्यांच्या समाजाला आपल्या हक्कांची, आपल्या अधिकारांची जाण आलेली आहे. मोहनला आपलं बालपण आठवतं. आपले बाबा, आई किती स्वच्छ आणि व्यवस्थित वागत. म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षांना आपल्या बाबांनी पैसे ठेवायला दिले होते. ते त्यांनी परत केले नाहीत याचीही पुसटशी आठवण त्याच्या मनात जागी होते. असे अनेकांचे पैसे हडप करून नगरपालिकेचे अध्यक्ष खूप श्रीमंत झालेले असतात. एका आलिशान इमारतीचं त्यांच्या हस्ते उद्‌घाटन होतं. आपल्या युनियनचा आदेश नसतानाही मोहन सूडाच्या भरात त्या इमारतीला आग लावतो व इमारत आगीच्या भक्ष्यस्थानी पडते.

दुसऱ्या दिवशी कामगारांची एक भली मोठी मिरवणूक गावातून जाते. 'क्रांतीचा विजय असो' असा गगनभेदी घोष करणाऱ्या त्या मिरवणुकीच्या अग्रभागी भंग्याचा पोर मोहन असतो. त्याचे मित्र त्याच्या गळ्यात मोठ्या प्रेमानं लाल फुलांच्या माळा घालतात. लाठीमार व गोळीबारानंही तो जमाव पांगत नाही.

नगरापासून थोड्या दूर अंतरावर एक मोठा माळ आहे. अनेक वर्षं झाली. काळानं त्यावरची माती वाहून नेल्यानंतर हाडांचे काही सापळे त्या टेकडीवर स्पष्ट दिसू लागतात. एका सापळ्याच्या गळ्यात काही लाल धागे दिसतात. त्या माळावर ते हाडांचे सापळे नाचत असतात म्हणे... असा कादंबरीचा शेवट आहे. कादंबरीतील पहिल्या पिढीचा इशुक्कुमुत्तू हा दारिद्र्य, दुःख, अवहेलना, अन्याय सारं निमूटपणे, अगतिकपणे सोसणाऱ्या पिढीचा प्रतिनिधी आहे. त्या पिढीचा अनेक वर्षांपासून चालत आलेल्या रूढी व परंपरांवर विश्वास आहे. त्याबद्दल त्यांची मुळीही तक्रार नाही. आपल्या परिस्थितीसाठी ही पिढी पूर्वजन्मीच्या कर्मांना दोषी धरते व या जन्मीची दुर्दशा निमूटपणे सहन करते. दुसऱ्या चुटलमुत्तूच्या पिढीला तिच्या अस्मितेची जाण आली आहे. तिला असुरी राजसत्ता व सामाजिक वर्गभेदाविरुद्ध विरोध करण्याची इच्छा आहे, पण तिच्यात ती हिंमत नाही आणि एकजुटीचं सामर्थ्यही नाही. अर्थात चुटलमुत्तू हा त्या पिढीचा प्रतिनिधी म्हणता येणार नाही. स्वतःच्या वर्णजाणिवेपेक्षाही त्याची व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा बलवत्तर आहे. त्याला विकासाची ओढ आहे. पण फक्त स्वतःच्या. तो सर्वांसमवेत जायला तयार नाही. आपण भंगी असलो तरी आपल्या मुलानं मात्र भंगी होऊ नये असं त्याला मनापासून वाटतं. त्यासाठी तो स्वतःच्या समाजापासून वेगळं होऊ पाहातो. पण त्या वेळच्या सामाजिक व्यवस्थेला ते मान्य नाही.



अनुक्रमणिका

भंग्याच्या पोरानं भंगीच असायला हवं, त्याची स्थिती कायमची हीनच असणार, अशी ही व्यवस्था सांगते. चुटलमुत्तूला ही स्वतःची हीनताच सतत टोचत असते. ती इतकी की, आपण भंगी आहोत हे तो आपल्या पोरापासूनदेखील लपवून ठेवण्याचा प्रयत्न करतो. त्याचा हा न्यूनगंड, ही जाणीव त्याला निष्ठुर बनवते, त्याच्या माणसांपासून त्याला अलग पाडते, साध्या पत्नीप्रेमापासून व वात्सल्यापासून त्याला वंचित करते.

तिसरी मोहनची पिढी ही त्यांच्यावर आजवर झालेल्या अन्यायांविरुद्ध सामना द्यायला उभी ठाकली आहे. तिला आपल्या सामर्थ्याची, एकजुटीची पूर्ण जाणीव आहे. माणूस म्हणून आपल्याला जगायचं आहे व आपण तसे जगू शकू यावर तिचा विश्वास आहे आणि तिचा मुक्तीचा मार्गही ठरलेला आहे.

तकळींवर मार्क्सवादाचा किती प्रभाव होता हे त्यांच्या भंग्याचा पोर, रण्टिटङ्ङळी आदि अनेक कादंबऱ्यातून स्पष्ट दिसून येतं. आमूलाग्र सामाजिक बदल घडवण्यासाठी साम्यवाद हा एकच उपाय आहे असा त्यांचा विश्वास आहे.

म्हणूनच कादंबरीच्या शेवटी माळावर हाडाच्या सापळ्यावर दिसणाऱ्या लाल धाग्यातून एक दिवस या लाल क्रांतीनं साऱ्या दिशाही रंगतील हे भविष्य त्यांनी सूचित केलं आहे.

कादंबरी जुन्या ढंगानं लिहिली असली तरी तिच्यातील भाषा अत्यंत सरळ, सोपी, ओघवती आहे. त्यात कुठेही कृत्रिमता नाही, आवेश नाही, किंवा आक्रोश नाही. तरीही यातील प्रसंग मनाला चटका लावून जातात. स्मशानात रोजच्या रोज होणाऱ्या मृत्यूच्या भयानक दर्शनानं चुटलमुत्तू अस्वस्थ होतो. आगामी संकटाची जणू चाहूल त्याला लागलेली असते. सर्वांपासून आपण दूर, अलग पडल्याची, आपल्या एकलेपणाची त्याला अत्यंत तीव्रतेनं जाणीव होते. तो वल्लीला म्हणतो, 'आपल्याला आपलं म्हणावं असं कुणीच नाही ग! आपण दोघंही एकटे आहोत, अगदी एकटे. आपल्यावर प्रेम करणारं जगात कुणी कुणीही नाही. मला फक्त तू अन् तुला मी.' भंगी समाजाच्या बोलभाषेचा साहित्यात वापर करून हीदेखील तकळींनी त्या वेळी एक क्रांतीच केली होती. कादंबरीतील एकमेव स्त्रीपात्र वल्ली. महत्त्वाकांक्षेचा गंधही नसलेली एक सामान्य मुलगी. तिच्या मनाची कुतरओढ, नवऱ्याच्या हेकेखोरपणापायी तिची होणारी फरफट आणि शेवटी नवऱ्याच्या विचारांशी सहमत होण्यापर्यंत तिच्या मनाची झालेली तयारी. तिचा हा विकास लक्षणीय आहे. नायर समाजात जन्म घेऊनही भंग्याच्या आचारविचारांचं बारीक तपशीलांसह वर्णन तकळींनी केलं आहे. त्यांनी उलगडून दाखवलेलं हे उपेक्षितांचं अंतरंग अत्यंत हृदयस्पर्शी झालं आहे. या कादंबरीची तुलनाच करायची झाली तर मुल्कराज आनंदांच्या 'अन्टचेबल' या कादंबरीशी करता येईल. जेव्हा एखाद्या साहित्याचा मूळ आशय समाजजीवन हाच असतो, तेव्हा ते एखाद्या विशिष्ट भूभागाचं साहित्य राहात नाही. 'भंग्याचा पोर' ही कादंबरीदेखील फक्त केरळची राहात नाही. सामाजिक विषमतेनं ग्रासलेल्या सबंध भारताचीच ती कथा होऊन बसते.

'तकळीं'चा जन्म इ. सन १९१२ साली अॅलेप्पी (आलप्पुळ) जिल्ह्यातील कुट्टनाटच्या खोऱ्यात तकळी या गावी झाला. त्यांचं अरिप्पुत्तु हे घराणं शेतकऱ्यांचं. आई पार्वतीअम्मा व वडील पी. शंकर कुरूप यांचा हा एकुलता एक मुलगा. त्यामुळे फक्त माता-पित्यांचाच नव्हे तर आसपासच्या सगळ्यांचाच तो कौतुकाचा. त्यांच्या घरच्या एका शूद्र नोकराचं (मटियत्तरि कुअप्पन् त्याचं नाव) त्याच्यावर अत्यंत प्रेम होतं. या बाळाला जवळ घेऊन गोंजारावं अशी त्याला अत्यंत इच्छा होई. शेवटी न राहावून त्यानं एक दिवस त्याला कडेवर घेतला अन् शंकर कुरुप्पांनी आकाशपाताळ एक केलं. नोकरानं घाबरून त्याला पटकन् खाली ठेवला. 'पुल्ला' जातीच्या त्या प्रथमस्पर्शानं जणू किमया केली. पुढील आयुष्यात अस्पृश्यतेचे ते कट्टर विरोधी बनले. त्यांची अत्यंत गाजलेली कादंबरी रण्टिटङ्ङळी (दोन शेर धान्य) ही त्यांनी त्यालाच अर्पण केली आहे. प्राथमिक शिक्षणानंतर गावापासून ५ मैल अंतरावर असलेल्या अंबलपुळा या समुद्रकिनाऱ्यावर वसलेल्या गावी त्यांनी इंग्रजी शिक्षणाला सुरुवात केली. सतत सागराशी झुंज घेणाऱ्या कोळ्यांचं जीवन त्यांना अगदी जवळून बघायला मिळालं. या कोळी समाजाचं जीवन पुढे त्यांच्या 'चेम्मीन' या कादंबरीत त्यांनी रंगवलं आहे. त्यांची पहिली कथा नायर सर्व्हिस सोसायटीच्या स्मरणिकेत

छापून आली. तेव्हाच वाचकांमध्ये त्यांच्याविषयी उत्सुकता निर्माण झाली होती. पुढे श्री. केसरी ए. बाळकृष्ण पिल्ले यांच्या 'प्रवोधकन' या सुप्रसिद्ध साप्ताहिकात त्यांनी आपली दुसरी कथा पाठवली. बाळकृष्ण पिल्ले यांनी त्यांच्या प्रतिभेची चुणूक हेरली व त्यांना प्रोत्साहनपर एक छोटंसं पत्र पाठवलं. तकळींचा ऊर अभिमानानं भरून आला व आपल्या लेखनाला त्यांनी जोमानं सुरुवात केली. पुढे त्रिवेंद्रमच्या लॉ कॉलेजमध्ये ते वकिलीची परीक्षा पास झाले. (या त्यांच्या शिक्षणासाठी त्यांच्या वडिलांना आपली बरीचशी जमीन विकावी लागली होती.) पुढे त्यांनी काही वर्षं वकिलीही केली. त्याच सुमारास त्यांच्या 'त्यागत्तिनु फलम्' (त्यागाचं फळ) व 'पतितपंकजम्' या लघु कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. वकिलीत तकळी जास्त काळ रमले नाहीत. ते परत कुट्टनारमधील आपल्या गावी आले आणि शेती व लेखन या दोन गोष्टींवरच त्यांनी आपलं लक्ष केंद्रित केलं. कुट्टनारच्या मातीशी त्यांचं अतूट नातं होतं. सारा जन्म त्यांनी त्या मातीवर, तिथल्या माणसांवर अन् तिथल्या निसर्गावर प्रेम करीत घालवला. केरळातील विविध राजकीय व सामाजिक आंदोलनं, कॉंग्रेसची असहकाराची चळवळ, दुसरं महायुद्ध, भारताचं स्वातंत्र्य व विभाजन, कम्युनिस्टांची आंदोलनं, त्यांच्यावर होणारे अत्याचार, कम्युनिस्ट सरकारचं अधिकार ग्रहण व पतन या व अशा साऱ्याच ऐतिहासिक, सामाजिक घटना कुट्टनारमधील या सारस्वताच्या मनावर कोरल्या जात होत्या व त्यांच्या चिंतनातून नवनवीन कलाकृती साकारत होत्या. त्या वेळचे एक प्रसिद्ध मजूरनेते वी. सुगतन यांचा एका साप्ताहिकात भंग्यांवर एक लेख आला होता. 'भंग्याचा पोर' ही त्यावरूनच सुचलेली कादंबरी आहे असं तकळींनी एके ठिकाणी नमूद केलं आहे. तरुण वयातच ते फ्रॉइड व मार्क्सच्या तत्त्वज्ञानाकडे आकृष्ट झाले होते. समाजातील अंधश्रद्धा, परंपरेतून आलेल्या अनिष्ट रूढी, उच्चनीच भेद हे सारं नाहीसं करायचं तर संपूर्ण समाजच बदलायला हवा, व नवसमाज निर्माण करण्याचा साम्यवाद हाच एक मार्ग आहे, असा त्यांचा दृढ विश्वास होता. साहित्य केवळ कला व आनंदासाठी नाही, तर समाजाचं वास्तव दर्शन घडविण्याचं ते एक कलापूर्ण साधन आहे, अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे त्यांचं बरंचसं साहित्य विशिष्ट हेतूनं निर्माण झालेलं आहे. तरीही कलागुणांना त्यामुळे बाध आलेला नाही. रण्टिटङङळीमध्ये त्यांनी शेतमजूर-जमीनदार संघर्ष दाखवला आहे. 'औसेफन्टे मक्कळ्' (औसेफची मुलं) या कादंबरीमध्ये त्यांनी ख्रिश्चन धर्मातील विषमतेचं दर्शन घडवलं आहे. त्या काळी ह्या कादंबरीनं ख्रिश्चन समाजात बरीच खळबळ माजवली होती. त्यांच्या कथा-कादंबऱ्यातून अनेक व्यक्ती व समाजाचं दर्शन आपल्याला घडतं. वर्गकलह हा त्यांचा आवडता विषय. पण त्याला अपवाद असलेलं त्यांचं साहित्यही उच्च प्रतीचं आहे. इ. सन १९५६ सालचा साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळालेली 'चेम्मीन' ही त्यांची कादंबरी क्षणोक्षणी मृत्यूशी सामना करणाऱ्या कोळ्यांच्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली करुत्तम्मा आणि परिक्कुट्टी त्यांची एक हृदयस्पर्शी प्रेमकथा आहे. केरळ साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभलेली 'एणिप्पडिक्कण' ही एक प्रदीर्घ कादंबरी सन १९२८ ते १९५८ च्या सुमारास केरळात झालेल्या राजकीय परिवर्तनाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली. यात केरळच्या तत्कालीन सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक जीवनाचं त्यांनी प्रत्ययकारी दर्शन घडवलं आहे. इ. सन १९८५ सालची ज्ञानपीठ पुरस्कारानं सन्मानित 'कयर' (दोर) ही अशीच एक बृहदाकार अन् असंख्य पात्रं असलेली कादंबरी. इ. सन १९८३ सालचा वयलारू रामवर्मा पुरस्कारही हिला लाभला होता. ही एका प्रदेशाची, अनेक पिढ्यांची कथा आहे. २५ वर्षांच्या साधनेनंतर साकारलेली. जमिनीच्या मालकी हक्कांचे कायदे सतत बदलत असतात. त्यानुसार सामाजिक व आर्थिक परिवर्तन घडत असतं व त्या अनुषंगानं माणसांमधली नातीही बदलतात हा या कादंबरीचा विषय आहे. इ. सन १९८१ सालचा ज्ञानपीठ पुरस्कार मिळालेल्या श्री. एस. के. पोट्टेकाट यांच्या 'ओरु देशत्तिन्टे कथा' (एका भूभागाची कहाणी) या कादंबरीप्रमाणं 'कयर' कादंबरीलाही 'कुट्टनाटचा इतिहास' हे नाव देता आलं असतं. पण तिचं नाव त्यांनी सातत्य सुचविणारा, गोफासारखा अनेक धागे मिळून वळलेला, विविध संबंधांचे धागे गुंफून वळलेला, जीवनरज्जू दोरखंड हे ठेवलं. त्यांच्या इतर निर्मितीपेक्षा या कादंबरीचं रचनातंत्रही वेगळं आहे. बलुनफळ् (फुगे) ही आजच्या युवापिढीवर आधुनिक ढंगानं लिहिलेली अशीच एक अलीकडची

कादंबरी आहे. तकळी गेली साठ वर्षं सतत लेखन करीत आहेत. त्यांच्या आतापर्यंत २९ कादंबऱ्या, सतरा-अठरा कथासंग्रह, एक आत्मचरित्र प्रसिद्ध झालं आहे. आजपर्यंत लिहिलेल्या त्यांच्या कथांची संख्या पाचशेच्या जवळ सहज भरेल. काळानुसार त्यांच्या रचनातंत्रातही बदल होत गेला आहे. त्यामुळे मल्याळम् गद्य साहित्याच्या विकासाचा आलेखच त्यांच्या रचनांवरून काढता येईल.

तकळींचा जन्म झाला तो विसाव्या शतकाच्या आरंभीचा काळ हा केरळातील वैचारिक संक्रमणाचा काळ होता. इंग्रजी भाषेशी परिचय होऊन तिच्या माध्यमातून परकीय भाषेतील साहित्याशी भारतीयांची ओळख होऊ लागली होती. केरळात इंग्रजी शिक्षणाला आरंभ तसा एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासूनच झाला होता. त्रावणकोर संस्थानचे राजे महाराजा स्वाती तिरुनाल यांनी इ. स. १८३४ सालीच एक इंग्रजी शाळा उघडली होती. इ. स. १८४१ साली त्यांनी एक छापखानाही काढला होता. केरळात शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून ख्रिस्ती मिशनऱ्यांनीही भरघोस कार्य केलं आहे. धर्मप्रसार हा उद्देश त्यामागं असला तरी इंग्रजीबरोबर मल्याळम् भाषेच्या ग्रंथप्रकाशनालाही ते मदत करीत असत. उत्तम पाश्चात्य वाङ्मयाची ओळख व्हावी म्हणून त्या वेळचे 'प्रबोधकन' या साप्ताहिकाचे संपादक केसरी ए. बाळकृष्ण पिल्ले यांनी लेखकांना अनुवाद साहित्य निर्माण करण्यासाठी प्रोत्साहित केलं. पाश्चात्य वाङ्मयाच्या परिचयाबरोबरच नवीन पिढीला सभोवतालच्या परिस्थितीचं भान आलं होतं. समाजातील दारिद्र्य, अन्याय, विषमता हे सारं डोळ्यांना दिसत होतं. तोपर्यंतच्या साहित्यात त्याचा उल्लेखही आलेला नव्हता. तेव्हा पी. केशवदेव, तकळी शिवशंकर पिल्ले, वैक्कम मुहम्मद बशीर, एस के. पोट्टेक्काट, पी. सी. कुट्टीकृष्णन्, पोन्कुन्नम् वर्की यांसारखे लेखक पुढे सरसावले. जुनी चाकोरी सोडून जीवनाचं वास्तव दर्शन आपल्या रचनांमधून घडवण्यास त्यांनी सुरुवात केली. साहित्याचा केवळ मनोरंजन हा हेतू मागं पडला आणि समाजप्रबोधनाला सुरुवात झाली. केरळात अस्पृश्यता होती हे विधान म्हणजे स्वल्पोक्ती ठरेल. एके काळी तिने उच्चांक गाठला होता. नव्या युगाच्या आगमनाबरोबर अवर्णांचं दुःखदैन्य चव्हाट्यावर मांडून समाजसुधारणेसाठी, त्यांचे हक्क त्यांना मिळवून देण्यासाठी अनेक सवर्ण व अवर्णांनी आपली आयुष्यं झोकून दिली. यात स्वदेशाभिमानी पत्राचे के. रामकृष्ण पिल्लेंसारखे सवर्ण, अय्यंकाळी, 'सहोदरन्' अय्यप्पन् (सहोदरन् हे त्यांच्या वृत्तपत्राचं नाव होतं.) यांसारखे अवर्ण पत्रकार, टी. के. माधवन्, डॉ. पद्मनाभन् यांच्यासारखे अनेक नेते, अनेक लेखक, अनेक कवी होते. त्यात इळव जातीचे समाजसुधारक श्री. नारायण गुरु यांचा उल्लेख प्रामुख्यानं करायला हवा. त्यांनी जवळजवळ सर्वच सामाजिक क्षेत्रात सुधारणा घडवून आणल्या. एस. एन. डी. पी. (श्री. नारायण गुरु धर्म प्रतिष्ठान) ही संस्था समाजसुधारणेचं कार्य करण्यासाठी निर्माण झाली होती. श्री. नारायण गुरूंनी अनेक कवी व लेखकांना प्रेरणा दिली. सुप्रसिद्ध इळव कवी कुमारन् आशान हे त्यांपैकीच एक होत. वळ्ळत्तोळ्, उल्लूर (एस. परमेश्वरन् अय्यर) व कुमारन् आशान (इळव जातीचे असूनसुद्धा) महाकवी म्हणून व आधुनिक कवितेचे उद्गाते म्हणून मानले जातात. कुमारन् आशान यांच्या 'प्ररोदनम्' (ज्यात त्यांनी नंबूद्री ब्राह्मण तरुणी व चांडाल तरुण यांचा विवाह वर्णिला होता.) ह्या कवितेनं त्या वेळच्या समाजात चांगलीच खळबळ माजवली होती. मल्याळम् साहित्यात दलित साहित्य हा प्रकार नाही किंवा दलित साहित्यिकांनी निर्माण केलेल्या साहित्याला वेगळं काढलेलं नाही. दलित साहित्यिक सर्वच साहित्यिकात सामावलेला आहे. आधुनिक साहित्यिकात श्री. टातापुरम् सुकुमारन्, टी. के. सी. वडुतल (सध्या हे एम. एल. ए. आहेत), के. सी. करुप्पन्, वल्लच्चिर माधवन् ही नावं काही दलित लेखकांची म्हणून देता येतील. पण मल्याळम् साहित्यात त्यांचा दलित म्हणून वेगळा उल्लेख नाही. सर्व साहित्यिकातच त्यांचा समावेश होतो.

केरळातील उच्चनीच भेद व विषमता ही फक्त हिंदू समाजापुरतीच मर्यादित नव्हती. येथील समाज हिंदू, मुस्लिम, ख्रिस्ती या तिन्हीत समान विभागलेला होता व सामाजिक व आर्थिक विषमता सर्वच धर्मीयांमध्ये होती. परंपराप्रिय–सुधारक, धनिक–श्रमिक, जमीनदार-शेतमजूर हा भेद सगळीकडेच होता. सगळीकडे मिरासदारी असलेल्यांची साहित्यातही मिरास होती. त्यामुळे पी. केशवदेवांनी ओडयिल निन्नु (गटारातून) या

आपल्या लघु कादंबरीत एका गरीब, दरिद्री रिक्षा-वाल्याला चरित्रनायक म्हणून रंगवलं तेव्हा त्या काळी चांगलीच खळबळ माजली होती. तकळींच्या 'पतित-पंकजम्' व 'प्रतिफलम्' या कादंबऱ्यांपेक्षा 'भंग्याचा पोर' (टोटियुडे मकन्) या कादंबरीनं समाजाला चांगलाच हादरा दिला. (यातील भंगी सर्वच धर्मांचे आहेत.) वैक्कुम मुहम्मद बशीर यांनी आपल्या छद्मी व उपरोधिक विनोदाआडून मुस्लिम समाजातील उच्च-नीच भेद, विषमता व अंधश्रद्धांवर चांगलेच बोचकारे काढले, तर पोक्कुन्नम् वर्की यांनी ख्रिश्चन पाद्र्यांनी दरिद्री ख्रिश्चन जनतेवर चालविलेल्या शोषणावर आसूड ओढले. तकळींच्या रण्टिटङ्ङळी या कादंबरीत सर्वधर्मीय गरीब शेतमजुरांची परिस्थिती अगदी यथा-तथ्य वर्णिलेली आहे. केरळात वर्गजाणीव अत्यंत प्रभावी आहे. खेड्यापाड्यातला शेतकरीदेखील साक्षर आहे. त्याला स्वतःच्या अस्मितेची जाण आहे. साम्यवादाचा प्रभाव तीव्र आहे. त्यामुळेच आंबेडकरवाद इथे रुजू शकला नाही. ('कार्ल मार्क्स व त्याची तत्त्वे' या नावाचं कार्ल मार्क्सचं चरित्र मल्याळम् भाषेत 'स्वदेशाभिमानी' या वृत्तपत्राचे संपादक के. रामकृष्ण पिल्ले यांनी इ. सन १९१२ सालीच लिहून प्रकाशित केलं होतं.)

इ. सन १९४२ साली स्वातंत्र्याच्या आंदोलनानं जेवढी खळबळ इथे माजली नाही तेवढी इ. स. १९४६ साली पुन्नप्पा व वयलार या ठिकाणी कामगारांनी सरकारविरुद्ध आंदोलन केलं व त्यांच्यावर गोळीबार करण्यात आला या घटनेनं माजली होती. साहजिकच आंबेडकरवादाचा येथे प्रभाव नाही. डॉ. आंबेडकरांना येथील जनता मानते ते अत्यंत बुद्धिमान, बहुश्रुत व भारताच्या राज्यघटनेचे एक थोर शिल्पकार म्हणून. □





अनुक्रमणिका



# पत्रसंवाद



(भारतीय भाषातील दलित साहित्याचा मागोवा घेण्याच्या दृष्टीने त्या भाषांशी संबंधित लेखकमित्रांशी आम्ही संपर्क साधला. बंगाली, तेलुगू आणि उर्दू साहित्यविषयक प्रतिक्रियांची पत्रे पुढे देत आहोत— संपादक)

: १ :

कलकत्ता २७

स. न. वि. वि.

'बंगाली दलित साहित्य' या विषयावर तीन हजार शब्दात लेख लिहिणे सर्वथैव अशक्य आहे. कारण त्याबाबत लिहायला चारच शब्द पुरेसे आहेत. बंगालीत दलित साहित्य नाही. याबाबत एक वाङ्मयप्रेमी या नात्याने अनेकदा कानोसा घेण्याची कोशीश केली आहे. परंतु अजून तरी असा वेगळा वाङ्मयीन प्रवाह येथे आढळत नाही. साहित्यिक व पत्रकारांना हा प्रश्न अनेकदा विचारला असता 'आमच्याकडे दलितच नाहीत, तर साहित्यात त्यांचा सवतासुभा कुठून येणार?' असा प्रतिप्रश्न तेच करतात. त्यांच्या मते बंगालमध्ये चैतन्य संप्रदायामुळे 'भेदाभेद भ्रम अमंगल' ही भावना रुजली होती व त्यामुळे पूर्वास्पृश्य जाती-जमातींचा छळ झाला नाही. सामाजिक रीतीरिवाजातही त्यांच्याविरुद्ध फारसे निर्बंध नव्हते. इ. इ. परंतु मला स्वतःला हे कधीही पटले नव्हते. हाडी, मोची, डोम. इ. जातीत शिक्षणाचा अभाव हेच त्याचे कारण आहे. डॉ. आंबेडकर बंगालमध्ये झाले नाहीत, त्यामुळे असे घडले. (अर्थात राममोहन, ईश्वरचंद्र, रवींद्रनाथ येथे होऊनही काय घडले?) आंबेडकरांचे अनुयायी येथेही आहेत. पण त्यांच्यात साहित्यादि कलांचा अजूनही मागमूस दिसत नाही. महाश्वेतादेवी या लेखिकेच्या खटपटीने गेल्या १०-१५ वर्षात संताळ आदि आदिवासी जमातीत जागृतीची चाहूल लागते आहे. विविध सवलतींचा फायदा घेऊन आदिवासी तरुण-तरुणी शिकून पुढे येत आहेत. कदाचित् दलित साहित्याआधी येथे आदिवासी साहित्य आकारास येईल. फुटीरतावादी प्रवृत्ती वाढण्याचाही धोका आहे. काही कुरबूर-कुरकूर ऐकू येऊही लागली आहे. सारांश, येथे अजून दलित साहित्य उद्‌भवलेले नाही. त्यामुळे त्याविषयी काही लिहिणे संभवत नाही.

आपला

श्री. बा. जोशी

: २ :

पुणे ४

सप्रेम नमस्कार

'उर्दू दलित साहित्य' या विषयावर लेख लिहिण्यास आपण सांगितले आहे. परंतु उर्दूत दलित असे साहित्य नाहीच. कारण ज्या समाजाची ती भाषा आहे; त्या समाजात मराठी अर्थाने दलित असा वर्ग नाहीच. मार्क्सवादी, पुरोगामी, बंडखोर वगैरे प्रकारचे साहित्य उर्दूत आहे. परंतु त्यांचे लेखक हे सारे उच्चवर्णीय आहेत. प्रेमचंद, कृष्णचंद, बिशनसिंह बेदी, मंटो, अली सरदार जाफरी, ख्वाजा अहमद अब्बास वगैरे नावे आपल्यालाही माहीत असतील...

आपला

श्रीपाद जोशी

: ३ :

हैदराबाद २७

स. न. वि. वि.

आपण सुचविलेल्या विषयाच्या संदर्भात मी अनेकांच्या गाठीभेटी घेतल्या. बारकाईने चौकशी केली. पण क्षीण म्हणण्याइतकादेखील दलित साहित्याचा प्रवाह तेलुगूत नाही. फार फार वर्षांपूर्वी कुणी तरी प्रचारासाठी, हरिजनोद्धारासाठी काही कविता लिहिली असेल... अद्यापही कवी, कविता, लोकाभिरुची या दृष्टीने तेलुगू जगत सौंदर्यवाद, अभिजातवाद यांच्या

भोवऱ्यात आहे. थोडासा अपवाद विप्लव कवींचा. त्यावर 'पंचधारे' चा अंक आहेच... आता; तर तोही प्रवाह लुप्त होण्याच्या पंथात आहे. त्यांच्यातील तथाकथित हरिजन कवीतले मोठे कवी 'बोईभीमण्णा' यांना जाऊन भेटलो. पण त्यांनीही वर लिहिलेले मतच मांडले... उर्दूत काही वेगळे नाही. तीही प्रागतिकतेच्या पातळीच्या पुढे सरकली नाही. त्यांचे प्रश्न, दुःखे वेगळी आहेत.

आपला

प्रा. द. पं. जोशी

: ४ :

स. न. वि. वि. ठाणे दि. १५-९-८७

'पत्रिके'च्या जुलै–सप्टेंबर ८७ च्या अंकातील डॉ. गो. रा. कामतकर यांचे लोकहितवादींबद्दलचे संशोधनात्मक टिपण वाचले. (पृ. ४२–४३)

लोकहितवादींना रावबहादूर हा किताब ठाण्यास एक खास छोटा दरबार भरवून जज्ज मि. कॉघलन यांच्या हस्ते सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यात दिला गेला अशी स्पष्ट बातमी ४ सप्टेंबर १८७७ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया'त आली आहे. या बातमीत कॉघलन यांचे लो. हि. बद्दलचे प्रशंसोद्गारही आहेत. हा भाग माझ्या लोकहितवादींवरील प्रबंधात (मुंबई विद्यापीठ १९७८) पृ. ५० वर अगोदरच आला आहे. तेव्हा 'किरण' मधील बातमीमुळे संशोधकांपुढे एक आव्हानच निर्माण झाले आहे असा समज करून घेण्याचे कारण दिसत नाही.

आपला

(डॉ.) अरुण रा. जोशी

खुलासा :

म. सा. पत्रिकेच्या जुलै–सप्टेंबर १९८७ या अंकात 'पत्रसंवाद' या सदरात प्रसिद्ध झालेले पत्र (पृष्ठ ५५-५६) हे श्री. सुनील भा. शिंदे, आगरकर लेन, अकोले (जि. अहमदनगर) यांनी लिहिले आहे.– संपादक

□ □

# भारतीय दलित साहित्य : समारोप



मराठीमध्ये दलित साहित्याचा प्रवाह निर्माण होऊन दोन तपे झाली. हा प्रवाह आता स्थिर झाला असून आत्मकथन, काव्य, कथा, कादंबरी, नाटक अशा विविध प्रकारात तो आविष्कृत झाला आहे. त्याच्या वाङमयीन स्वरूपाविषयी समीक्षात्मक स्वरूपाचे स्फुट आणि ग्रंथरूप लेखनही झाले आहे. दलितांच्या तशाच अन्य प्रतिष्ठित नियतकालिकातून असे साहित्य प्रकाशित होत राहिले आहे. त्याच्याविषयीचे कुतूहल अन्य भारतीय प्रदेशातही निर्माण झाले आहे. सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक श्री. कमलेश्वर यांनी म्हटल्याप्रमाणे ते साहित्य आता साऱ्या भारतीयांचे बनले आहे. विशिष्ट प्रदेशातील कोणा जनसमूहाच्या सामाजिक व्यथा-वेदनांचे चित्रण एवढेच त्याचे रूप न राहाता एक व्यापक मानवतावादी बैठक त्याला लाभली आहे. दलित साहित्याला एका चळवळीचे रूप प्राप्त झाल्याने त्याची प्रभावकक्षाही वाढली आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दलितांमध्ये जागृत केलेला अस्मितेचा स्फुल्लिंग ही त्याची मुख्य प्रेरणा आहे.

दलित साहित्य हे वेगळे साहित्य मानावे की एका व्यापक साहित्यविश्वाचा तो भाग मानावा याविषयीची चर्चा अद्यापही चालू आहे. साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावर याविषयीचा पहिला परिसंवाद महाबळेश्वर येथे १९७० च्या नोव्हेंबर महिन्यात, कविवर्य बा. भ. बोरकर यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या, म. सा. परिषदेच्या दुसऱ्या विभागीय संमेलनात घेण्यात आला होता. मराठी दलित साहित्यिकांच्या पहिल्या पिढीने एक ऐतिहासिक कामगिरी बजावली आहे. त्यांच्या साहित्यातील प्रारंभीचा अभिनिवेश आता ओसरला आहे. एक प्रकारचा तोचतोपणा किंवा आवर्त त्यात निर्माण झाल्याचे जाणवते.

दलितांचा प्रश्न केवळ महाराष्ट्रापुरता मर्यादित नसून तो साऱ्या भारतभर पसरलेला आहे. त्या दृष्टीने अन्य भारतीय भाषातील दलित साहित्याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. हिंदी, गुजराती, कन्नड, मल्याळम्, तेलुगू, उर्दू, बंगाली इ. भाषातील दलित साहित्य व जीवन यांच्या स्थिती-गतीचा वेध घेणारे लेख आणि त्यातील काही निवडक रचनांचा परिचय प्रस्तुत अंकात आम्ही सादर केला आहे. या सर्व साहित्याचा तुलनात्मक अभ्यास हा एक संशोधनाचा विषय होऊ शकेल. धर्मांतराने होणारे स्थित्यंतर आणि त्यामुळे निर्माण होणारी सामाजिक, आर्थिक अवस्था हाही एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय होऊ शकतो. महाराष्ट्रातील दलितांच्या धर्मांतराचे सामाजिक व अन्य परिणाम दिसू लागले आहेत. तथापि बंगाल, केरळसारख्या प्रदेशात शतकापासून मुसलमान, ख्रिश्चन आदि धर्मात प्रवेश केलेल्या पूर्वास्पृश्यांच्या जीवनाचे चित्र काही वेगळेच दिसते. त्याचा ऊहापोह उपलब्ध लेखातून झालेला आहेच, परंतु तमिळनाडू किंवा देशाच्या अन्य काही भागात अद्यापि होणारे दलितांचे धर्मांतर हा चिंतनाचा विषय आहे.

मराठीखेरीज अन्य भाषातील दलित साहित्य आणि दलित चळवळविषयक लेख मागविताना थोडी पार्श्वभूमी आणि काही प्रश्न लेखकांकडे पाठविण्यात आले होते. 'मराठीत 'दलित साहित्य' ही संज्ञा पूर्वाश्रमीच्या अस्पृश्य वर्गाच्या संदर्भात विशेषत्वाने वापरली जाते. पूर्वाश्रमी अस्पृश्य असलेल्या पण आजच्या लोकशाही संकल्पनेने भारावलेल्या नवशिक्षित – स्त्री वा पुरुष– व्यक्तीने स्वजीवनाच्या अनुरोधाने गेल्या वीस–पंचवीस वर्षात जी साहित्यनिर्मिती केली आहे ती सामान्यतः दलित साहित्य या नावाने ओळखली जाते. दलित नसलेल्या व्यक्तीने केलेल्या या प्रकारच्या साहित्यनिर्मितीला दलित साहित्य असे मराठीत आज तरी संबोधले जात नाही. चातुर्वर्ण्य व्यवस्थेने स्वजीवनात निर्माण केलेल्या विविध वेदना-व्यथांना विद्रोही स्वरूपात वाचा फोडणे, हे या साहित्याचे प्रमुख प्रयोजन आहे. या साहित्याची निर्मिती करणाऱ्यांची प्रमुख प्रेरणा आंबेडकरी विचार ही आहे. यातील काही लेखक मार्क्सवादी भूमिका घेत असले तरी त्यांचे प्रमाण तसे कमी आहे.

मुख्यतः आंबेडकरवादी, पूर्वाश्रमीचे महार, पण आजचे नवबौद्ध हे या मराठी दलित साहित्याचे प्रमुख निर्माते आहेत. आपल्याकडे या संदर्भात काय स्थिती—गती आहे हे समजून घेण्याच्या दृष्टीने पुढील प्रश्नांच्या संदर्भात आपण लेख लिहावा, ही विनंती. यामुळे या विषयाच्या तौलनिक अभ्यासाला साह्य होणार आहे हे आपण जाणताच.

१) आपल्या भाषेत या साहित्यनिर्मितीला केव्हा-पासून प्रारंभ झाला ? कोणत्या कारणांनी ?

२) आपल्या भाषेतील या प्रकारच्या साहित्याचे प्रयोजन काय असते ? या साहित्याला आपल्याकडे कोणते नामाभिधान प्राप्त झाले आहे? या साहित्यनिर्मितीमागील प्रेरणा-प्रयोजनांचे स्वरूप काय ? हे लेखन करणारे लेखक पूर्वाश्रमीच्या कोणत्या जातीतून मुख्यतः पुढे आले आहेत ? कोणत्या वाङ्मय प्रकारात हे लेखन येते ?

३) कथा, कादंबरी, नाटक, कविता, आत्मचरित्र यांपैकी कोणत्या प्रकाराला प्राधान्य आहे ? निग्रो साहित्याचा प्रभाव जाणवतो का ? आपल्याकडे हे साहित्य विशिष्ट आवर्तात सापडल्याचे आपणास जाणवते का ? या साहित्यावर आंबेडकरवादाचा परिणाम जाणवतो का ?

४) या साहित्याकडे आपल्याकडे कोणत्या भूमिकेतून पाहिले जाते ? मूल्यमापनाची दिशा कोणती ? या साहित्याचे भवितव्य काय ? प्रचलित साहित्य-निर्मितीत वा साहित्यविषयक जाणिवात, विचारात काही बदल घडून आले का ? असल्यास कोणते ?

या संदर्भात आपल्या भाषेतील काही साहित्यिक समीक्षकांचेही विचार आपण जाणून घेऊ शकाल.'

या अनुषंगाने उपलब्ध झालेले साहित्य या अंकात दिले आहे. 'ब्लॅक थिएटर' आणि 'ब्लॅक लिटरेचर' (आफ्रिकन निग्रो साहित्य) या विषयावरील लेखांचा अंतर्भाव प्रयत्न करूनही प्रस्तुत अंकात करणे शक्य झाले नाही. प्रस्तुत अंकाला आणि विषयाला एक वेगळे परिमाण त्यामुळे प्राप्त झाले असते.. तमिळ, उडिया यांसारख्या अन्य भारतीय भाषातील साहित्या-चाही शोध घेण्याची आवश्यकता आहे. बंगाल किंवा केरळसारख्या राज्यात धर्मांतर मोठ्या प्रमाणात झालेले असले तरी धर्मांतराने जातीयतेचे प्रश्न पूर्णतः सुटतात असे दिसत नाही. आजच्या काळातही होणाऱ्या धर्मां-तरामागे केवळ आर्थिक विचार आहे, की सामाजिक विषमतेचा तो परिपाक आहे, हा प्रश्नही महत्त्वाचा ठरतो.

महात्मा गांधीजींची अस्पृश्योद्धाराची चळवळ आणि त्यांचे भंगी कॉलनीतील वास्तव्य यांचा परिणाम तत्का-लीन समाजसेवक आणि लेखक यांच्यावर झालेला दिसतो. 'अन्टचेबल' ही श्री. मुल्कराज आनंद यांची कादंबरी किंवा मल्याळी लेखक श्री. टकळी शिव-शंकर पिल्ले यांची 'टोटीयुटे मकन' (भंग्याचा पोर) ही कादंबरी या दोहोंचा विषय भंगीजीवन हा आहे हे लक्षणीय आहे. त्यातही प्रचलित वर्णव्यवस्थेविषयी विद्रोहाची भावना आहेच. श्री. शिवराम कारंत यांचा 'चोमा' दलितांची विवशता चित्रित करतो, तर श्री. देवनुर महादेव हे दलित कुटुंबातील ताण्यावाण्यांचे चित्रण अतिशय संयमित रीतीने करतात. गांधीवादाची मानवतावादी भूमिका आणि हृदयपरिवर्तनावरील भर यामुळे दलितांच्या परिस्थितीत फारसा फरक पडला नाही. परंतु डॉ. आंबेडकर यांच्या 'शिका आणि संघर्ष करा' या संदेशाने आधुनिक दलित तरुण भारावला गेला. स्वतःच्या जीवनाचा अर्थ आणि समाजातील स्थान यांचा तो शोध घेऊ लागला. त्याच्या अंतःकरणा-तील वेदना आणि विद्रोह साहित्यात आविष्कृत झाला आणि दलित साहित्य आकाराला आले. गेल्या पन्नास वर्षातील भारतातील दलित जीवनातील स्थित्यंतरांचा विचार केला तर त्यांच्या बुडाशी गांधीवाद, आंबेड-करवाद आणि मार्क्सवाद यांच्या प्रेरणा प्रबळ असल्याचे दिसून येते.

अन्य भारतीय भाषांतील दलित रचना : १

# मुल्क राज आनंद यांची ' अस्पृश्य ' (Untouchable)

(दलित जीवनावर इंग्रजीत लिहिलेली पहिली कादंबरी)

## म. द. हातकणंगलेकर



१९३०–३५ च्या सुमारास साम्यवादी विचारसरणीबद्दलच्या आकर्षणाची लाट निर्माण झाली होती. युरोप, इंग्लंड वगैरे पाश्चिमात्य देशांत या प्रकारचे वारे अगोदरच वाहायला सुरवात झाली होती. रशियन राज्यक्रांतीनंतर त्या देशात साम्यवादी राजवट सुरू झाल्यावर, कष्टकरी, कामगार, दरिद्री, बेघर या लोकांच्या आयुष्याचा जो कायापालट झाला होता, त्याच्या सुवार्तांनी जगभरच्या बुद्धिजीवी आणि सुशिक्षित पिढीवर फार मोठा परिणाम घडून आला होता. विचारवंतांनी या अभूतपूर्व घटनेचे उत्साहाने स्वागत केले होते. नामांकित वार्ताहर आणि साहित्यिक यांनी रशियात प्रत्यक्ष दौरा काढून आपले अनुभव ग्रंथरूपाने प्रसिद्ध केले होते. भांडवलशाही देशांतील काही कामगारांनी, कामगारांच्या या स्वर्गभूमीत स्थलांतरही केले होते. रशियात झालेल्या क्रांतीच्या दहा दिवसांनी जग हादरून सोडले होते यात शंकाच नाही. जॉन रीड या विख्यात पत्रकाराचे ' टेन डेज दॅट शूक द वर्ल्ड ' हे पुस्तक अतीव आदराने आणि कुतूहलाने जगभरातील सुशिक्षितांनी उचलून धरले होते.' त्यानंतर एडगर स्नो–चे ' रेड स्टार ओव्हर चायना ' हे पुस्तकही असेच गाजले होते. खरोखरच सर्व बुद्धिमंत ' धुक्यातून लाल ताऱ्यां ' कडे जाण्यास आतुर झाले होते. ते निखालसपणे मंतरलेले दिवस होते. साम्यवादाचा पुरस्कार करणारी मंडळे, प्रकाशन संस्था, चळवळी आणि गट प्रत्येक देशात स्थापन होऊ लागले होते. ही लाट भारतात, आणि भारतीय साहित्यिकांपर्यंत पोहचण्यास थोडा वेळ लागला तरी काही तरुण सुशिक्षितांमार्फत या प्रक्रियेला सुरवात झाली होती. स्पेनमध्ये सुरू झालेल्या संघर्षात सर्व देशांतील सुशिक्षित तरुण सामील झाले होते. त्यात काही भारतीय आणि महाराष्ट्रातले तरुणही होते. याच काळात पंडित जवाहरलाल नेहरू, कृष्ण मेनन हे इंग्लंडमध्ये होते. नेहरूंच्या मनातले साम्यवादी संस्कार याच काळात रुजलेले. त्यांची कृष्ण मेननशी मैत्री या काळातच जडली. मुल्कराज आनंद या वेळी इंग्लंडमध्ये हिरीरीने काम करीत होते. ' पुरोगामी साहित्यिक संघ ' (प्रोग्रेसिव्ह रायटर्स असोसिएशन) ही संस्था त्यांनी स्थापन केली होती. ' भारतीय साहित्य ' नावाचे नियतकालिक चालू केले होते.' मार्क्स अॅण्ड एंगल्स ऑन इंडिया ' या नावाचे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले होते. भारतीय स्वातंत्र्याबद्दल ब्रिटिश जनतेत अनुकूल मत निर्माण करण्यासाठी कृष्ण मेनन यांच्या समवेत त्यांनी मोठेच प्रयत्न चालू ठेवले होते. त्यांनी आपली ' अस्पृश्य ' (Untouchable) ही कादंबरी १९३२ साली लिहिली आणि ती १९३५ साली प्रसिद्ध झाली. या कादंबरीला सुप्रसिद्ध ब्रिटिश कादंबरीकार आणि भारत मित्र, इ. एम. फॉर्स्टर यांची प्रस्तावना मिळाली होती. भंगीकाम करणाऱ्या एका मुलाच्या आयुष्यातला एक दिवस चित्रित करणाऱ्या या कादंबरीच्या वाचनाने फॉर्स्टर सुन्न झाले. प्रस्तावनेत त्यांनी लिहिले, ' हे पुस्तक निर्मळ आहे की घृणास्पद आहे ? दहा-बारा पाने वाचली तर पांढऱ्या कातडीच्या माणसांची वाचा बसावी असा या पुस्तकाचा विषय आहे. माझी प्रतिक्रिया अशीच होते; पण एका वेगळ्या कारणाने मला हे पुस्तक इतके निर्मळ वाटते की, त्याचे वर्णन करायला शब्द अपुरे पडतात. विषयाला भिडण्याची लेखकाची जी थेट पद्धत आहे की त्यामुळे घृणास्पद समजला जाणारा विषयही शुद्ध बनतो. कादंबरीतले पात्र उद्गारते, ' लोकांना आम्ही घाण वाटतो, कारण त्यांनी केलेली घाण आम्ही धुऊन स्वच्छ करतो.' फॉर्स्टर यांनी प्रस्तावनेत आणखी एक महत्त्वाचा अभिप्राय नोंदविला आहे. त्यांनी म्हटले आहे, ' अस्पृश्य ' ही कादंबरी एक उच्चवर्णीय भारतीय माणूसच लिहू

शकला असता. परकाया प्रवेशाची मोठी शक्ती असलेला कोणीही पाश्चिमात्य प्रतिभावंत 'बाखा'ची व्यक्तिरेखा उभी करू शकला नसता. कुणा अस्पृश्यालाही ही कथा लिहिता आली नसती. कारण संताप आणि आत्म-करुणा यातच तो गुंतून राहिला असता.' या अभिप्रायात फॉर्स्टरने भारतीय दलित जीवनावरील साहित्याचे सत्त्व कसे निर्माण होईल याचे मर्म सांगितले आहे. मुल्कराज आनंद यांना हे कसे गवसले ते समजावून घेण्यासाठी त्यांच्या जीवनावर दृष्टिक्षेप टाकला पाहिजे.

मुल्कराज आनंद यांचा जन्म १९०५ साली पेशावर येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव लालचंद आनंद. ते व्यवसायाने तांबट होते; पण त्यांनी ब्रिटिश लष्करात प्रवेश मिळवला. त्यामुळे लहानपणापासून ब्रिटिश शिपायाच्या आयुष्याशी आणि वृत्तीशी मुल्कराज आनंद यांचा जवळून परिचय झाला. वडिलांची जशी बदली होईल तशी त्यांच्याबरोबर अनेक लष्करी ठाण्यांत राहण्याची संधी त्यांना मिळाली. पंजाब आणि उत्तर सीमेवरले ग्रामीण जीवनही त्यांनी पाहिले. आईकडून लोकसाहित्य, संगीत यांतली शिकवणही त्यांनी आत्मसात केली. दारिद्र्यात पिचणाऱ्या खेडुतांचे शोषण दलाल, भिक्षुकांच्याकडून कसे होते याचेही निरीक्षण त्यांनी केले. गोरेसाहेब, जमीनदार, सावकार आणि व्यापारी यांनी नाडलेल्या गरीब जनतेसंबंधी कधीतरी लिहायचे असा निश्चय त्यांनी मनाशी केलेला असणार. त्यांचे उच्च शिक्षण खालसा कॉलेज, अमृतसर येथे झाले. या ठिकाणी विख्यात राष्ट्रवादी कवी इकबाल यांच्याशी त्यांची ओळख झाली. १९२५ साली एक शिष्यवृत्ती घेऊन ते पीएच्. डी.चा अभ्यास करण्यासाठी लंडनला गेले. तेथे इरिन नावाच्या एका प्राध्यापकाच्या मुलीवर त्यांचे प्रेम जडले. या सुमारास त्यांनी आत्मवृत्तपर लेखनाचे दोन हजार पृष्ठांचे लिखाण लिहून काढले. ते कुणी प्रसिद्धीसाठी स्वीकारले असते तर इरिनशी त्यांचा विवाह झाला असता. कारण विवाहासाठी ही तिची अट होती. त्यांच्या पुढच्या साहित्याची सामग्री या लेखनात साठविली होती. इंग्लंडमध्ये ललितकला आणि तत्त्वज्ञान या विषयांचा त्यांनी विशेष अभ्यास केला. डार्विन, फ्राइड, युंग यांच्या सिद्धांतांचे परिशीलन केले. प्रसिद्ध आधुनिक कवी आणि टीकाकार यांनी सुरू केलेल्या 'क्रायटेरियन' या मासिकात लेखन केले. १९३२ साली ते भारतात परतले आणि गांधीजींच्या सान्निध्यात साबरमती आश्रमात काही काळ राहिले. 'अस्पृश्य' कादंबरीचा जन्म या ठिकाणी झाला.

मुल्कराज आनंद परत युरोपला गेले. तेथे १९३५ साली त्यांची 'कूली' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. पुरोगामी साहित्यिक संघाची स्थापना त्यांनी केली. तसेच पुरोगामी लेखकांची चळवळही सुरू केली. ते स्पेनला गेले. अर्नेस्ट हेमिंग्वेची ओळख झाली. दुसरे महायुद्ध संपत आले. तेव्हा ते परत भारतात आले. तोपर्यंत त्यांच्या बऱ्याच कथा, कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या होत्या. १९४८ मध्ये त्यांनी रशियाचा दौरा केला. तेथे त्यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय ठरल्या होत्या. त्यांनी अनेक शांतता आणि साहित्य परिषदांत भाग घेतला आहे. सध्या त्यांचे वास्तव्य खंडाळ्यात असते. 'मार्ग' या मासिकाचे ते संपादन करतात. त्यांनी 'कन्फेशन्स ऑफ अ लव्हर' ही कादंबरी अलीकडे प्रसिद्ध केली आहे. त्यांच्या कथा-कादंबऱ्यांपैकी 'द बार्बर्स ट्रेड युनियन अँड अदर स्टोरीज' हा कथासंग्रह आणि 'टू लीव्हज् अँन्ड अ बड' 'कुली', 'द व्हिलेज', 'मॉर्निंग फेस' आणि 'द अनटचेबल' या प्रमुख मानल्या जातात. त्यांनी सप्त खंडांत आत्मचरित्रात्मक कादंबरीमालिका लिहिली आहे. पुरोगामी दृष्टिकोन अबाधित ठेवून भारतीय समाजजीवनाबद्दल इंग्रजीत अर्ध्या शतकाच्यावर साहित्यनिर्मिती करणारे मुल्कराज आनंद हे निष्ठावान साहित्यिक आहेत. 'द अनटचेबल' ही दलित जीवनावरची इंग्रजीत प्रसिद्ध झालेली पहिली गाजलेली कादंबरी आहे. इंग्रजीत लेखन करणाऱ्या अन्य भारतीय लेखकांच्या वाट्याला जे व्यावसायिक यश आज आले आहे त्या तुलनेत मुल्कराज आनंद यांचे नाव तितके ठळक राहिले नाही. याचा त्यांना खेद वाटतो. असा अभिप्राय त्यांनी अगदी अलीकडे व्यक्त केला आहे.

गांधीजींचे माहात्म्य देशात प्रस्थापित झाल्यानंतर आणि राजकारणाला त्यांनी अध्यात्माची जोड दिल्यानंतर आणि त्यांनी सर्व जनतेचे पाठबळ आपल्या प्रयत्नांनी मिळविल्यानंतर, अवघा भारतीय समाज एकत्र आणण्याचे मोठे काम त्यांच्यासमोर होते. वर्ण, जात विषमतेला धर्माचे अधिष्ठान असलेल्या समाजात हे काम करणे कठीण होते. अस्पृश्यांच्या श्रमाची सोडव-

णूक त्यांनी मानवतेला आणि विशाल धर्मतत्त्वांना आवाहून करून करण्याचा प्रयत्न केला. अस्पृश्यांना हरिजन म्हटल्याने सवर्ण समाजाचा त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलेल अशी गांधीजींची धारणा होती. अन्य लहानमोठ्या पुढाऱ्यांना हा दृष्टिकोन पटत होता असे नव्हे. आंबेडकरांनी वेगळाच मार्ग अवलंबिला. मुल्कराज आनंद यांचेही गांधीजींशी याबाबतीत मतभेद होते. ते त्यांनी आपल्या या कादंबरीत व्यक्त केले आहेत. वडिलांच्याबरोबर निरनिराळ्या लष्करी ठाण्यात राहत असताना भंगी आणि सफाई कामगार यांच्या आयुष्याची त्यांनी जवळून पाहणी केली होती. या कुटुंबातील मुलांशी त्यांची जिव्हाळ्याची मैत्री होती. त्याचे प्रत्यंतर या कादंबरीत येते. एका भंग्याच्या मुलाला कादंबरीचे नायक करणे आणि ही कादंबरी इंग्रजीत लिहून प्रसिद्ध करणे यासाठी धाडस आणि पुरोगामी विचारावरची भक्कम निष्ठा याची जरुरी होती. मुल्कराज आनंद यांच्या व्यक्तिमत्वाची आणि लेखनस्वभावाची ही फार मोठी जमेची बाजू आहे यात शंका नाही. या प्रश्नाचा त्यांनी चोहोबाजूंनी विचार केला होता, याचीही साक्ष कादंबरीच्या रचनेत मिळते. अस्पृश्यांच्या प्रश्नाशी पहिला संबंध सवर्ण हिंदू समाजाचा आणि त्यांना धर्म सांगणाऱ्या पुरोहित वर्गाचा. दुसरा संबंध अस्पृश्यांच्या हीन अवस्थेचा गैरफायदा घेणाऱ्या खिश्चन धर्मप्रसारकांचा. तिसरा संबंध भारतीय जनतेच्या एकतेला संकट मानणाऱ्या इंग्रज राज्यकर्त्यांचा आणि चौथा संबंध शांततेच्या मार्गाने समाजाचे परिवर्तन करू इच्छिणाऱ्या गांधीजींसारख्या अध्यात्मप्रवण युगंधरांचा आणि पाचवा संबंध पापभीरू आणि स्थितिप्रिय भारतीय मनोवृत्तीचा. अस्पृश्यांच्या प्रश्नाशी जोडलेल्या या साऱ्या संबंधांचे जाळे मुल्कराज आनंद यांनी सतत मनाशी ठेवले आहे. यामुळे या विषयाची जाण आणि आस्था असणारा एक सवर्ण भारतीय माणूसच ही कादंबरी लिहू शकला असता, असे जे विधान फॉर्स्टरनी केले आहे त्याची मार्मिकता आपल्या ध्यानी येते.

कादंबरीचे कथानक तसे सोपे आणि सुटसुटीत आहे. त्यात फार धागेदोरे जोडलेले नाहीत. जेम्स जॉइस या अत्याधुनिक कादंबरीकाराने अवलंबिलेल्या संज्ञाप्रवाहाच्या आविष्कार तंत्राचा उपयोग मुल्कराज आनंद यांनी 'अस्पृश्य' या कादंबरीत केला आहे, असे सांगण्यात येते, पण ते औपचारिकपणानेच खरे आहे. ज्या गुंतागुंतीच्या कालविसंगतीचा आणि भाषाप्रयोगाचा उपयोग जॉइसने केला आहे. तिचा मागमूसही या कादंबरीत असण्याची गरज आणि शक्यता नाही. प्रखर सामाजिक जाणीवेतून निघालेल्या विषयाला या तंत्राची गरज नाही. एकच साम्य आहे ते असे की जॉइसच्या युलिसिस या कादंबरीत नायकाच्या मनात चोवीस तासांच्या अवधीत प्रवाहित झालेल्या संज्ञेची अखंड नोंद आहे तर 'अस्पृश्य' या कादंबरीत नायकाच्या जीवनातील एका दिवसाचे निवेदन आहे. मुल्क राज आनंद यांची तुलना डिकन्स या १९ व्या शतकातील इंग्रज कादंबरीकाराशी केली जाते. डिकन्सने सामाजिक प्रश्न कादंबऱ्यांतून मांडले ही गोष्ट खरी पण त्याची प्रतिभा व्यक्तिचित्रण आणि गुंतागुंतीचे कथानक या मार्गाने विकास पावत होती आणि तिचा आवाकाही विशाल होता. मुल्क राज आनंदांना प्रश्नांची तिडीक अधिक असल्याने, आविष्काराची विशाल आणि संथ गती त्यांना मानवत नाही. एकूण या प्रकारच्या तुलना समर्पक ठरत नाहीत आणि आवश्यक तर मुळीच नसतात.

'अस्पृश्य' या कादंबरीचे कथानक थोडक्यात असे : कथा बुलंद शहरात घडते. शहराजवळ लष्करी ठाणे आहे. तिथे अनेक सफाई कामगार कामाला आहेत. त्यांच्यातला वयोवृद्ध आणि प्रमुख कामगार आहे, त्याचे नाव लाखा. शहर आणि लष्करी वसाहत यांच्या मध्यावर त्यांची भंगी वस्ती आहे. बाखा हा त्याचा अठरा वर्षांचा मुलगा. त्याचीच ही कहाणी. बाखाने आपल्या काकाबरोबर लष्करी वसाहतीत काम केलेले असते. त्यामुळे भंगी वस्तीतला गलिच्छपणा त्याला असह्य होतो. गोऱ्या लोकांच्या राहणीचा प्रभाव त्याच्यावर पडला होता. गोऱ्या सैनिकांनी त्याला माणसाप्रमाणे वागवले होते. एके दिवशी बाखा आपल्या मातीच्या खोपटात झोपला होता. थंडी पडली होती. बाखा लष्करी पोशाखातच झोपत असे. त्याचे मित्र 'पिळपिळेसाहेब' म्हणून त्याची थट्टा करीत. बापाच्या राकट हाकेची वाट पाहत तो झोपला होता. नंतर संडास साफ करण्यासाठी त्याला बाहेर पडायचे होते. आई जिवंत होती तेव्हा ती त्याला गरमागरम चहा करून देत असे. तो बादली, झाडू घेऊन बाहेर पडला आणि एकामागून एक संडास धूत सुटला. घाणीचे काम करूनही तो स्वतः स्वच्छ दिसत असे. याचे

हवालदार भरतसिंगाला कौतुक वाटे. आपली हॉकीची काठी बाखाला देण्याचे त्याने कबूल केले होते. बाखा त्यामुळे खुषीत आला आणि गाणे गुणगुणू लागला. कामाचा त्याला अभिमान वाटे आणि त्यामुळे त्याची प्रकृतीही उत्तम राहत असे.

दलितांची स्वतःची विहीर नव्हती. विहिरीच्या अगर ओढ्याच्या पाण्याला शिवण्याची त्यांना मना होती. कुणाला तरी दया येईपर्यंत त्यांना पाण्यासाठी ताटकळावे लागे. बाखाची बहीण सोहिनी पाण्यासाठी विहिरीजवळ उभी होती. रामचरणची आई– गुलाबी धोबीणही तिथेच होती. सोहिनी देखणी असल्याने, गुलाबी तिचा द्वेष करीत असे. पंडित कालिनाथ नावाचा देवळाचा पुजारी तेथे आला आणि त्याने सोहिनीला पाणी दिले. त्याची नजर बरी नव्हती. त्याने सोहिनीला आपले अंगण झाडण्यासाठी बोलावले. बाखाने घरी येऊन चहा घेतला आणि लाखाने आपल्यावतीने त्याला गावातले संडास साफ करण्यास पाठविले. वाटेत त्याला छोटा आणि रामचरण भेटले. त्यांनी त्याला खेळण्यासाठी थांबण्याचा आग्रह केला. रामचरणची बहीण त्याला आवडत असे.

शहरात पोहोचल्यावर एका पानपट्टीच्या दुकानासमोर सिगरेट घेण्यासाठी तो थांबला. त्याने दूर ठेवलेल्या नाण्यावर पाणी शिंपडून दुकानदाराने ते घेतले. हमरस्त्याच्या दुकानासमोरून तो हिंडू लागला. एके ठिकाणी त्याने चार आण्याची जिलेबी विकत घेतली. ती खात खात रमत गमत जात असताना एका सवर्ण माणसाला त्याचा चुकून धक्का लागला. विटाळ झालेल्या त्या माणसाने बाखाला जोरजोराने शिव्या द्यायला सुरुवात केली. बाखा घाबरून निमूटपणे उभा राहिला. क्षणभरात मोठा जमाव जमला आणि त्याने बाखाला घेरले. हे अस्पृश्य शिरजोर झालेत, असे एक म्हातारा म्हणाला. विटाळलेल्या माणसाने त्याला एक सणसणीत झपाटा मारला. तो हताशपणे उभा राहिला. त्याचे डोळे भरून आले. एका मुसलमान टांगेवाल्याने त्याला धीर दिला. एका दुकानदाराने त्याला सांगितले की एक अस्पृश्य येत असल्याचे त्याने अगोदर ओरडून सांगावे म्हणजे माणसे त्याला वाट देतील.

बाखा आतल्या आत संतापाने जळफळत होता. आपली इतकी छी थू काय म्हणून व्हावी हे त्याच्या ध्यानात येईना. कारण उघड होते. तो जन्माने अस्पृश्य होता ना. माणसे एका बैलाला मात्र हात लावून आदराने हात जोडीत होती. तो देवळात गेला आणि तिथले अंगण झाडायला त्याने प्रारंभ केला. इतक्यात देवळात गलका माजला. पुजारी पायऱ्या उतरून धावत खाली आला. त्याची बहीण सोहिनी अंगणात रडत उभी होती. पुजाऱ्याने ती संडास साफ करीत असताना तिची अब्रू घेण्याचा प्रयत्न केला होता. त्या पुजाऱ्याचा तिथल्या तिथे खून करावा असे बाखाच्या मनात आले. सोहिनीने त्याला सावरले. त्याने तिला घरी जायला सांगितले. एका गल्लीत उभा राहून तो मोठमोठ्याने भाकरी मागू लागला. एक बाई बाहेर आली आणि तिने त्याला पहिल्याने गटार साफ करायला सांगितले. घराच्या पत्र्यावर उभी राहून तिने बाखाकडे खाली भाकरी फेकली. त्याला भूकही लागली होती आणि तो संतापाने जळतही होता. त्याच्याजवळ दोनच भाकरी जमल्या होत्या. आता बाप आपल्यावर उखडणार असे त्याला वाटले. घरी आल्यावर त्याच्या चेहऱ्याकडे पाहता क्षणी त्याच्या बापाने काय झाले असे विचारले तेव्हा पंडित कालिनाथाच्या किळसवाण्या वागण्याची हकीकत त्याने बापाला सांगितली. लाखाला वाईट वाटले, पण याचा बदला घेण्याची भाषा व्यर्थ आहे, असे तो म्हणाला. जेवण संपल्यावर रामचरणकडे जाण्यासाठी तो बाहेर पडला. शहराच्या बाहेर उंच गवताचा भाग होता. तेथे जाऊन एकट्यानेच आपल्या परिस्थितीचा त्याने विचार केला. त्याला अतिशय दुःख झाले. उशिरा घरी परतल्यावर त्याच्या बापाने त्याच्यावर बेफाम तोंड सोडले. त्यात त्याच्या भावानेही आपला आवाज मिळवला. 'माझ्या घरातून चालता हो.' असे बाप ओरडला. तो बाहेर पडला.

पण जाणार कुठे ? तेव्हा मुक्तिसेनेचे प्रमुख कर्नल हचिनसन यांची त्याला आठवण झाली. ते दलित लोकांच्या घरी जाऊन ख्रिश्चन धर्म स्वीकारण्यासाठी त्यांची मने वळवीत असत. लोक त्याला मानीत. त्याची बायको मात्र कजाग होती. तोच हचिनसन त्याच्या मागे उभे राहिले आणि त्याच्या खांद्यावर त्यांनी हात ठेवला. ख्रिस्त त्याला मदत करेल असे ते म्हणाले. त्यांनी बाखाला चर्चकडे नेले. ते म्हणाले की, ख्रिस्त हा देवाचा पुत्र असून तो सर्व माणसांवर सारखेच प्रेम करतो. माणसामाणसांत भेदभाव करीत नाही, पण धर्म बदलण्याची बाखाला भीती वाटली. आपल्या नवऱ्याने एका भंग्याच्या

पोराला बरोबर आणले आहे, असे पाहून हचिनसनची बायको त्याच्यावर भयानक संतापली. बाखाने तिथून पळ काढला. भंगी, चांभारांना तिने शिव्या घातल्या.

बाखा भटकत भटकत बुलंदशहराच्या रेल्वे स्टेशन-नजीक ग्रँड ट्रंक नावाच्या हमरस्त्याला येऊन पोहचला. तेथे पोरेठोरे, भिकारी, महारोगी यांचा एकच गोमगाला चालला होता. त्यांना ओलांडून बाखा रेल्वे पुलावर गेला. त्याच्या कानावर 'महात्मा गांधी की जय!' असा जयघोष आला. पाठीमागून लोकांचा लोंढा येऊन थडकला. 'महात्मा गांधी आले!' असे ते उत्साहाने ओरडत होते. सरकार गांधीजींना घाबरून आहे, असे आजूबाजूचे लोक बोलत होते. एकजण म्हणाला, "आज महात्माजी स्वदेश अगर असहकार याबद्दल बोलणार नाहीत, तर ते अस्पृश्यतानिवारण आणि हरिजन यासंबंधीच बोलणार आहेत." महात्माजी बोलू लागले. अस्पृश्यतेसंबंधी आपली भूमिका ते मांडत होते. "अस्पृश्य-तेला धर्मात आधार नाही. आपल्या घरी संडास साफ करणारा ठका नावाचा एक हरिजन होता. त्याची शिवा-शिव आपण पाळत नव्हतो. पुढच्या जन्मी आपल्याला हरिजन म्हणून जन्म घेणे आवडेल. आपल्या आश्रमात एक ब्राम्हण तरुण सफाई काम करतो. हरिजनांनी चांगले राहावे. दारू, मांस खाऊ नये. खरकट्या अन्नाची याचना करू नये. लोकांनी अस्पृश्यतेचे उच्चाटन करावे." असे आवाहन त्यांनी शेवटी केले. महात्माजींचे विचार बाखाच्या मनाला भिडले. लोक गांधीजींच्या विचारा-बद्दल आपसात बोलत होते. 'गांधीजींच्या बोलण्यात काही अर्थ नाही. एका बाजूला अस्पृश्यतानिवारणाची भाषा बोलतात आणि दुसरीकडे कर्मठ हिंदू माणसा-प्रमाणे वागतात." एका माणसाने बाखाला धरले. "जा, एक सोडावॉटरची बाटली आण!" त्याने बाखाला हुकूम सोडला. तो माणूस विलायतला जाऊन आला होता. त्याचा मित्र कवी होता. त्याचे नाव इकबाल होते. तो सांगत होता. महात्माजींच्याविषयी उलट बोलणे योग्य नव्हे. भारत गरीब राहिला, कारण आपण यंत्रज्ञानाचा स्वीकार केलेला नाही. समाजातल्या जाती नष्ट होणार आहेतच. भंगी माणसांनी भंगीकाम सोडले की त्यांची जात नष्ट होणारच आहे. यंत्रे आपली असली कामे करू लागली की असे घडायला वेळ लागणार नाही. ड्रेनेजची योजना झाली की भारतीय समाजातील अस्पृश्यता नाहीशी झाली म्हणून समजा.' बॅरिस्टर आणि कवी दोघेही निघून गेले. बाखा एकटाच राहिला. समोरच्या क्षितिजावर सूर्य अस्ताला जात होता. गांधीजींच्या भाषणातले शब्द त्याच्या कानात घुमत होते, 'तुमच्या आत्म्याची मुक्ती मिळविण्यासाठी दैवाने तुम्हांला शक्ती द्यावी!' त्याच्या अंतःकरणातली खळबळ आता निमाली होती. त्याची पावले घराकडे वळली. गांधीजींचे विचार आपल्या बापाला तो सांगणार होता.

बाखा हा नव्या युगाची आणि आयुष्याची आस लागलेला भंगी कुटुंबातला तरुण मुलगा. इंग्रज माण-सांच्या सान्निध्यात ही नव्या, स्वच्छ आणि आत्मसन्मान-पर आयुष्याची इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली आहे. हिंदू समाजातली विषमता, उच्चनीच भाव, खालच्या जातींना दिली जाणारी अपमानास्पद वागणूक या परंपरेचा त्याला संताप आला आहे तरी तो ताबड-तोब बंड करू शकत नाही. धर्मांतर त्याला रुचत नाही. यंत्रयुग आणणे त्याच्या हातात नाही. गांधीजींचा मार्गच त्याला स्वीकारता येतो. अस्पृश्यतेच्या प्रश्नाची ही मांडणी सुबोध वाटली तरी ती भाबडी नाही. परि-स्थितीचे योग्य भान तिच्यात आहे आणि प्रश्नातून मार्ग काढण्याची विलक्षण तळमळ आहे. दलित जनतेबद्दल खोलवरची करुणा आहे. परंपरेबद्दल आंधळी श्रद्धा नाही, पण अविवेकी तुच्छताभावही नाही. भारतीय आणि पाश्चिमात्य जीवनपद्धतीतील चांगले-वाईट निवडण्याची विचक्षणता आहे. अर्थात या सर्वांतली गुणवत्ता काल-सापेक्ष असणार हे उघडच आहे. मुल्क राज आनंद यांची लेखनपद्धतीही कालसापेक्षच आहे. प्रसंग, पात्रे, वातावरण, परिसर, भाषाशैली, बोधपरता हे सारे लेखनगुण जॉर्जि-यन काळातले आहेत. प्रेमचंदांची आठवणही केली जाते. आज जे दलित साहित्य निर्माण होत आहे त्याच्या तुलनेत 'अस्पृश्य' ही कादंबरी अति सुबोध वाटण्याची शक्यता आहे, पण ही दलित जीवनाबद्दलची इंग्रजी भाषेतील पहिली बीजभूत कादंबरी आहे यात शंका नाही. ते मुल्क राज आनंदांचे श्रेय कायमच राहणार.

□ □

अन्य भारतीय भाषांतील दलित रचना : २

# ओडलाळ

## डॉ. अ. रा. तोरो



श्री महादेव देवनूरु हे आजच्या कन्नड साहित्यातील एक आघाडीचे दलित लेखक. १९७० मध्ये म्हणजे वयाच्या २१ व्या वर्षी त्यांच्या कथा 'संक्रमण', 'साक्षी' आदी नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊ लागल्या. ७३ साली त्यांचा पहिला कथासंग्रह 'द्यावनूरु' या नावाने प्रसिद्ध झाला. मैसूरजवळच्या नंजनगुड् या तालुक्यातील 'देवनूरु' हे त्यांचे जन्मगाव. १९४९साली त्यांचा जन्म. मैसूरला शिक्षण. मैसूर विद्यापीठाची कन्नड विषयाची एम. ए. पदवी. त्यांच्या पहिल्या कथासंग्रहातील 'स्वतःला विकलेले,','ग्रस्त', 'एका दहनाची कथा', 'दत्त', 'डांबर आले', 'अभास' या कथांनी दलित जीवनाला कन्नड नवकथेत एक मानाचे स्थान मिळवून दिले. कर्नाटकातील अनेक दलित आंदोलनांत ह्यांचा सक्रिय सहभाग असतो. दलित संघर्ष समिती, प्रगतिपर लेखक संघ, बंडाय साहित्य परिषद आदी संघटनांच्या वतीने १९७९ साली बेंगळूर येथे भरलेल्या दलित साहित्य संमेलनात प्रमुख भाषण. आजवर त्यांची ७ पुस्तके प्रकाशित. 'गांधी आणि माओ' (अनुवाद). 'नर' नावाचे नियतकालिकही ते चालवितात. 'ओडलाळ' ही त्यांची अलीकडची लघुकादंबरी कर्नाटक सरकारने मैसूर येथे १९८५ मध्ये भरलेल्या विश्वकन्नड साहित्य-संमेलनात प्रकाशित केली.

देवनूर महादेव या कन्नड दलित लेखकाने लिहिलेली 'ओडलाळ' (पोटाची आग) ही लघुकादंबरी केवळ दलित कथा म्हणून नव्हे तर एक सनातन मानवी दुःख चित्रित करणारी ललित कथा म्हणून अधिक लक्षात राहते. १९७० नंतर कन्नड साहित्यात बंडखोर दलित लेखक म्हणून उदयास आलेल्या तरुण पिढीत देवनूर महादेव हे एक प्रमुख लेखक होत. 'द्यावनूर' हा त्यांचा पहिलाच कथासंग्रह. त्यातील कथांनी आपल्या संयत स्वरूपामुळे वाचकांचे लक्ष वेधून घेतले होते. 'ओडलाळ' ही कादंबरी वाचताना देवनूर यांच्या संयमशील शैलीने आणि त्यांच्या कलाप्रज्ञेने मन स्तिमित होते. 'ओडलाळ' ही एक कादंबरी आहे, असे म्हटले असले तरी ती एक दीर्घकथाच म्हणावी लागेल. आकाराने छोटी पण गुणात्मक दृष्टचा दलित कथेची उंची दाखविण्याचे सामर्थ्य प्रकट करणारी. कन्नड दलितकथेला मराठी दलित कथेने प्रेरणा दिली असे म्हटले जाते. पण कन्नड दलितकथेच्या प्रारंभकाळीच देवनूर सारखा वाङमयीन भान असलेला लेखक लाभावा हे केवळ कन्नड भाषेचेच नव्हे तर एकूणच दलित साहित्याचे शुभचिन्ह ठरावे. दलित कथा ही व्यामिश्र जीवनाचा तळ शोधते आहे आणि अधिकाधिक अर्थगर्भ होत आहे याची प्रसादचिन्हे दिसू लागली आहेत. 'ओडलाळ' ही अशा वळणावरची एक प्रमुख कृती म्हणता येईल. दलित कथा म्हणजे केवळ बंडाची कथा. विद्रोहाची कथा. यासाठी आक्रस्ताळेपणाने क्रांतीची कडक भाषा वापरावीच लागते अशा चुकीच्या व भ्रांत कल्पना रूढ झालेल्या पार्श्वभूमीवर देवनूरांची कथा आपल्या आगळ्यावेगळ्या संयमशीलतेने मन वेधून घेते. दलितांच्या दुःखात अखिल मानवजातीचेही दुःख आहे. याचे भान देवनूरांच्या कथेत फार तीव्रतेने जाणवते. प्रस्थापितांच्या विरुद्ध संग्राम एवढेच त्या कथेचे प्रयोजन नाही. निरर्थक आक्रोश करण्यात केवळ तिला रस नाही. प्रचाराचे झेंडे मिरविण्याचा तिला हव्यास नाही. म्हणून ती अखिल मानवजातीची कथा होते.

कामवासना आणि जगण्याची धडपड ह्या माणसाच्या मूलभूत भावना आहेत. या भावनांचे चित्रण हाच बहुधा आजच्या सर्व कथावाङमयाचा आधारविषय आहे. पण या दोन मूलभूत भावनांच्या बरोबर मनुष्याच्या ठिकाणी वंशनिर्मिती व वंशवृद्धीचीही एक आदिम भावना दडलेली आहे. जगणे एवढेच महत्त्वाचे नाही तर जगविणे हाही मनुष्यजातीचा एक ध्यास आहे. सांभाळणे, पालनपोषण करणे ही या आदिम शक्तीची बीजे होत. आपल्या मुलाबाळांचा सांभाळ करावा, त्यांच्या संवर्धनासाठी झिजत राहावे असे मनुष्याला का वाटते ? दुःखी आणि दारिद्र्यात पिचत

असतानाही कोणत्या आशेचे बंध त्याला जगवीत असतात? मानवी दु:खाचे हे पदर उलगडून पाहण्यात देवनूरांच्या कथेला रस आहे. पालन करण्याच्या मनुष्याच्या आदि-शक्तीचा शोध ती घेऊ पाहते. हा शोध घेताना म्हणूनच तिला कोणती पोज घ्यावीशी वाटत नाही. शब्दांच्या आतषबाजीला ती शरण जात नाही. आणि मग ' दलित ' शब्दांची विशेषणे आपोआप गळून पडतात. सामाजिक, ऐतिहासिक आदी वर्गवारी निरर्थक वाटू लागते. वाचकाची सहानुभूती वसूल करण्याचा येथे कसलाच खटाटोप नाही हे तीव्रतेने जाणवते. दलित कथा ही आपल्या दलितत्वाच्या कुबडया टाकून देण्यात यश मिळवीत आहे याचा सुखद अनुभव 'ओडलाळ' वाचताना पदोपदी येतो.

'ओडलाळ' ही एका दलित म्हातारीची कहाणी. म्हातारीचे नाव साकव्वा. वरवर पाहता ही कथा साक-व्वाची वाटते. पण ती आहे तिच्या साऱ्या कुटुंबाची. साकव्वाला तीन मुलं. दोन मुली. दोन मुलांची लग्नं झालेली. एक मुलगी आपल्या नवऱ्याला सोडून दोन मुलांसह माहेरी येऊन राहिलेली. थोरल्याला मूलबाळ नाही. मधल्याला चार कच्चीबच्ची. धाकटं पोरगं जुगार खेळायचं आणि रात्री गावाबाहेरच्या मरीआईच्या देव-ळात झोपायला जायचं. थोरल्याची बायको गरीब. तर मधल्याच्या बायकोला माहेरचा ताठा जास्त. मुलीचं थोरलं पोरगं रोगिष्ट होतं. भिंतीच्या कडेला सदा पडून राहायचं. दुसरं पोरगं तिसरीच्या वर्गात शिकत होतं. म्हातारीची धाकटी पोरगी अजून लग्नाची होती. असा हा सारा गोतावळा म्हातारीनं मोठया कष्टाने बांधलेल्या घरात चार वेगळया चुली मांडून जगत होता. साकव्वाचा नवरा तिला सोडून दुसऱ्या बाईकडे राहत होता. स्त्री असून पुरुषासारखी कष्टाची कामे करून साकव्वाने हे घर उभं केलं होतं. गावात चार एकर जमिनीचा तुक-डाही तिनं मिळविला होता. पोरं, सुना आपआपल्या-परीने रोजगार करून पोटं भरत होती. आता साकव्वा पार थकली होती. अंगावरची कातडी हाडांना लोंबक-ळल्यासारखी वाटायची.

साकव्वाने पाळलेला एक कोंबडा कालपासून घरातून नाहीसा झाला होता. आज तरी तो घरी परतेल म्हणून ती त्याची वाट पाहत होती. देवाला सोडलेला तो कोंबडा म्हातारीने मोठया श्रद्धेने आणि मायेने सांभाळला होता. कोंबडा कोणी चोरला असेल याचा अंदाज कर-ताना म्हातारीला एकदम तिच्या सवतीची आठवण झाली. त्यासरशी हाती काठी घेऊन कोंबडा शोधण्या-साठी ती घराबाहेर पडली. मनात ती सवतीला शिव्या-शाप देत होती. सवतीच्या घराजवळचा उकिरडा तिनं काठीनं सगळा उकरून पाहिला; पण व्यर्थ. गावभर भटकून ती घरी परतली. ' कोंबडा चोरणाऱ्याचा सत्या-नाश होईल,' ती म्हणाली. घरातल्या दुसऱ्या कोणाला कोंबडयाचे तितकेसे दुःख नव्हते याचेच तिला अधिक दुःख झाले. अंगणातल्या मातीत ती गडबडा लोळली. छाती बडवून घेत तिनं एकच आकांत केला. मग तिच्या मुलींनी तिला दंडाला धरून आत पडवीवर नेऊन बसविलं.

दुपारी मधल्या सुनेबरोबर म्हातारीचं कडाक्याचं भांडण झालं. म्हातारीनं आपली ईस्टेट आपल्यानंतर थोरल्या मुलीला देईन असं म्हटलं म्हणून सुनेला राग आला होता. ईस्टेट काय तिची एकटयाची आहे ? असा सवाल तिनं हातवारे करीत सासूला विचारला होता. विशेष म्हणजे म्हातारीच्या मुलानेही आपल्या बायकोची कड घेतली होती. आपण बांधलेल्या घरावरची कौलं उडून गेली तर ती कशीबशी गवतानी झाकणाऱ्या आपल्या पोरांनी ईस्टेटीचा वाटा मागावा याचा म्हाता-रीला विशेष राग आला. 'खऱ्या बापाची असशील तर घरात राहून दाखव.' सासूने सुनेला दम दिला. हे भांडण असे जोरात चालू होते, पण सुनेची धाकटी पोरं मात्र सासूच्या अंगाखांद्यावरच खेळत होती. चार-दोन कपडे माहेरच्या ट्रंकेत कोंबून सून घराबाहेर निघाली होती. इतक्यात म्हातारीचा थोरला मुलगा आला आणि त्यानं हे सगळं वादळ समजूतदारपणे शांत केलं. आईला व भावाला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. थोरल्या सुनेनं चहा केला. पोराच्या आग्रहामुळं म्हातारीनेही 'बोशी' तोंडाला लावली. भाजलेले फुटाणे सुनेनं म्हातारीच्या हातावर ठेवले तेव्हा म्हातारीनं मधल्या सुनेच्या पोरांना बाहेर बोलावून त्यांच्याही हातावर दोन-दोन दाणे दिले. थोडया वेळापूर्वी या घरात कडा-क्याचे भांडण झाले होते याचा मागमूसही उरला नव्हता. भांडलेल्या सुनेची पोरं अजून सासूच्या अंगावरच खेळत होती.



अनुक्रमणिका

म्हातारीच्या धाकट्या मुलीनं भिंतीवर दोन बाजूला दोन मोरांची चित्रं छानसारखी रंगवली होती. पण म्हातारीला त्याचे कौतुक नव्हते. ती तिसरीत शिकणाऱ्या नातवाला बरोबर घेऊन अंधार पडू लागला तशी कोंबडा शोधण्यासाठी पुन: बाहेर निघाली. या वेळी नातवाशी चाललेला तिचा संवाद मात्र मोठा गमतीदार होता.

"चल की रं पोरा," म्हातारी.

"नाय. मला भ्या वाटती," पोरगं.

"मी हाय नव्हं," म्हातारी.

"तू असलीस म्हनून काय ?"

"यमदूत बी पळत्यात."

"त्यांनी तुलाच ओढून नेलं तर ?"

"मला कशाला म्हातारीला ओडतील रं! मीच येतू चला म्हनीन !"

"अन् मग ?"

"त्यांच्या अदूगर मीच त्यांना यमराजाकडं घेऊन जातो."

(या वेळी म्हातारीच्या ठिकाणी नातवाला आपली तरुण मावशी दिसू लागली.)

"मग यमराजा काय करतो ?"

"यमराजा आपल्या दूतांना सिक्सा करील."

"तरीबी तुला भ्या वाटत नाई ?"

"अरं, म्या इतकं कस्ट सोसल्यात, त्या यमाच्या सिक्सेचं मला काय बी नाय वाटत. हेच मी त्याला सांगेन." म्हातारी.

"मग तो काय म्हनंल ?" पोरगं.

"तो म्हनंल, म्हातारे, तुजं धैर बगून खूष झालो. काय पायजे तो वर माग!"

"मग ?"

"मग मी म्हनीन. बाबारे, माझ्या नातवाला राजा कर!"

हा संवाद मुद्दाम एवढ्याचसाठी सांगितला की साकव्वाचे व्यक्तिमत्त्व केवळ संवादाच्या माध्यमातून अगदी सहजगत्या काव्यात्म पातळीवर नेण्यात लेखकाने दाखविलेले कौशल्य ध्यानी यावे. प्रपंचाच्या क्षुद्र गोष्टीत आयुष्य कंठूनही ही म्हातारी प्रसंगी तत्त्वज्ञान बोलू लागते. लौकिकाच्या मर्यादेत अलौकिकाचे दर्शन घडते.

कोंबडा शोधण्यासाठी म्हातारी गावभर भटकते. कोणाच्या घरी कोंबडीचा रस्सा केला असेल तर नातवाच्या नावे रस्साही मागते. पण कोंबड्याचा पत्ता काही लागत नाही. निराशेने म्हातारी घरी परतली.

अंधार वाढू लागला. काळोखात गाव गुडुप झाले. आणि मग म्हातारीच्या थोरल्या मुलाने कोणा सावकाराच्या घरातले चोरलेले शेंगाचे पोते घेऊन तो हळूच घरात आला. त्याने शेंगांचा ढीग जमिनीवर ओतला. त्याच्या बायकोने चुलवाणातली चार धाटं व पालापाचोळा गोळा करून शेकोटीच्यासारखा जाळ केला. घरातल्या सगळ्यांना हाका मारून बोलावलं. म्हातारी, मुलं, सुना, नातवंडं अशी सगळी शेंगाच्या ढिगाजवळ भाजलेल्या शेंगा खाण्यासाठी जमली. बाहेर दाट काळोख तर आत पेटलेल्या जाळासमोर म्हातारीचे कुटुंब चोरीच्या शेंगांवर पोटाची आग शमवीत होतं. शेंगाची टरफलं आगीत टाकता टाकता गप्पा रंगात आल्या होत्या. गावातल्या सावकारानं टोलेजंग घर कसं बांधलं हे थोरल्यानं सांगितलं तर धाकट्या तरुण पोरानं गावातल्या एका सवर्णाच्या हॉटेलात शिरून चहा, दोसा कसा खाल्ला याची फुशारकी मारली. बहिणीचं लगीन औंदा आपल्या ऐपतीला साजेल अशा बेतानं करायचं असा निर्वाळा मधल्यानं दिला. अशा गप्पा रंगल्या होत्या. थोरल्या सुनेनं मग गुळाचा चहा केला आणि मग ही शेंगाच्या सहभोजनाची पंगत उठली.

सकाळी म्हातारी जागी झाली ते पोलिसांच्या आरडाओरडीने. पोलिसांनी तिच्या घरावर छापा टाकला होता. चोरीस गेलेले शेंगाचे पोते शोधण्यासाठी पोलीस आले होते. रात्री शेंगाचे पोते या घरात आणताना म्हातारीच्या मुलाला पोलिसाने पाहिले होते. त्याने बाहेरून घराला कुलूप लावले व पहाटे हा छापा टाकला. घरातल्या सर्वांना दमदाटी करीत पोलीस घरातली गाडगी मडकी विस्कटू लागले. बाहेर रस्त्यावर बघ्यांची ही गर्दी जमली. हा सारा प्रसंग लेखकाने विस्ताराने वर्णन केला आहे. पोलीस व फौजदार यांच्या पोकळ बढाईचे व दांभिकतेचे वर्णन लेखकाने विनोदी पद्धतीने केले आहे. सारे घर धुंडाळूनही पोलिसांना शेंगाचे पोते गवसले नाही. थोरल्या पोराला त्यांनी मारहाण केली. म्हातारीच्या देवघरात बुटाच्या पायाने ते शिरले. म्हातारीच्या तरुण पोरीच्या गालाला फौजदाराने हातातल्या काठीने डिवचले. पण शेंगा काही मिळाल्या नाहीत. चोरीची माहिती देणाऱ्या पोलिसावरच मग



अनुक्रमणिका

शेवटी फौजदार खेकसला. हात हलवीत पोलीस परत जायला निघाले. इतक्यात म्हातारी फौजदाराजवळ गेली आणि हात जोडून म्हणाली, " सायब, माजं कोंबडं एक चोरीला गेलंय, सायब. तेवडा तपास लावा, सायब. लई उपकार होतील."

" कसं होतं कोंबडं ?" फौजदारानं विचारलं. तेव्हा म्हातारीने त्या कोंबड्याच्या जोडीचे दुसरे एक कोंबडे होते, ते आणून दाखवले. ते दुसरे कोंबडे पाहून फौजदार खूष झाला. त्याचा कावा म्हातारीच्या लक्षात येण्यापूर्वीच तो कोंबडा घेऊन पोलिसांची जीप धूळ उडवीत निघून गेली.

इथे कथा संपते. कथेच्या प्रारंभी म्हातारीचा कोंबडा हरवला होता आणि कथेच्या शेवटी दुसराही कोंबडा म्हातारी हरवून बसते. कथेचे वर्तुळ पूर्ण होते. आकाराने केवळ ४०–५० पृष्ठांत मावणारे हे कथानक त्यातील अर्थगर्भ सूचकतेमुळे वाचकांच्या मनात विचारांची वलये विस्तारत नेते. रूढार्थाने या कथेत कुठेही भडक प्रसंग नाहीत. पोज घेऊन टिपलेली करुण स्थळे नाहीत. घडणारे घडू शकणाऱ्या वाटेवरून चालत राहते आणि न दिसणारे दिसल्याचा आभास उत्पन्न करून दूर दूर जात नाहीसे होते.

कोणतीही दलित कथा वाचताना होणारा स्थूल परिणाम त्रिविध स्वरूपाचा म्हणता येईल. एक म्हणजे, सामाजिक विषमतेबद्दल मनात घृणा उत्पन्न करते हा पहिला परिणाम. विषमतेने बळी घेतलेल्या जीवांबद्दल अपार अनुकंपा निर्माण होते हा दुसरा परिणाम व विषमता निर्माण करणाऱ्या खलत्वाबद्दल मनात संताप उत्पन्न होतो हा तिसरा परिणाम. मराठीत हरिभाऊ आपटेंच्या काळात बालविवाह, केशवपन, विधवाविवाह आदी विषयांवरील कथा ह्या पहिल्या प्रकारच्या म्हणता येतील तर माटे आणि माडगूळकरांची कथा दुसऱ्यात मोडेल. शंकरराव खरात व बाबूराव बागूल यांच्या कथेचा प्रकार तिसरा मानता येईल. 'ओडलाळ' ची कथा मात्र या तीनही सीमा ओलांडून पलीकडे जाते. दलितप्रज्ञा आणि वाङ्मयीन प्रज्ञा यांचा एक अपूर्व संयोग तिच्यात प्रकट झाला आहे. काही सांगण्याचा वा शिकविण्याचा कसलाच खटाटोप ही कथा करीत नाही. मानवी मनाचा एक मूलभूत भावकंद आपल्यासमोर हळूहळू उकलत जातो. आपल्या मुलाबाळांचा निरपेक्ष सांभाळ करणाऱ्या मनुष्यजातीचा मूलस्रोत ती शोधीत राहते. हक्काचे हुशे आणि टाळ्या मिळविण्याचा मोह जसा सामान्य वक्तृत्वाच्या वक्त्याला टाळता येत नाही, त्याप्रमाणे भल्या भल्या दलित लेखकांनाही ओले डोळे आणि वळलेल्या मुठी यांचा मोह टाळता आलेला नाही. या पार्श्वभूमीवर देवनूर महादेव यांनी दाखविलेला कलात्मक संयम हा खरोखर अपूर्व म्हटला पाहिजे.

प्रयोजनदृष्ट्या आणखीही काही स्तर दलितकथेत जाणवतात. सामाजिक विषमतेचा बळी चित्रित करताना कथा शोकान्त बनते आणि तिला प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त होते. अण्णाभाऊ साठेंचा 'फकिरा' वाचताना विषमसमाजरचनेने घेतलेला तो प्रातिनिधिक 'बळी' वाटतो. नाव, गाव व वेष बदलून हा फकिरा कुठेही भेटू शकेल, असे वाटते. काही कथांतल्या व्यक्ती दुःखाने बेभान होतात. अन्यायाविरुद्ध चिडून उठताना त्यांच्यातील क्रौर्य व पशुता पाहून मन थिजून जाते. दळवींच्या झोपडपट्टीतील व्यक्ती किंवा भाऊ पाध्येंच्या नाक्यावरली माणसं या स्तरावर भेटतात. प्रेमचंदांच्या अनेक हिंदी कथांतून हे आढळते. 'ओडलाळ' मात्र याहून भिन्न वाटते. 'ओडलाळ'चा अनुभव शोकात्म असला तरी त्यातील उपहासगर्भ विनोदामुळे शोकात्मतेचे ताण जाणवत नाहीत पण तरीही मनावर शोकाचाच ठसा उमटतो. सुखान्त किंवा शोकान्त असे ढोबळ वर्गीकरण अशा वेळी नाहीसे होते. 'ओडलाळ'ची साकव्वा ही कुठेही भेटेल असे वाटत नाही. कुटुंबपालनाच्या आदिम शक्तीने तिचे जीवन घडविले होते. 'साकव्वा' या नावातच लेखकाने या कादंबरीचे आशयसूत्र सूचित केले आहे. 'साकू' म्हणजे कन्नड भाषेत पालन करणे किंवा सांभाळ करणे. साकव्वा स्वभावाने हट्टी, भांडखोर, कंजूष, जिद्दी,, कष्टाळू अशी वाटते. हे तिचे स्वभावदोषच कादंबरीत मात्र गुणांतरित होतात.

या कादंबरीची भाषाशैली हा या कादंबरीचा आणखी एक वेगळा पैलू. ग्रामीण बोलीभाषा तर येथे आहेच. पण तुटक व अकृत्रिम भाषेमुळे ती अधिक जिवंत वाटते. कथानिवेदनाच्या ओघात येणाऱ्या अनेक प्रतिमा, रूपके, संकेत यांनी कथेची अर्थगर्भता वाढली आहे. अर्थांच्या अनेकविध छटा सूचित होतात. देवाला सोडलेले कोंबडे चोरीस जाणे, त्यासाठी म्हातारीने जीवाचा आकांत करणे यांचा वेगळाच अर्थ मनाला स्पर्श करून जातो.

ईश्वराशी नाते जोडण्याचा मानवी हव्यास हा सनातन आहे. जोडलेले हरवण्यात, हरवलेले पुन: शोधण्यात चाललेली मनुष्याची धडपड हे कोंबडे सूचित करते. म्हातारीच्या मुलीने भिंतीवर रेखलेली मोराची चित्रे असाच वेगळा अर्थ सांगून जातात. पोलिसांच्या झडतीत ती मोराची चित्रे तेवढी वाचली. हे सांगण्यात कलेचे अमरत्व लेखक सूचित करतो. सासू-सुनेच्या भांडणात सुनेचे पोर सासूच्या अंगावर खेळत होते. इथे क्षुद्र वाटणाऱ्या संघर्षातही वंशप्रेमाचे कवडसे डोकावतात हे लेखकाला सांगावयाचे आहे. आपल्या अतिक्षुद्र संसारातही ही माणसं आपापल्यापरी बंडखोर असतात याची मोठी गंमत वाटते. सावकाराविरुद्ध थोरल्या मुलाचे बंड आहे. सासूविरुद्ध सुनेचे बंड आहे. सवर्ण हॉटेलमालकाविरुद्ध धाकटया पोराचे बंड आहे. म्हातारीचे उभे आयुष्य हेच एक बंड आहे. पण ही बंडे मनाला जखम न करता मनात खोलवर रुजत जातात. शेंगा भाजण्यासाठी केलेला जाळ, अंधारातला दिवा हे संकेतही वेगळे अर्थ सांगून जातात. जाळ केला तेव्हा सारे घर प्रकाशाने उजळून निघाले. एकमेकांच्या सावल्या एकमेकांवर पडल्या होत्या. हा जाळ पोटाची आग सुचवितो. पोटासाठी आणि पोटापुरते मिळवीत वंशसातत्याचा दिवा एकमेकांच्या हाती देत हा आदिमानव आजही समूहप्रज्ञेनेच जगतो आहे. या विचाराने मनाच्या जाणिवा रुंदावतात.

दलित कथेला कलेचे आणि समीक्षेचे दंडक हवेतच कशाला ? असे विचारणाऱ्या आजच्या लेखकांना देवनूरांच्या 'ओडलाळ' ने एक पहाटसूचक दिशा दाखविली आहे यात मुळीच शंका नाही.

☐ ☐

## महाराष्ट्र साहित्य परिषद : साहित्यिक साहाय्य निधी

### दि. १३-१०-८७ पर्यंत परिषदेकडे साहित्य साहाय्य निधीसाठी आलेल्या देणग्यांचा तपशील पुढीलप्रमाणे.

| देणगीदाराचे नाव | रुपये |
|---|---|
| मागील जमा | ६४,७४१—०० |
| प्राचार्य राम शेवाळकर, वणी | १०००—०० |
| श्री. मंजुनाथ शिवराम नायक, वसई रोड | १००१—०० |
| श्री. रा. वि. मराठे, मुंबई | १००१—०० |
| मराठी साहित्य मंडळ, गुलबर्गा | ५०१—०० |
| प्रा. वसंत कानेटकर, नाशिक | ५०१—२० |
| श्री. श्री. शं. नवरे, डोंबिवली | १५१—०० |
| श्री. रा. वा. शेवडे गुरुजी, कोल्हापूर (शाखेमार्फत) | १००—०० |
| श्री. का. रा. गुंजीकर, मुंबई | १००—०० |
| डॉ. द. ता. भोसले, पंढरपूर | १०१—०० |
| श्रीमती ललिता भावे, पुणे | १०१—०० |
| प्रा. चंद्रशेखर कपाळे, गुलबर्गा | १०१—०० |
| श्री. राजेंद्र यशवंत वैद्य, कल्याण | १०१—०० |
| श्री. मुकुंद बापट, हैद्राबाद | १०१—०० |
| श्री. द. शं. चवरे, पुणे | ५१—०० |
| | ६९,६५२—०० |

अन्य भारतीय भाषांतील दलित रचना : ३

# कारंतांचा चोमा

## श्यामलता काकडे



कारंतांबद्दल मी लिहिणे म्हणजे आंधळ्याने हत्तीला स्पर्श करून हाती लागलेल्या भागांचं जमेल तसं वर्णन करणे एवढंच होय. त्यामुळे मी जे लिहिलं आहे, ते सर्वस्पर्शी (all covering) असेलच असं मुळीच नाही. मला न दिसलेले, उमगलेले, समजलेले त्यांचे बरेच पैलू असतील हे वाचकांनी ध्यानी घेणे अत्यावश्यक आहे. मी लिहित्येय ते मला उमगलेल्या शिवराम कारंतां-बद्दल !

'पत्रकार हा मूलतः लेखकच असतो' हे अमृता प्रीतम यांचे शब्द कारंतांसारख्या व्यक्तिमत्त्वाकडे पाहून तंतोतंत पटतात. १९२४ साली, वयाच्या अवघ्या बाविसाव्या वर्षी त्यांच्या मनी कन्नड भाषेत एखादं चांगल्या दर्जाचं 'मासिक' सुरू करण्याची तीव्र इच्छा जागृत झाली. त्यातूनच 'वसंत' चा जन्म– आणि मग पाने भरावीत म्हणून लेखन– नंतर, हळूहळू राहवत नाही म्हणून, तर कधी जाणवतंय म्हणून, तर कधी, पोचावं म्हणून लेखन– पुन्हा लेखन– अधिक लेखन आणि अधिकाधिक लेखन; आणि त्या लेखनाचेही अनेकविध प्रकार. नाटकं, कादंबऱ्या, विश्वकोश, ज्ञान-कोश, प्रवासवर्णनं, कलासमीक्षा– एक ना दोन ! आणि हे सारं केव्हा, तर– वास्तुशिल्प, चित्रकला, छायाचित्रण, शिल्पकला, नृत्य, नाट्य हे सारे प्रकार चहूअंगांनी हाताळून, त्या साऱ्यातला सामाजिक सुसंवाद साधण्या-साठी माध्यम म्हणून अपूर्णत्व जाणवल्यानंतरच ! त्यांची नाटकं व इतर गंभीरलेखन वाचून एका मित्राने अभि-प्राय व्यक्त केला, 'Karanth is fit only for serious writing.'– कारंत हे फक्त गंभीर लिखाणच करू जाणोत. तर ते आव्हान स्वीकारून त्यांनी विनोदी लेखनही तेवढ्याच यशस्वीपणे करून दाखविलं. एकदा तर चालत्याबोलत्या पात्रांऐवजी स्वतःच काढलेल्या चित्रांच्या माध्यमातून त्यांनी एक नाटक साकार केलं.

'यक्षगान' ही आपल्याकडल्या दशावताराशी साम्य असलेली कालौघात उतरती कळा लागलेली कर्नाटका-तील नृत्यनाट्यमय लोककला. चित्रपटासारख्या आधु-निक करमणुकीच्या माध्यमांपुढे कदाचित हा कलाप्रकार विस्मृतीच्या गर्तेत लोटलाही गेला असता. पण असे घडू न देता कारंत केवळ त्या कलेचं पुनरुज्जीवनच करून थांबले नाहीत, तर त्यांनी त्यात कालमानानुसार जरूर

---

**डॉ. के. शिवराम कारंत**

जन्म : १० ऑक्टोबर १९०२ (द. कर्नाटकातील 'कोट' या गावी.)
१९२२ मध्ये असहयोग आंदोलनात सहभाग.
१९२५–२६ 'वसंत' या कन्नड मासिकाचे व त्यानंतर 'विचारवाणी' चे संपादन.
पंचेचाळीसहून अधिक कादंबऱ्या व चाळीस नाट-कांचे लेखन. अनेक विषयांवर निबंध-प्रबंध.
'बालज्ञानकोशा' चे लेखन व प्रकाशन.
'विज्ञानविश्वकोशा' चे चार भागांत संपादन.
'यक्षगान' या कलाप्रकारात विशेष योगदान.
व्यापक विदेशभ्रमण.
अनेक विश्वविद्यालयांच्या मानद पदव्यांनी सन्मा-नित.
१९५८ साली साहित्य अकादमी पुरस्कार.
१९६० साली स्वीडिश अकादमीचा लोकनृत्य पुरस्कार.
१९७७ साली भारतातील सर्वोच्च असा 'ज्ञान-पीठ पुरस्कार' प्राप्त.

---







त्या सुधारणा करून नृत्यनाट्यमय संगीतिकाही तयार केल्या. एके काळी केवळ संवादात्मक स्वरूप असलेल्या ह्या लोकनाट्याला त्यांनी आज ललितकलेचा दर्जा मिळवून दिला आहे. कर्नाटकात व इतरत्र भारतातच या नृत्यनाट्यांचे प्रयोग करून ते थांबले नाहीत, तर देशोदेशी या संगीतिकांची पथके ते घेऊन गेले. अति-पूर्वेपासून ते पाश्चिमात्य देशांपर्यंत. त्यांच्या या पथकांची कामगिरी पाहून त्रिखंडांतील कलासमीक्षकांनी त्यांची वाहवा केली आहे. आज वयाच्या ८५ व्या वर्षीदेखील हा माणूस विद्यार्थ्यांना, तरुणांना लाजवील अशा उत्साहाने नृत्याचे धडे देत असतो आणि दमदार प्रात्यक्षिकांसह घटवून घेत असतो. सहा-सहा महिने परदेशीचा दौरा करून आल्यावर हा माणूस केवळ विश्रांतीसाठी घरी परतत नाही– तो परततो ते पुढल्या दौऱ्यातल्या कार्यक्रमांची रंगीत तालीम घटवून घेण्यासाठी आणि मनात आकाराला आलेल्या असंख्य योजना साकार करण्याचा परिश्रम करण्यासाठी !

१९३३ साली प्रकाशित झालेली 'चोमन दुडी' ही त्यांची सर्वोत्कृष्ट गणली जाणारी कादंबरी. तदनंतर सुमारे चाळीस वर्षांनी त्यावर एक चित्रपट निघाला. त्याला राष्ट्रीय पुरस्कारही मिळाला. या कादंबरीचा समीक्षात्मक परिचय करून देण्यापूर्वी या कादंबरीमागची त्यांची प्रेरणा आणि या साहित्यकृतीबद्दलची त्यांची भावना जाणून घेणे गरजेचे आहे. त्यासाठी काही वर्षांपूर्वी एका कन्नड नियतकालिकाला ('तरंग' जुलै १९८३) त्यांनी दिलेल्या मुलाखतीचा काही भाग इथे उद्धृत करणे मला अत्यावश्यक वाटते. तो असा...

प्रश्न :– या कादंबरीवर सिनेमा निघाला, नाट्यरूपांतरही रंगभूमीवर पेश केलं गेलं. या कादंबरीला एवढं अफाट प्रेम लाभण्याचं कारण ?

उत्तर :– प्रेम कुणाचं ? माझं नव्हे. ज्यांचं प्रेम लाभलं त्यांनाच हा प्रश्न विचारायला हवा. जितकी लोकप्रियता त्याला लाभली त्याच प्रमाणात विरोधही झाला... 'हरिजनांविषयी कारंतांनी का सांगावं... तो हक्क आमचाच' असं म्हणणारेही होतेच की.

काही कारणांसाठी पुत्तूर जिल्ह्यातल्या काही गावातून Economic Survey साठी मी गेलेलो असताना प्रत्येक गावातल्या पाच-पाच हरिजन कुटुंबांत जाऊन त्यांच्याशी मी बोललो आणि त्या वेळी मला जाणवलेल्या त्यांच्या व्यथेची अभिव्यक्ती म्हणजेच ही कादंबरी. या कथानकावर चित्रपट निघाला म्हणून काही या कादंबरीविषयी मला जास्त आपुलकी वाटण्याचं कारण नाही. काही कारणांमुळे मनात निर्माण झालेली अस्वस्थता किंवा हुरहूर लेखनातून व्यक्त होते. कादंबरी हातावेगळी झाली तेव्हा ती प्रक्रियाही घडून गेली होती.

या बाबतीत विरोधाभासाची गोष्ट अशी की अनेकांनी खूप नावाजलेल्या या साहित्यकृतीच्या १००० प्रती खपायला १२ वर्षे लागली ! याचा उल्लेख कारंतांनी आपल्या आत्मचरित्रात केला आहे. आणि मराठी आवृत्ती बाबतही माझा फारसा वेगळा अनुभव नाही.

प्रश्न : 'चोमनदुडी' ही तुमची एकमेवाद्वितीय कलाकृती आहे. तुमच्या बहुतांशी कादंबऱ्यांमधून एक विशिष्ट 'डिझाईन' दिसतं. जीवनातल्या सुखदु:खाविषयी, स्त्री-पुरुष संबंधाविषयी, दांपत्यजीवनाविषयी लिहिताना तुम्ही स्वत: मानत असलेल्या मूल्यांना कादंबरीत आकार देता...

उत्तर : 'चोमाला शिवावं की शिवू नये' हा आणि 'त्याला जमीन द्यावी की देऊ नये.' हे 'चोमा' तले प्रश्न आहेत. आणि प्रत्यक्षात जमीन दिली नाही तरी 'देण्यास काही हरकत नसावी' हे मान्य करायला हरकत नाही.

प्रश्न : तुमच्या कादंबऱ्यांतून अशी काही पात्रं आहेत की जी कारंतांच्या जीवनमूल्यांशी साम्य असणारी म्हणून ओळखता येतात. तसंच तुमच्या जीवनमूल्यांविषयी भाष्य करणारीही काही पात्रं कधीकधी असतात. कित्येकदा काही कादंबऱ्यांतून हा प्रवक्ता नायकच असतो. पण 'चोमनदुडी' मध्ये असं एकही पात्र नाही. तुमचा असा ओळखू येणारा नायकही येथे नाही.

या कथानकात दु:ख बॅलन्स करायला तुम्ही काहीही केलेलं नाही. या विशिष्ट समाजव्यवस्थेत यावर काहीही उपाय नाही असंच तुमचं निष्ठुर आणि प्रामाणिक मतही असेल किंवा राजकीय दृष्टिकोनामुळेही...

उत्तर, : हे दुःख balance करायला पाहिजे वगैरे सारे ठोकताळे तुमचेच. माझा त्याच्याशी काहीही संबंध नाही. गांधीजींनी आर्थिक थिअरी डोळ्यांसमोर आपला मार्ग आखला नव्हता. त्यांचं गरिबीनिर्मूलन, अस्पृश्यता निवारण वगैरेंचं वारं मलाही लागलं होतं. त्यामुळे हा प्रश्न तुम्हांला जसा जाणवतो तसा मला जाणवत नाही. 'चोमनदुडी' मध्ये फक्त एकाच ठिकाणी मूल्याचा उल्लेख होतो—'जे कुणीही केलेलं नाही. ते आपण कसं करायचं ?'—एका स्त्रीच्या तोंडी मी घातलेला प्रश्न आहे हा. हा प्रश्न का आला ? गेल्या शेकडो वर्षांपासून माझ्या, ब्राम्हणांच्या किंबहुना हरिजनांच्याही मानेवर पडलेलं हे जूं झुगारून देणं एवढं सोपं नाही.

गांधीवादी होऊन मीही समानतेचं प्रतिपालन केलं आहे. तरीही मी जेव्हा पहिल्यांदा हरिजनाचं मूल उचलून कडेवर घेतलं तेव्हा माझंही अंग शहारलं होतं. आज केवळ व्यासपीठावर दृष्टी ठेवून कुणीतरी मागवून दिलेले दलितशोषणासारख्या विषयांवर चर्चा करून या विषयाकडे पाहिलं की हे फारच सोपं आहे असं, वाटतं. पण अशी विषमता जन्म घेत असते ती संस्कृतीच्या दडपणाखालीच. ह्या सृष्टीवर माणूस हा एकच महत्त्वाचा प्राणी नव्हे. पण या जगात सर्वांत शेवटी आलेला हा सजीव प्राणी आज त्याच्या जन्मदात्या सृष्टीशी काही संबंध नसल्यासारखा वागू लागला आहे.

जेव्हा तुम्हांला ठोकर बसते तेव्हा तुम्हांला शोषण आठवतं. तसं पाहाल तर कुत्रं, मांजर वा कोंबडी पाळणं देखील exploitation च की ! बापदेखील मुलाला exploit करतो. तुमच्या आणि माझ्या Priorities मध्ये फार तफावत आहे. माझ्या priorities काही काळापुरत्याच मर्यादित नाहीत तर त्या सार्वकालीन आहेत. त्यामुळे माझी भाष्येही सार्वकालीन आहेत.

* * *

या मुलाखतीवरून एवढं लक्षात येतं की ही कादंबरी दलित वाङ्मयात मोडते की नाही हा वादाचा मुद्दा होईल. पण असं काही Classification डोळ्यांसमोर ठेवून त्यांनी हे लेखन केलेलं नाही हेही स्पष्टच आहे, डोळ्यांनी पाहिलेली नि मनाला जाणवलेली विषमता नि व्यथा शब्दांतून साकार केली आहे. इथे याचाही उल्लेख केला पाहिजे की कादंबरी पाच दिवसांतच लिहून संपवलेली आहे...लेखणीतली सारी तळमळ एकदा कागदावर जेव्हा उतरली तेव्हाच मनातली वादळं शमली.

मुलाखतीतच कारंतांनी सांगितले आहे की लोकप्रियतेबरोबरच विरोधाचा सूरही होताच. तो असा की एक कर्मठ 'कोट' ब्राम्हणवर्गात जन्मलेल्या माणसाला हरिजनांविषयी लिहिण्याचा अधिकारच काय ? मला फक्त पुढे जाऊन असं विचारायचंय—स्वातंत्र्यपूर्वकाळात आणि अस्पृश्यतानिवारण मोहिमेनं चळवळीचं रूप धारण करण्यापूर्वीच ज्यानं जातिव्यवस्थेतलं वैयर्थ्य ओळखलं आणि चातुर्वर्ण्यापायी समाजात घडणाऱ्या भयाण अन्यायाला वाचा फोडण्याचा प्रयत्न केला, अशा या साहित्यिकावर ही तक्रारखोर मंडळी पुन्हा जातिव्यवस्थेची बंधनं लादू पाहतात ? त्यांचा उपहास करावा की कीव करावी ? समानतेच्या व्यासपीठावर उभी राहून चातुर्वर्ण्याचाच धिक्कार जाहीरपणे करणारी ही मंडळी साहित्यक्षेत्रात मात्र चातुर्वर्ण्याचाच पुरस्कार करीत आहेत असंच कुणाला का नाही वाटणार ? आणि यांच्या व्यक्तिगत पातळीवरील अपेक्षांबाबत बोलायलाच नको. सामाजिक जीवनात समानतेची अपेक्षा ठेवणारा हा वर्ग आज केवळ जातीच्या दाखल्यापोटी मिळणारे आर्थिक, शैक्षणिक इत्यादी शासकीय सवलतींसारखे व्यक्तिगत लाभ झुगारून देण्यास तयार आहे काय ? इथे मात्र त्यांना समानता नकोच आहे काय ? आणि तसं असेल तर मग व्यक्तिगत जीवनात हे चातुर्वर्ण्य मान्यच करतात असंच म्हणायला नको काय ? ह्या प्रश्नांची उत्तरं त्यांची त्यांनीच शोधायची आहेत.

आणि म्हणूनच, मुलाखतीतील दुसऱ्या प्रश्नाला उत्तर देताना कारंत म्हणतात की मी दुःख balance करण्यासाठी म्हणून काही लिहिलं नाही तर, केवळ जाणवलं म्हणून लिहिलं. प्रश्नांची उकल करून दाखवली याचा अर्थ त्यांना त्यांची उत्तरं सापडली आहेत असा दावा त्यांनी मुळीच केलेला नाही.

लेखकाची जीवनमूल्यं वागण्याबोलण्यातून व्यक्त करणारं, रूढार्थाने ज्याला कादंबरीचा नायक म्हणता येईल असं पात्र कादंबरीत नाही हे टीकाकारांचं म्हणणं सर्वार्थाने पटत नाही. कारण 'चोमा' हा नायकच आहे. फक्त त्याचं अभिव्यक्तीचं साधन आहे 'डबरी.'

सामाजिक अन्यायातून जन्मास आलेल्या मुक्या अगतिकतेचं मूर्तिमंत प्रतीक म्हणजेच 'चोमा'. त्याच्या वेदनांना वाचा फोडते ती 'डवरी'; आणि त्याच्या वेदना शब्दरूप घेऊन उमटतात त्या 'डवरी' च्या माध्यमातूनच ! जगाला समजणाऱ्या भाषेत चोमा बोलू शकत नाही आणि त्याच्या डवरीची भाषा दुनिया जाणू शकत नाही. अन् ही Communication gap बुजवणारा एकुलता एक पूल म्हणजे विचारी 'बेळ्ळी'. सरते शेवटी तिच्यात आणि चोमातदेखील Communication gap निर्माण झालेली आहेच. पोटाची दोन्ही वेळची भ्रांत तिला परिस्थितीशी तडजोड करायला लावते. साऱ्या कथानकात तडजोड करणारं हे एकच पात्र केवळ, Survival साठी ! बाकी कुठलंही पात्र कुठल्याही प्रकारची तडजोड स्वीकारताना दिसत नाही.

: अर्धशतकापूर्वी घडत असलेल्या या कथानकात चोमा हे प्रमुख पात्र— जातीनं महार— दक्षिण कन्नड जिल्ह्यामधील एका लहानशा वाडीतल्या जमीनदाराकडे बलुत्यावारी राबणारा. एक चंद्रमौळी झोपडी अन् त्यातली चार गाडगी-मडकी एवढीच त्याची मालमत्ता. त्याच्या पाच मुलांची आई कुठल्याशा आजारानं नुकतीच निवर्तली आहे. दोन थोरल्या पोरांना मिसरूडं फुटलीत, तर दोघं अगदीच लहान आहेत आणि या सर्वांमध्ये त्यांची एकुलती एक लाडकी बहीण बेळ्ळी. एक अर्धोन्मीलित कळी. पूर्वी कधी काळी चोमा कॉफीच्या मळ्यात मजुरीला गेला होता. तिथून चार पैसे गाठीला आणणं तर राहोच पण या ना त्या कारणासाठी घेतलेली उचल मात्र अजून त्याच्या नावे तिथे मांडलेली होती. त्यासाठी परत स्वतः राबायला जावं तर धन्याच्या कामाचा खोळंबा होतो. तेव्हा हे कर्ज फेडण्यासाठी तो पाठवून देतो आपल्या दोन मिसरूड फुटलेल्या पोरांना—त्याच कॉफीच्या मळ्यात मजुरी करायला. सारा हंगाम संपला तरी कर्ज मात्र फिटतच नाही. पोरं परतीच्या मार्गाला लागतात ती कर्जाचं ओझं डोक्यावर कायम ठेवूनच. येतायेताच दोहोंतला एक आपल्या ख्रिश्चन प्रेमपात्राबरोबर निघून जातो— धर्मांतर करून संसारही थाटतो. तो कधीही परतत नाही. ही बातमी घरी पोचते ती थोरल्याबरोबरच. आल्या आल्या हिवताप त्याला गाठतो. आणि कुठल्याही उपचाराविना तो तडकाफडकी इहलोक सोडून जातो. त्याच्या आजारपणात मांत्रिकाची मात्र चंगळ झालेली असते.

: नुसतीच रोजमुऱ्यावारी मोलमजुरी करण्यापेक्षा लहानसा का होईना एक जमिनीचा तुकडा खंडानं मिळवावा अन् त्यात घाम गाळून हक्काचे चार दाणे पिकवावेत अशी एक महत्त्वाकांक्षा चोमा फार दिवसांपासून उराशी बाळगून आहे. वरवर पाहू जाता एक किरकोळ अपेक्षा. महत्त्वाकांक्षा म्हणावं असं त्यात काहीच नाही. पण महाराला जमीन कसायला देतो कोण ? जे पिढ्यानुपिढ्या, शतकानुशतकं कुणीही केलं नाही ते आपण करायचं कसं ही जमीनदारापुढची घोर समस्या— आणि या समस्येतूनच कथाबीज आकाराला येतं. प्रसंगी त्याच्या धन्यालाही वाटून जातं की, इतर हरामखोर कुळवाड्यांपेक्षा चोमालाच थोडी जमीन कसायला दिली तर काय बिघडलं— ते आपल्या आईला विचारतातदेखील. कदाचित तिलाही मनोमन जमीन चोमाला द्यावी असं वाटत असेलही. परंतु ती विचारी रूढीप्रिय स्त्री पुन्हा परंपरेचाच दाखला पुढे करून या प्रस्तावाला नकार देते. केवळ 'महानुभावाः येन गताः स पंथः' एवढीच पोकळ सबब पुढे करून. तिच्यासाठी तेच सबळ कारण असतं.

: धन्याकडून खंडानं जमीन मिळण्याची आशा संपल्यानंतर चोमापुढे आणखीही एक प्रस्ताव येतो तो धर्मांतराचा. क्रूसावरल्या त्या आकाशातल्या बापाचं अनुयायित्व पत्करल्यानंतर त्याची सारी ऐहिक स्वप्नं साकार होण्याचं प्रलोभन त्याला दाखविण्यात येतं. काही काळापुरती का होईना त्यालाही त्याची भुरळ पडते. पण अत्यंत निर्णायक क्षणी जन्मजन्मांतरीचं कुलदैवत जेव्हा त्याला जाब विचारू लागतं तेव्हा मात्र त्याचा धर्मांतराचा निर्धार ढासळून पडतो. His conscience does not permit it. 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' हे त्या भावड्या अडाणी जीवाला कसं काय जाणवतं कोण जाणे ! स्वधर्मात साऱ्या आशा-आकांक्षांचे पंख खुडलेले आणि परधर्मात जायला सदसद्विवेकबुद्धीचा विरोध. ह्या दोहोंच्या कोंडीत सापडलेला चोमा अखेर स्वधर्मेनिधनच पत्करतो. अन् तेही साऱ्या कुटुंबाची स्वधर्मात राहिल्याने झालेली वाताहत पाहिल्यानंतरच !

त्याच्या सुखदु:खातील बरोबरीची सायीदार आहे ती त्याची डवरी ! त्याच्या साऱ्या वेदनांना दरवेळी वाचा फोडते तीही त्याची डवरीच ! पण तिची भाषा मात्र इतरांना उमगत नाही हे त्याच्या मनीचं शल्य !

धर्मांतराचा विचार चोमानं सोडून दिल्यानंतरचा हा एक प्रसंग. रोज नदीकाठी पाण्यात डुंबायला जाणारी मुलं. त्यांतच चोमाचा एक मुलगा– डोहात बुडतोय–काठावरचे लोक आरडाओरडा करतात. एक सशक्त, पट्टीचा पोहणारा ब्राम्हण युवक त्याचा जीव वाचवण्यासाठी धाव घेऊ बघतोय. पण... "अरे, महाराचं पोर ते ! त्याला काढायला तू कशाला जातोस ?" म्हणत वर्ण-जातीच्या रूढ आणि दांभिक कल्पनांनी डोळस निष्क्रियतेशी पिढ्यानुपिढ्या जखडली गेलेली वडीलधारी माणसं त्याला थोपवून धर्मसंकटात पाडतात. आजपर्यंत चोमा महाराचं जिणं जगत होता. आज त्यानं मरणही अनुभवलं होतं–जिवंतपणीच !

चोमा डोळ्यांतून टिपूसही गाळत नाही. कुणाचंही तोंड पाहण्याची त्याची इच्छा नसते. माणसं सांत्वनाला येतात– समाचाराला येतात तर काही नुसतंच प्रेत पाहायला येतात. बाहेरून कुणीही कितीही हाका मारल्या तरी, दार ठोठावलं तरी तो जागचा हलत नाही की बोलत नाही. दारही उघडत नाही. नुसताच बसून राहतो. गुडघ्यांत मान खुपसून...पहाटे पहाटे डवरीच्या थडथडाटानंच सारा गाव जागा झाला, असं म्हणतात.

एवढ्या साऱ्या वादळांना, संकटांना तोंड देत असतानाही चोमा आपली मनीची इच्छा मात्र अजूनही उरीपोटी बाळगून आहे. कर्ज फेडायला पाठवलेली पोरं मात्र कर्ज कांकणभर वाढवूनच परतली आहेत– पैकी एक परागंदा झाला नि एक देवाघरी गेला. आता कर्ज फेडण्याची जबाबदारी येऊन पडते ती बिचाऱ्या बेळ्ळीवर. पुढील हंगामात कर्ज फेडण्यासाठी ती कॉफीच्या मळ्यावर पोचते. सोबत धाकट्या भावाला घेऊन गेलेली बेळ्ळी मुकादमाच्या गोड शब्दांनी .नि त्या पाठोपाठ मिळणाऱ्या सवलतींनी हुरळून जाते. .तिच्या ध्यानीमनीही नसलेल्या सवलती तिला मिळवून देणाऱ्या मुकादमाला आपलं सर्वस्व ती कधी अर्पण करते, हे तिचं तिलाच कळत नाही. या व्यभिचाराबद्दल तिला थोडीफार खंत वाटत असली, तरी आपण पितृऋणातून मुक्त होण्यासाठीच हे करतोय, ही तिची भावना मात्र दृढ असते अन् एक दिवस ती मळ्याच्या मालकाच्या पाशवी वासनेला बळी जाते. याबाबत मुकादमानं मालकाला जाब विचारावा अशी तिची अपेक्षा असावी. पण तसं काही घडत नाहीच किंबहुना हे सारं मुकादमाच्या संमतीनं अन् पुढाकारानंच घडलंय हे तिला कळून चुकतं. मग मात्र ती क्षणभरही मळ्यावर न थांबता घरी निघून येते. असेच काही दिवस जातात. आणि चोमा घरी नसताना अचानक एके दिवशी मुकादम घरी येतो. पूर्वाश्रमीचे ऋणानुबंध स्मरून बेळ्ळी त्याचं आदरातिथ्य करते. नेमकं याच वेळी चोमा परततो. साऱ्या संसाराची धूळधाण व्हायला कारणीभूत असलेला तो माणूस पाहून चोमा त्याच्या अंगावर धावून जातो. मुकादम जीव मुठीत घेऊन पळून जातो. अन् 'वड्याचं तेल वांग्यावर' या न्यायानं चोमाच्या संतापात होरपळून निघते ती बेळ्ळी ! संतापाच्या भरात तो तिलाही घराबाहेर काढतो. राहता राहिलेली त्याची एकुलती एक सोबतीण त्याची डवरी; चोमाच्या साऱ्या व्यक्ताव्यक्त भावनांचं एकुलतं एक माध्यम ! तिच्या संगतीतच तो इहलोकीची यात्रा संपवतो !

: चोमा, अन् असे कित्येक चोमा नियतीच्या स्मृतिपटलाआड अदृश्य झाले असतील. पण 'डवरी' मात्र अजूनही निनादतेच आहे ! But the Communication gap still persists...कारण ऐकणारे कान आणि जाणिवा जागृत असलेली मनं यांच्यात मात्र अथांग पसरलेली दरी आहे ती निर्ढावलेल्या नेणिवांची!

: अनुवाद करताना बरंच काही नव्याने शिकायला मिळालं. कारंतांच्या साऱ्याच वाङ्मयाचा मागोवा घेता एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती हीच की त्यांच्या कादंबऱ्यांतले बहुतांशी विषय 'दक्षिण कन्नड' हा जो कर्नाटकाच्या आणि दक्षिणेकडचा जिल्हा आहे तिथल्याच जनजीवनावर आधारलेले व रंगविलेले आहेत. त्यांच्या हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच पुस्तकांचे मराठी अनुवाद उपलब्ध आहेत. परंतु त्यातूनही ही गोष्ट प्रकर्षाने जाणवल्याखेरीज राहत नाही. याही कादंबरीचा नायक त्याच प्रदेशातला. तिथल्याच रूढींनी जखडला गेलेला 'चोमा.' चोमा हा 'मारी' महार. महारांतही– मेरं, बैरं, अजिलं– अशा

उपजाती आहेत, एवढंच नव्हे तर त्यांतही मारी, मुंडाळ इत्यादी पोटजाती आहेत हे मला नव्यानेच कळत होतं.

: बऱ्याच हरिजनांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला तेव्हा हिंदूधर्मनिष्ठांनी वृत्तपत्रांतून बराच गदारोळ माजविला होता ही बातमी अजूनही तशी ताजीच आहे. ज्या समाजात-ज्या काळात चातुर्वर्ण्याचं पालन आवश्यकतेपोटी केलं जात होतं त्या काळात अशी भीती साधार ठरलीही असती कदाचित. परंतु काळाच्या गरजेपोटी जेथे ब्राम्हणांनी ब्राम्हण्य सोडून हाती शस्त्रंही धरली, क्षत्रियांनी क्षात्रधर्म बाजूला ठेवला तेथे शूद्रांनीच शूद्रत्व टिकवावं असा आग्रह धरण्याचा अधिकार कुणी कुणाला दिला ?

: कधीकधी माझ्या मनात अशीही शंका येते की आपल्याला परिचित असलेली 'मरीआई' ही मूळची 'मदर मेरी'च तर नव्हे ! कोणत्याही वेदपुराणोक्त दैवतांची उपासना करण्याचा अधिकार नसलेल्या शूद्रांना कदाचित 'मेरी' च जवळची वाटली असावी. तिनं त्यांना कधीच दूर लोटलं नाही– झिडकारलंही नाही.

: गेल्या अर्धशतकात एकंदर जनसमाजातल्या स्त्री-पुरुष संबंधात तरी कितपत सुधारणा झाल्या आहेत ? एखादीच कर्तबगार स्त्री इथे पंतप्रधान बनू शकते, पण आजही लग्न होऊन सासरी जाणाऱ्या किती स्त्रियांना– मग ती कितीही सुविद्य वा सधन असो– सुखी भवितव्याची खात्री असते ?

: 'बेळ्ळी' चा अर्थ रुपं. कन्नडमध्ये 'बेळ्ळीचुळ्ळे' म्हणजे रुप्यासारखी तेजःपुंज– अर्थात शुक्राची चांदणी आणि शुक्र ही तर प्रेमाची अधिष्ठात्री देवता!

: साऱ्या कथानकात बेळ्ळी वावरते ती कुणाची तरी लाडाची लेक, कुणाची तरी मायेची बहीण, तर कधी कुणाची भोगदासी म्हणूनदेखील. मात्र ती बेळ्ळी म्हणून कधीच जगत नाही. तिचं असं स्वतंत्र व्यक्तिमत्व कधीच विकसित होत नाही. व्यक्तिमत्त्व ही कुणीतरी कुणालातरी देण्याची, बहाल करण्याची बाब नाही हे मान्य. पण ते अवेळी खुडून, डिवचून टाकायचा अधिकार तरी पित्याला, बंधूंना, पतीला, पुत्रांना किंवा समाजाला तरी कुणी दिला ? नि कधी ? विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातदेखील तूर्त वादाकरिता मान्य करू की, "न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ।" पण, ज्या समाजानं हे विधान केलं त्याच समाजानं स्त्रीच्या निरनिराळ्या अवस्थांमध्ये तिच्या रक्षणाची जबाबदारी तिच्या निकटवर्गीय पुरुषवर्गात विभागून दिली होती, हेही लक्षात घेणे जरुरीचे आहे. ह्या जबाबदारीचं पालन मात्र त्याच काळात काय किंवा आजच्याही काळात काय किती काटेकोरपणे केलं जातं ते पुरुषवर्गाने स्वतःलाच विचारून पाहावं.

: आणखीही उल्लेख करावासा वाटतो तो कथानकाचा अविभाज्य अंग असलेल्या वेठबिगारीचा. गावातलं बलुतं असो वा कॉफीच्या मळ्यातली मजुरी– तसे पाहू जाता अर्धशतकापूर्वीच्या या वेठबिगारीत रुपयाचं अवमूल्यन होण्याखेरीज आजमितीलादेखील कितीसा फरक पडलेला दिसतो ? अशी कितीतरी गरीब चोमाची कुटुंबं आजही बलुतं म्हणा– चाकरी म्हणा टिकविण्याकरिता आपलं सर्वस्व गहाण टाकताना दिसत नाहीत का ?

---

* कादंबरीचे मूळ नाव '**चोमन दुडी**'. शब्दशः अर्थ **चोमाची डवरी**. 'दुडी' मराठीत 'डवरी'. हे वाद्य दक्षिण कर्नाटकात बघा ऐकायला मिळते. त्याचा आकार सर्वसामान्यपणे एखाद्या मोठ्या डमरूसारखा अथवा धान्याच्या मापट्यासारखा असतो. वाद्य पोकळ असून त्याच्या एकाच तोंडावर चामडे ताणून बसविलेले असते. हे वाद्य एका हातात धरून दुसऱ्या हाताच्या बोटांनी किंवा कामटीने वाजवून, ताल धरण्यासाठी वापरले जाते. महाराष्ट्रात असे वाद्य 'डवरी गोसावी' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या विमुक्त जमातीचे लोक वाजविताना दिसतात.

□ □



अनुक्रमणिका

अन्य भारतीय भाषांतील दलित रचना : ४

# गुजराती दलित कविता

प्रा. केशव मेश्राम



समाजाच्या वाटचालीत विशेष शोध, संशोधन अभ्यास, व्यासंग, परिसंवाद वगैरे गोष्टी होत असतात. विज्ञानाचा पाया समाजलक्षी विज्ञानच असतो. माणसाच्या अंतर्मनाचा, ज्यांना निश्चित स्थान, रूप, दर्जा, अजूनही जनमानसात शेकडो वर्षांत मिळू शकला नाही त्यांचा विचार हा असाच शोध आहे. हे घडत नाही याची खंत न बाळगता, किंवा नुसतेच 'अरेरे' म्हणून आपल्या सुखसोयीत रमणाऱ्या धर्म, अर्थ, समाजप्रणीत व सुरक्षित व्यवस्थेचा आस्वाद घेणाऱ्यांचा व त्यांच्या तथाकथित वैभवी संस्कृतीचा शोध घेण्याची प्रक्रिया ही म्हणूनच स्वाभाविक आहे. गुजरातेत तर दलितविरोधी भावना व लाटा हेतुपुरस्सर निर्माण केल्या जातात. स्वशोध घेणाऱ्यांना जाणीवपूर्वक, पद्धतशीर व दडपशाही मार्गाने खच्ची करण्याच्या संघटित प्रयत्नाला असंघटित कलावंतांनी वेळोवेळी दिलेले उत्तरप्रत्युत्तर दलित गुजराती कवितेत सापडते.

शहरापासून तो गावागावकुसापर्यंतच्या सर्व ठिकाणांहून प्रयत्नपूर्वक केलेले दलित कवितेचे 'गुजरात लोकायन' ने केलेले डिसेंबर १९८१ चे प्रकाशन त्यादृष्टीने महत्त्वाचे आहे. गणपत परमार व मनीषी जानी ह्यांनी केलेले संकलन हे १३९ कवितांचे डोळस व साक्षेपी संकलन आहे.

धर्म, कर्म, पाप-पुण्य, दर्शन, तत्त्वज्ञान, नीती, समाजव्यवस्था, राज्यव्यवस्था, अर्थव्यवस्था आणि त्यांच्या प्रभाव परिणामातून जन्मणारी गुलामी, गरिबी, लाचारी, निःसाहाय्यता, त्रास, पीडा, वेदना यांचा इतिहासच या कवितांतून ग्रथित झाला आहे. मार्क्सवादाच्या जाणिवेतून, जगभर होणाऱ्या दमनशक्तीच्या प्रतिकारातून, फुले-आंबेडकरांच्या प्रत्यक्ष परिणामातून ह्या जाणिवा प्रखर होत गेल्या. ब्लॅक पँथर्स, महाराष्ट्रातील दलित पँथर यांचाही गुजरातच्या लढाऊ कवींना प्रेरणास्रोत लाभला.

ही कविता हे एक चळवळीचे अंग आहे. ती एक सांस्कृतिक चळवळ आहे. अशा कवितेला काव्याची परंपरागत व सर्वसामान्य धोरणे सूत्रबद्ध रीतीने लागू होण्याची फारशी शक्यता नसतेच. कारण ती घटनाघटितांवर उभी असलेली कविता आहे. तिचे रूपस्वरूप त्यामुळे भिन्न आहे. जित्याजागत्या दुःखसंवेदनांचा, अंतर्गत ठसठशीचा भावाविष्कार ती करू जाणते. संस्कृतीचे, मांगल्याचे, शिवस्थापनेचे उद्दिष्ट कधी स्थापन झालेच नाही. शिवेतराचा क्षय करण्याची वळवळीत शब्दांत धमकच नाही हे आता सुस्पष्ट झाले आहे. तटस्थतेचे– कलात्मक ताटस्थ्याचे गोडवेही एका मर्यादेपर्यंत गाता येतात ह्याचाही प्रत्यय आला आहे. आईनस्टाईनच्या सापेक्षतावादानेही 'कलेसाठी कला' म्हणणारांना चपराकच दिली आहे. यंत्रयुगाच्या धावपळीत व स्पर्धेत नीरव शांती, मंजुळ कूजन मागे पडले आहे. जीवनाच्या संकुलतेचा कर्णकटू कोलाहल काव्यरूप धारण करून उभा राहणे हीच स्वाभाविकता आहे. हाच गुजराती दलित कवितेच्या उभारणीचाही पाया आहे.

माणसे भूतलावर येताना दिसतात– लोप पावताना दिसतात पण धर्म टिकून टिच्चून राहतो. त्याचे कर्मकांड लोकमानसात विषासारखे पसरते व रक्त बनून कार्यप्रवण होते. माणसाला मिळणाऱ्या अपमानुषी वागण्याचे समर्थन करणारा, धर्म, कर्म, त्यांचा कणा असलेला ईश्वर, त्याला 'अक्षय' स्थान देणारी संस्कृती, ग्रंथ-पूजापाठात तिला अमर करणारे पुरोहित मध्यस्थ, त्यांचे पोटार्थी गैरव्यवहार व त्यांच्या साहाय्याने जनसामान्यांना छळणाऱ्या, पीडणाऱ्या, मातीमोल करणाऱ्या राजयंत्रणा. सामंतशाह्या, सरंजामव्यवस्था, सावकारी काच, व शोषणात आनंद मानून त्याचेच समर्थक तत्त्वज्ञान बनवणाऱ्या हुकूमशाहीचा निषेध तार-तीव्र स्वरात दलित कविता करते. शहरात उठणाऱ्या आकाशचुंबी इमारती, पंचतारांकित हॉटेलाची व गिरण्या, फॅक्ट-





अनुक्रमणिका

त्यांच्या संस्कृतीने माणसांना सडकेवर फेकले आहे. खेड्यापाड्यात दलित सडतो आहे. शहरात सडकांवर फोलपटासारखा पडतो आहे. मानसिक श्रम करणारांची संस्कृती वेगळी व शारीरिक श्रम करायला भाग पडणारांची जीवनप्रणाली वेगळी हे द्वैतच दलित कवितेच्या— गुजराती दलित कवितेच्या उभारणीचे मूल कारण आहे. पश्चिमेतही प्राचीन ग्रीक काळापासून अशी गुलामी पोसली होती. म्हणून दलित कविता हा जातीवादी प्रकार नाही. शतकानुशतके सर्वसंपन्न भद्रवर्गीय संस्कृतीने कुरघोडी करून विशाल जनसमुदायाला तत्त्वज्ञान, भाषा, कला, साहित्य व उपलब्धी या बाबतीत नगण्य ठरवले होते. त्यातून सापडलेला स्वरअक्षर म्हणजे दलित कविता होय.

गुजरातीतील आदर्शवादी परंपरा, प्रगतीशील साहित्य किंवा गांधीवादाच्या लाकडी पकडीतील भूतदयावाद यापेक्षा या कवितेचा 'रंगाकार' वेगळा आहे. जगात कवितेचा कवीबरोबर किंवा कवीचा कवितेबरोबर संबंध असतो. हे जरी खरे असले तरी त्याशिवायही कितीतरी अतूट दृढसंबंधही त्याहून अधिक खरे असतात. नवेपणाच्या नावाखाली पाश्चात्त्यांचे अनुकरण, भ्रष्ट शब्दकळा, खोट्या फसव्या प्रतिमा, दिखाऊ पांडित्य, दिपवणारा दबदबावाज व्यासंग याचेच नाव 'नवी कविता' म्हणणारांना खरीखुरी नवी कविता दलित कविताच वाटेल इतकी तिची व्याप्ती व शक्ती मोठी आहे.

कविता नुसती शब्दात, संस्कृतिबंधात, रूपाकारात किंवा प्रतिमात बांधली जायला तिला शब्दकोड्याची अवकळा प्राप्त होते. याचा विसर पडू न देता अभ्यासल्यास गुजरातीतील दलित कवितेचा आवाका किती मोठा आहे याचा प्रत्यय येईल.

ह्या कवितेत सरळ विद्रोहाचे आव्हान देणारे स्वर आहेत व उपरोधाचे रंगही आहेत. पूर्वजांच्या वेदनांची बोच आहे. धर्मकर्मकांडाची खोच उलगडणारी गतीही आहे. त्यातील वेग-आवेगाचा एक लहानसा नमुना 'हाजर करा', ह्या श्री. रमण चांभार यांच्या कवितेमध्ये पाहायला मिळेल. उदाहरणादाखल ती समग्र कविताच मी उद्धृत करतो :—

'जन्मना जायते शूद्रः
संस्कारात द्विज उच्यते ।'
कोणी म्हटले आहे असे ?
कोण होता हा ब्राम्हकुळाचा जाणकार ?
घेडांना डोक्यावर चढवणारा
वेदकाळात कोण गांधी जन्मला होता ?
भंग्यांची बाजू घेऊन जानवेधाऱ्याचा
अपमान करणारा पुराणकाळात कोण नरसी होता ?
हजर करा यांना
...बेलछीमध्ये
नारायणपुरात
वाराणशीत
दोहियामध्ये
मराठवाड्यात
मुंबईच्या बीडीडी चाळीत...
साल्यांना गोळीच घालतो
तेव्हाच त्याला कळेल की
खरेच
असे लिहायला हवे होते—
संस्कारात शूद्र उच्यते ।

ह्या संमिश्र संवेदनांचा अनुभव देणाऱ्या कवितेवर काही पुन्हा स्वतंत्र भाष्य करण्याचे प्रयोजन वाटत नाही.

अशा आजच्या विपर्यस्त व भयावह घटितांचे सादपडसाद नोंदवताना ही कविता वैचारिक व चिंतनशील घाट घेऊनही प्रकट होताना आढळते. 'जेतलपूर हत्याकांड' ही नीरव पटेल यांची, 'अस्पृश्य कविता' ही साहिल परमार यांची, 'अस्पृश्य कावळा' ही बाळकृष्ण आनंद यांची, 'माझी जात' ही मोहंमद इसहाक शेख व 'बर्फाची भिंत' ही मौन बलोली यांची ह्या कविता यादृष्टीने वेधक अशा आहेत.

आपली लोकशाही व्यवस्था, पोलिस— न्याययंत्रणा, समानता, गरिबी हटावचा उद्घोष यांतूनही कवींना केवढे तरी काव्यविषय व विश्व सापडले आहे. आनंद मैत्रेय, मनिषी जानी, रामचंद्र पटेल, चंद्र अंधारिया, किसन सोसा, हिंमत खाटसूरिया यांच्या कविता या दृष्टीने अंतर्मुख आनंद देणाऱ्या आहेत.

सूचकता व आटोप यांचा अनुभवही गुजराती दलित कविता वैशिष्ट्यपूर्ण रीतीने देते. शंकरभाई पटेल, पुरू सोलंकी, मनसुख वाघेला, अरविंद मकवाना, अवन्ती

दवे, मोहन साधू व चंदू महेरिया यांचा प्रामुख्याने निर्देश करावा लागेल.

विश्वमानव, मुक्तिनायक, युवदर्शन, निरीक्षक, संदेश, सारथी, वाग, कालोसूरज, आक्रोश, कविता वगैरे संग्रह नियतकालिके व पत्रिकांतून जवळजवळ एकशेपस्तीस-चाळीस कविता व प्रमुख अशा साठ-वासष्ट कवींचा परिचय दोन दशकांपासून गुजराती चोखंदळ व अभ्यासू वाचकांना होतो आहे. मराठीतील दलित कवितेचा व्याप जरी खूपच मोठा असला तरी गुजराती दलित कवितेचाही पसारा व शक्ती लक्षणीय असून ती लहान नाही एवढे निश्चितपणे सांगता येईल. चांगल्या गुजराती दलित कविता सातत्याने मराठी काव्यप्रेमींना उपलब्ध झाल्यास एक नवा अनुबंध निर्माण होईल व आस्वादक आणि आलोचक दृष्टीही विकसित होईल.

□ □





अनुक्रमणिका








# पाच गुजराती कविता

## अनुवाद : प्रा. केशव मेश्राम



### मी : नरसिंह परमार

मी आलोय
श्वेतातिश्वेत आक्रोश घेऊन
माझ्या कवितेतील शब्दाशब्दांतल्या
विव्हळणाऱ्या वेदनेचा उपशम करण्यासाठी.

मी आलोय
शतकाशतकांपासून बंदिवान असणाऱ्या
माझ्या आकांक्षांना मुक्ती देण्यासाठी
अंधारातल्या दडपल्या भाषेची वेदना
नांगरणारा मी आहे,
हा सूर्य माझ्या एकेका श्वासाने
ओघळताना दिसतो आहे,
एक प्रसरण पावणारा कठोर कण,
संस्कृतीच्या योनीत जळजळत्या
श्वेत शब्दाचा रेणू मी पेरणार आहे
कवितेच्या वांझपणाचा टोमणा टाळण्यासाठी.

रस्त्यारस्त्यावर जगणाऱ्या...उभ्या राहणाऱ्या
निराश्रित जमातीच्या संस्कृतीच्या
अस्तित्वाचा अंत करण्यासाठी.

मी आलोय समृद्ध माझा अतीत घेऊन
रावणाच्या दहा दहा तोंडाने
मी बोलणार आहे
आणि स्त्रैण ईश्वराच्या रोमँटिकपणाची
त्याच्यावरील शब्दांची पोल खोलणार आहे.
काळबंदिस्त भिंतीना उद्ध्वस्त करणार आहे.
षोडशीच्या स्वप्न आशा जोपासणाऱ्या
वक्षस्थळावर तोफ डागणार आहे...
आलो आहे...तेवढ्यासाठीच मी आलो आहे...मी आहे.

### फॉर्म्युला : त्रिलोक रेवार

धाकधमक्या शोषण हुल्लडबाजी
व कत्तलींची बोंबाबोंब माजवणारे
हे नगर
'बी. सी.' काळाच्या डोहात बुडवून टाका.
मला येथे कुत्र्याच्या मोतीने मरायचे नाही,
मला गॉटमॅट इंग्रजीही बोलायचे नाही.
गुणवत्ता आणि कार्यक्षमता
हे सोयीचे शब्द घेऊन
धर्माच्या बुजगावणी भयाचे
दफन करून
तीन टक्क्यांच्या संस्कृतीच्या
अनामत गाळात
माझे नाव नोंदवायचे नाही.
मला आता 'मेरिट लिस्ट' मध्येही
माझे नाव लिहावयाचे नाहीच.

### मुक्तक : दान वाघेला

आशा जुनी आहे,
तहान जुनी आहे,
कोण उचलणार ?
कलेवर जुने आहे !

### अंतराळ : बिपिन मेशिया

आपले असंबद्ध हे अंतराळ
विद्वेष वैराच्या सुईने
अंगाअंगात भिनवते वैमनस्याचे विष,

उन्मळून पडतात त्यामुळेच
उभे राहू पाहणारे
तरारते वृक्ष अकालीच.

फांद्यावरून ओघळून पडणारी
विनाशाच्या दाढेत पडणारी पाने
हातात कराल मशाल घेऊन
कोण पेरतो आहे हे सुरुंग ?
कोणती ही मशाल ?
...जिच्या लाल लाल ज्वालाजिभा
लवलवताना दिसतात.
अंतराळच तळहातावर पेलणारी
ही धगधगती वाफ सर्वव्यापी विशाळ
असे हे आपले पुढले असंबद्ध अंतराळ.

## धर्म : कंवल कुंडलाकर

१
कोणत्याही माहिती पत्रात
धर्म
या नोंदीपुढील
रिकाम्या जागेत
अधर्मी
लिहिता येत नाही
आणि माझा
स्वधर्म
त्यामुळेच कुठे
अस्तित्वात येत नाही.

२
हा धर्म
माझ्या
बापाचा आहे
म्हणून...
माझा ? आहे ...!

३
तू :
धर्मपुस्तक वाचतो आहेस
मी :
मत्स्यालयात वावरणाऱ्या
माशासारखा आहे.

४
रात्री
नाईटलॅम्प विझवल्याशिवाय
कपडे न काढणारी आणि
सकाळी
शिवलिंगाची पूजा करायला
निघणारी स्त्री
साध्वी सावित्री
धार्मिक
जातीवादी
घरसंसारी
पतिव्रता
आणि आरशासारखी.

५
ब्लू फिल्मप्रमाणेच
धर्माचा नकाशा
पाहून पाहून
काश्मीरपासून
कन्याकुमारीपर्यंत
लवलवणाऱ्या
रेषांची वळणेच
विसरून गेलो आहे
...प्रिये

६
धर्माचे काय, आपल्या जातीचे काय ?
बोल हौतात्म्याचे काय, फाशीचे काय ?
Well-come च्या पाट्यांना उलटवून
आपण वाचल्या तर मग शिव्यांचे काय ?
□ □

# क वि ता / क वि ता / क वि ता / क वि ता / क वि ता



**दोन कविता : यशवन्त मनोहर**

**१ : समाज**

झोपेत बरळत चालणारा दुनियेतला एकमेव सुखी समाज
येणारा प्रत्येकच दिवस जुना करण्यात तरबेज समाज
तो म्हणजे आपल्याला झुडुपवण्यात कुशल कलावंत
तो म्हणजे चाकोरीबाहेरच्या इच्छांचा निःपात करणारा फौजफाटा
नव्या स्वप्नांच्या तुच्छतेचे विक्रमी पीक घेणारा कृषि-पंडित
लांडग्यांच्या सत्कारांनी नभोमंडळ दुमदुमवणारा सभा-सम्राट
भोंदुगिरीच्या पायावर सवयीने कोसळून निपचित पडतो समाज
भूतकाळाच्या लेंड्यांवरती तृप्त गुजराण करतो समाज
............
समाज मोठा पराक्रमी, प्रबोधनाचे धिंडवडे काढतो
नव्या स्पर्धेत ढेपाळताना देवाचे कृतज्ञ आभार मानतो
सर्वच सोपे वाटते याला याचे फार कठीण आहे
भीषणतेचा बलात्कार पचवीत भावभक्तीने चेकाळतो आहे
ताळ नाही तंत्र नाही असे अद्‌भुत ध्यान याचे
हुंड्यासाठी सुना जाळीत दिसल्या गाईंना वंदन याचे
याची पुराणपारायणे नि हॉट सिनेमे एकाच वेळी
याचे दारूत बुडणे नि गंगेत बुडणे एकाच वेळी
याची जातीपूजा नि परमेश्वरपूजा एकाच वेळी
भक्तीचे सोने लुटणे नि दुर्बलांना लुटणे एकाच वेळी
त्याच्यासारखे वागा सोज्वळ वैजयंतीमाळा होतो समाज
तुम्ही व्हावे जिलकरी नि तुमचे कवच होतो समाज
............
मूठभरांच्या हितासाठी गरीब चिखल होतो समाज
गरिबांच्या होळ्यांच्या उजेडात दिवाळी साजरी करतो समाज
याचे गाणे भेसूर, याचे नाणे बद्द्ड
याची स्वप्ने शिळी याची चालचलण अवघड
चार्वाका-बुद्धांना पचवण्याची प्रथा याची
फुले–आंबेडकरांना गुंडाळण्याची तऱ्हा याची
याचे जगणे सडलेले. याचे विचार किडलेले
याची दाहीदिशा निद्रा याचे चालणे तोडलेले
गळ्याशी काजवे घेऊन आगरकरांना आग लावतो समाज
वर्तमानाच्या ताटात भूतकाळाची दुर्गंधी वाढतो समाज
............
याला कान नाही भविष्याचे गुपित ऐकायला
याला डोळे नाहीत युगाची पावले पाहायला
समाज असतो गाडलेले रंगीत खांब
ठायीच फिरणारा स्थितिमग्न भोवरा
निर्माल्याला जागा देण्यापुरता समाज असतो शुक्रवारी तलाव
भूतकाळाच्या लोखंडी ट्रंकेत सुरक्षित असणारे गाव
याचे हसणे किळसवाणे
याचे प्रेम प्रेताप्रमाणे
याचा आवेश नपुंसक आणि आवेग पोचट
याची नजर भादरलेली याचे मनसुबे लोचट
एकाच वेळी याचा येतो राग येते दयाही
एकाच वेळी याच्या नावाने वाटते रडावे आणि हसावेही
पाण्यात फाटलेली लहान मुलांची कागदी नाव समाज
लोखंडी पुलाखाली रंगलेली सर्वसाधारण सभा समाज
.........
जिथे धावावे तिथे झोपतो समाज
जिथे रुजावे तिथून पळ काढतो समाज
जे टाळावे ते टाळण्यात त्याला लाज नाही
विनाशाशी संसार थाटून जळण्यात त्याला व्यथा नाही
जे पुरावे ते उरावर घेऊन स्वतःस पुरून घेतो समाज
जे जाळावे ते लपेटून स्वतःस जाळून घेतो समाज
ज्याने व्हावे दुःखी त्यानेच सुखी होतो समाज
कुठल्या कुठल्या उत्साहाने बालिशपणे बागडतो समाज
खूप खूप हैराण करतो अगतिक अगतिक करतो समाज
नवनव्या चंद्रसूर्यांचे सतत गावकुस घडवतो समाज...

२ : तुम्ही

भुताटकीचे मळे पिकवून दीन–दुबळे गळे घोटता तुम्ही
तुमची कुळेच कारस्थानी करून सवरून असे नेक तुम्ही
तुम्ही मुंग्यांना साखर घालणारे मनुष्य उपाशी मारता तुम्ही
अद्वैताची जाहिरात करीत द्वैताने सर्वस्वी सडलात तुम्ही
आमच्या मारेकऱ्यांना आम्ही आरत्या गाव्या म्हणता तुम्ही
मुकाट सांडल्या रक्तास आमच्या बोलू नको म्हणता तुम्ही
आमच्या सरणावर शिजवता तुम्ही तुमचा अमानुष आनंद
तुमच्या नीचत्वाच्या घटनेलाच महान संस्कृती मानता तुम्ही

तू उत्सवाची गाणी
म्हणू नकोस
तू संगीताचा साज
चढवू नकोस
तू पायातील झंकार
वाजवू नकोस
तू चंद्र–चांदण्याचे
चित्र रेखाटू नकोस
तू पावसाचे भविष्य
वर्तवू नकोस
तू प्रकाशाची चाहूल
घेऊ नकोस
माझ्या उद्ध्वस्ताचे नगारे
सारखे वाजताहेत
मला ते कान भरून ऐकू दे
मला ते......

नगारे : भीमसेन देठे

शून्यात स्वतःच्याच अंगावर
येणारी स्वतःचीच सावली
या रितेपणातील
मरण व्याकूळ वेदना
कुठल्या जत्रेत विसरून याव्यात ?

कुजक्या प्रकाशात
वावरणारे काळेभोर दुःख
रात्रीच्या स्वप्नात
मध्येच डचकून उठत
लोंबकळणाऱ्या चिध्यांचा
हिशेब विसरण्यासाठी
कुठल्या झोपेच्या गोळ्या घ्याव्यात ?

तू म्हणतेस–
आपण पुरात सापडलोय
लागेल किनारा केव्हातरी
नाका-तोंडात पाणी जाऊ लागल्यावर
आपण कोणत्या दिशेकडे पाहत बसायचं ?

सूर : सुरेखा भगत

सुरांत बुडून जाणाऱ्यांना
सूर सापडतोच असे कुठे आहे ?
आकंठ रसपान करणाऱ्यांची
तृष्णा शमतेच असे कुठे आहे ?
अरे ज्याला यातून सहीसलामत
सुटायचे आहे
त्यालाच या फसव्या मुलुखगिरीची
भाषा कळते.
तसा गवयाला सूर लागणं
सुद्धा कठीणच असतो
म्हणून लागूनही ते तरन्नेज होतातच
असे कुठे आहे ?
सुरांनी मैफिली सजवायच्या असतात
म्हणून कोणी जीवनाचा सूर गाठू
शकत नाही.
मृगजळाच्या सुरांनी सजलेली मैफिल
चिरायु होत नसते
कोणताही राग आळवल्याने
रग उतरत नसते
जीवनाचा सूर लावणारे दर्दी



अनुक्रमणिका

कधी मैफिलीत बसत नसतात
दु:खितांच्या चीत्काराचे फूत्कार
त्यांच्या नसानसांतून सळसळत असतात
ज्यांच्या जिंदगीचा सूर बदसूर झालेला आहे
त्यांनी कशाला सुरांना जोपासावे ?
सावत्रपणासारखे कृत्रिम प्रेम करावे
ईश्वराचे सोंग उभे करून
म्याडपणासारखे अर्धेअधिक आयुष्य
खर्ची घालावे ?
आयुष्यातल्या या तीन अंकी नाटकांत
केवळ तमाशाचाच प्रवेश नाही
हे लक्षात असू द्या.
काहीच मोजके क्षण भोगण्याचे असतात
म्हणून अल्ल्या जिंदगीला भोगदासी
सूरदासी म्हणू नये !
मूल्यांच्या आक्रोशाचीच भैरवी
प्रथम गायची आहे
व तेथूनच मैफिलीला सुरवात
करायची आहे
करायची आहे !

### देश सूर्याचा : ज्योती लांजेवार

साऱ्या तंबूंनी एकत्र यावे
खूप वाटत असते
एकाच मार्गाचे प्रवासी व्हावे
पण...एकाच सूर्याचे वारसदार असताना
प्रकाशाला सोडून साऱ्यांनी
सूर्यासाठीच का भांडावे ?
नव्या अंकुरांना आता प्रश्नांचे जग
सतावीत आहे...
स्वार्थाच्या क्षुद्र मठांना पोसणारी
ही अवलाद का सूर्याचीच आहे ?
ओसाड माळरानावर
दुरून दिसणारे तंबूंचे डेरे
काही काळ लक्षणं जगवितात जीवनाची
हे मान्य केले एक वेळ तरी,
गाव दूर नसताना
दृष्टिपथात हिरवळ दिसताना
प्रकाशाची वाट पायाखाली
अन् हजारो डोळ्यांत सूर्याची बीजं
आणि...तरीही जगावे खितपत
आपापल्या तंबूंसाठी !
अरे...सावध व्हा,
अस्तित्व काबीज करू बघायला
प्रस्थापित सैन्याची आगेकूच दिसते.
अगणित सूर्यबीजांचे डोळ्यांपुढे मरण दिसते
आणि तरीही गाफील
आपापल्या तंबूंमध्ये ?
अरे, हजारो हातांचे बळ एकत्र आणून
हा सूर्याचा देश 'माणुसमय' करायचा आहे.
मुखवट्यांच्या जगातले वेगडी चेहरे
पर्दाविहीन करून
आता तंबूंच्या बाहेर यायचे आहे...
सूर्याचा देश जागवायचा आहे.
तंबूंनी एकत्र यायचे आहे.

### निंदण : भुजंग मेश्राम

सांगू नहि पर सांगा लागते वं माय,
निंदण कर्ता कर्ता महा जलम जात हाय
पर मनाचं वावर फायलं कि,
कळपामंदुन भुलावी एकांदी चंद्री गाय तसं
सपनामंदुन महे निसटतेत पाय.

गवताच्या भाऱ्याला खुपसलेला इळा काडला कि,
काटा कहाडल्यावर खंडणाऱ्या रगतापरमान
येकेक आठवणीचा थेंब पडते टपटप...
मंतेत, लहान्पणीच व्हावं घरादाराले आसरा
मनुन मी बी लय रुसली होती निंदणीच्या इळ्यासाटी
इळाच मिळे नहि बापाला त
थ्यॅन मोडली ढोरं कापाचीच सुरी...
बाप मंतो, घिसडी थ्यें दिवसी भाय दमला होता
आन् महा जीव सपनामंदून...
मीठ मिर्ची लसून कांदा
निंदणीत लपलेला कमाईचा तांडा
मग मी बी व्हत गेली इळ्यासर्की धारंदार

आन् डोळयायचं गवत वहाडत गेलं गावात.

एक दिसी मागं राहिल्या मह्या दोन पाती
घरी गेल्या बाया, दुपारची टळली,
कमरेएवढया पिकामंदी मीच उरली एकटी.
तवर वावराचा धनी नही यावं पुढी !
थ्येच्या बी नजरेच्या दोन पाती वाढल्या कि–
म्या खोचला पदर, उपसला इळा
अन थ्यँचं वोटच ठिवलं नहि हातावर्ती...
चकोट झालं डोळयांवरचं वोटावर निभलं,
ज्या वोटाच्या इशाऱ्यावर सम्दं गाव नाचायचं
ते वोटच मी खुडून टाकलं.
आता हे गोस्टीला झाले वकळ दिवस
मुलीच्या पाचवीला सम्दा गाव जमला,
बाया मन्ल्या,' तुही पोरगी भाय कामाची
मातर आन्की एक सुरी मोडा लागलं इळयासाटी '.
लोक राहले सांगत. दिवोस गेले पांगत
मी आपली जाग्यावर्ती
आन् पोरीच्या हातात देल्ली पाटीलेखणी.
गावठाणच्या पडीत वावरांयवर आता
चरत असतेत त्यँच्या ढवळया गाई
एकेकीच्या पान्ह्यातून निगते
बलुतेदारीची करडी शाई...

सांगू नही पर सांगा लागते वं माय
निंदण कर्ता कर्ता मह्य जलम जात हाय,
पर रातरीवानी सपन पडलं नहि कवाच,
इळघाले म्या लावत होते धार,
आन् पडली एक फुल्की :
जाग आली तवा कळलं कि,
एक फुल्की बी पेटवते गाव
एक गाव बी होते फुल्की
मह्या सपनामंदून नुस्त्या फुल्क्यांचीच वसती...

*

**चर्चा** : भुजंग मेश्राम

: तुझा आणि झाडांचा संबंध काय
ज्यावर तू बोलतोस स्पष्ट नि सुंदर,
मनुष्यागत दुसरा सृजनात्मा नाही म्हणत
प्राधान्य मात्र झाडांना देतोस अंधाधुंद,
प्रदूषणाच्या या घनदाट अरण्यात
पसरले रानोमाळ हागनगोद्री खोरे, नी
निद्रिस्त वारे, तू शोधतोयस कुठे सुगंध ?

: मी लावतो संबंध
दोन मानवांमधील सुगंधाचा, सशक्त-तर्कशुद्ध
ज्याचे करतोस तू मानववंशी पृथक्करण
' दोन निसर्ग : दोन वर्ग
एक घट्ट रुतलेला, संरजामासारखा
दुसरा निगरगट्ट. फाटलेल्या गुलामासारखा '
मला नामंजूर हा पादरफुस्क्या सिद्धांत
जो स्वत:शीच करायला लावतो संभ्रमाचं युद्ध.
मी नाकारत नाही अतर्द्वंद्व किंवा आत्मपरीक्षा
मी साकारतोय एक अंतर्बाह्य बोधीवृक्ष
जिथे विसावू शकेल त्रिकाल सत्य
तू कसा नाकारतोस त्याला बिनशर्त ?

: नकाराशिवाय नाही म्हणतात उत्क्रांती
नकार म्हणजे कडू जहर पचवल्यावरची ढेकर
जी मी देतोय न पचवता दिवसरात्र
नि तू करतोस स्वास्थ्याच्या निमित्ताने उपवास !
मुख्य प्रवाहाची प्रदूषित गंगा जाते या अरण्यातून
ती फुलवत का असेना फक्त आपल्या काठाचा परिघ
तरीही येतात का लोक रानांच्या घरातून बाहेर ?
करतात का बंद हा लपंडावाचा एकेरी खेळ ?"
म्हणून रानांची ही विवक्षित घरे
पाडावी वाटतात येत्या युगासाठी एकवेळ
पण लावावेसे वाटत नाही नाते
जे विकासाच्या लाटेखाली वाहून जाते
तात्पर्य, केस आणि झाडांना मी मानतो एकसारखे.

: झाड म्हणजे झ्याट नव्हे
जे कधीही उपटता येते शिव्यांमधून
झाडं म्हणजे हृदयात रुतलेल्या श्वासांची रंध्रं
झाडं म्हणजे उत्क्रांतीमधली अपभ्रंश बोली
जी वाहते वर्तमानाकडे, इतिहासातून

: परत पेटवायला दिवा विझवता येतो
दिव्यात नि माणसात कुठे फरक उरतो ?
जेव्हा गंगाच शुद्ध करायला तुझी तयारी...
तुझी गंगा शुद्ध नि प्रवाही करायला

मिश्रित विकास प्रकल्पाची येअरी,
तेव्हा म्हणता येणार नाही तुला हूं की चूं
' सांग पाटला काय पेरू
उपट जवारी न् पेर गहू '
नुस्तं हेच नाही, आपल्या ढुंगणाखालचा अंधारही.
त्यात झाडांशिवाय कुणीही आढळणार नाही कोरं
ज्याचं आकडेवारीच्या महापुरात
तू करू पाहतोस उच्चाटन...
त्यांच्या उगमाकडे त्यांचं स्थलांतर
आणि आपापल्या आज्ञापत्रांचे दुर्मिळ पुनर्प्रकाशन...

: कबूल, माझे आणि झाडांचे हे ऐतिहासिक सत्याचे नाते
मी आणतो तुझ्या मध्यममार्गावर, करतो चिअर्स
मात्र एक पाळतो पथ्य,
तुझ्या माझ्या संबंधाचा हा कसला हट्ट ?
मला तर दिसतो तुझ्यातला ' हाय ' स्पष्ट, जसा
पेगातला बर्फ असतो ग्लासाबाहेर, किंचित

: मी असतो पाण्यात, पाण्याबाहेरसुद्धा
सर्वसाक्षी नव्हे, उभयचरासारखा
मात्र, झाडं फक्त रानातच अस्तात हे
कुणी सांगितलं तुला ?
ती माझ्या गावात जशी असू शकतात, तशी तुझ्याही.
तसलीच एक शक्यता तुझ्या माझ्या नात्याची.
म्हणतात, संबंधाशिवाय स्वत:ला मांडता येत नाही,
अगर भांडताही.
आपल्याला मांडण्याबद्दल काय म्हणता येईल रे नक्की?

: कहूं तो माँ मर जाय
ना कहूँ तो बाप कुत्ता खा जाय !

*

## वाढत होतो : माधव कोंडविलकर

माझ्या काटल्या आहेत वाटा उदरातच असताना आईच्या
पदराखाली घेताना आपल्या म्हणायची, ' बाबा आपण
तुकड्यावर पोसलो त्यांच्या
गावकीची सेवा करावी. ते म्हणतील तसं वागावं.'
उलटून बोलू नये कुणाला, सर्वांना बापापुता करावं '
आई म्हणायची, ' त्यांनीच दिला ना हा थारा, नाहीतर
वाजले असते आपले बारा.
आपणपण तसं करायला हवं जग आहे फक्त हसणारा.
दुनिया असून करायचीय काय. हातपाय हलवले 'तरच
कोणपण देतात.
रडणाराचं कोणी नाही. हसल्या गालाचे मुके घेतात.'
आई म्हणायची; दिवस आम्ही मरून काढले. अरेला
कायरे म्हटलं नाही.
असंच वागशील, वाकून चालशील तुझ्यावर आमचा
विश्वास आहे.
बाबा, शिळ्या तुकड्याचे आपण धनी.
दारात जावं. मागून खावं. करायचंय काय आपणांस
आणि.'
असा आपला वाढत होतो. उकिरड्यावर वाढतात
जशी डुकरं.
भयाण अंधारात आईच्या कुशीत शिरत होतो
पांघरूण बोंदरं.
आणि कधीतरी असंच शाळेच्या पटावर चुकून नाव पडलं
तेव्हा झाला एकच कल्लोळ. साऱ्या जिभा वळवळल्या.
म्हणाल्या; आमची शाळा बाटली.'
आणि शाळेनं कोपरा उदारतेनं बहाल केला.
तेव्हा शिळा तुकडा घशाला अडकावा, तसा एक काटा
खोल कुठंतरी रुतून बसला.
बह्या पुस्तकांचा पत्ता नव्हता हातात एक फुटकी पाटी
आणि दगडी पेन्सिलीचा तुकडा.
कुणीतरी दिलेला शाळेपुरता एक फाटका सदरा बाकी
दिवसभर उघडा.
दोस्त नव्हते कोणी दुरून सारे चालत.
' आवडलास तर मार खाशील–' अशी होती हालत.
दोस्तांनो, चामड्यांना चुना लावल्याने हातांना पडलेले
घट्टे आता साफ बुजले आहेत.
मात्र हृदयावरच्या खुणा भोवरी कापावी तशा कापल्या
तरी त्या अजून वाढताहेत.

*

## माझीबी आई होती : प्रल्हाद चेंदवणकर

माझीबी आई होती
चार आयाबायांसारखी
फाटक्या पदराआड झाकून
दूध मला पाजायची ।। ध्रु० ।।

# परिणय

वामन होवाळ



केशवराव कुलकर्णी सारखा विचार करीत होते. काय करावं त्यांना सुचत नव्हतं. गेल्या दोन महिन्यांपासून ते त्रस्त चक्रात अडकले होते. खूप उलट-सुलट विचार त्यांनी केला. एक गोष्ट त्यांच्या ध्यानी आली होती. यापुढे नकारात्मक निर्णय घेऊन आता चालणार नव्हतं. किंबहुना, होकारात्मक निर्णय घेणं आणि तो राबवणं, असा विचारच त्यांच्या मनात अधिकाधिक बळावू लागला होता. विरोधात जाण्यात किंवा त्याकडं दुर्लक्ष करण्यात शहाणपणा नव्हता. त्यामुळे चार लोकांत आपली बदनामीच होईल. ह्या आठवड्यात सर्व बाबींची तड लावलीच पाहिजे, असा त्यांचा विचार पक्का झाला.

केशवराव आपल्या पत्नीला म्हणाले, "ऐकलंस का, वसुधा, आता मी ठरवून टाकलं !"

"काय करायचं ठरवलंत ?" वसुधाबाई काहीशा काळजीच्या सुरात म्हणाल्या, "मला तर सतत धास्ती आणि भीती वाटतेय बाई !"

"धास्तावून जाण्यासारखं काय आहे त्यात ?" केशवरावांनी विचारलं, "सगळं ठीक होईल !"

"मी तुम्हांला सुरवातीलाच म्हणाले होते..." वसुधाबाई पुन: एकदा सांगू लागल्या, "कार्टीचं लक्षण काही धड नाही. कसंही करून तिचा चाळा थांबेल असं करा, कुणाचीही मदत घ्या पण हे सगळं मोडून काढा !"

"तोही प्रयत्न केला मी !" केशवराव हताशपणे म्हणाले, "पण ज्यांची मदत घ्यायची त्यांनीच वेड्यात काढलं मला !"

"त्यांचं ते बरोबरच आहे." वसुधाबाई म्हणाल्या.

"ते कसं काय ?" केशवरावांनी विचारलं.

"तुमच्या सभा बैठका...त्यांतली भाषणं...त्यांत व्यक्त केलेला पुरोगामीपणा...समाजपरिवर्तनाचा ध्यास, त्यासाठी आंतरजातीय विवाहाचा तुम्ही केलेला पुरस्कार...हेच सगळं आता तुमच्या अंगावर आलेलं आहे !" वसुधाबाई एका दमात बोलून गेल्या.

"खरं आहे ते !" केशवराव खोलवर श्वास सोडून म्हणाले, "पण आता कृतीत आणायला जड जातंय."

"कृतिशून्यतेसाठीच तत्त्वज्ञान असतं, हे माझं म्हणणं आता तरी पटतंय ना तुम्हांला ?" वसुधाबाईंनी विचारलं.

"पण वसुधा, तात्त्विकतेमुळंच क्रियाशीलता वाढते." केशवराव म्हणाले.

"असं आहे, तर करा ना कृती." वसुधाबाई म्हणाल्या, "कशासाठी विचारांचा घोळ वाढवीत बसलाय ?"

"होय, आता विचार करणं बंद ! आता निव्वळ आचार !" केशवराव ठामपणे म्हणाले.

"म्हणजे काय करायचं ठरवलंय तुम्ही ?" वसुधाबाईंनी विचारलं.

"तुला काय वाटतंय ?" केशवरावांनी विचारलं, "काय करावं ?"

"आता माझ्या डोक्याला अधिक शीण देऊ नका." वसुधाबाई म्हणाल्या, "तुम्ही म्हणाल त्यात माझा सहभाग असेल."

"तुझाही विरोध मावळत चालला वाटतं !" केशवराव हसत म्हणाले, "भीती वाटतेय का तुला ?"

"काय करावं ? सुजाता त्या मिलिंदबरोबर लग्न करण्यापासून परावृत्त होईल, असं वाटत नाही." वसुधाबाई इकडंतिकडं पाहत म्हणाल्या, "आणि आपण विरोध केला तर त्याची टारगट मुलं येऊन धुमाकूळ घालतील. काल दुपारी पाच-सात मुलं आपल्या घराभोवती उगीचच घिरट्या घालताना दिसत होती."

"तसं काही नाही !" केशवराव पुन: हसत म्हणाले, "मी असल्या पोकळ धमक्यांनी घाबरणारा नाही ! मी चौकशी केली. मिलिंद बनसोडे तशांपैकी नाही. तो,





या पत्रांतून अन्यायाचे, अत्याचाराचे वास्तव चित्रण करण्याचा आमचा प्रयत्न आहे, हा विचार मांडलेला आढळून आला.

या सर्व कथा वाचल्यानंतर आम्हांला जाणवले की, या लेखकांनी जीवन जसे जाणवले, भोगले, तसेच चित्रित केलेले आहे. पण हे मांडताना काही प्रथितयश दलित-लेखकांच्या शैलीची सावली थोड्या प्रमाणात या लेखकांवर पडलेली जाणवते. अनुभवांचा सच्चेपणा आहे पण 'कथा' या वाङ्मयप्रकाराविषयी त्यांची जाणीव समृद्ध न झाल्यामुळे परिणामकारकतेच्या दृष्टीने या कथा काहीशा कमी पडतात असे वाटते. त्याचप्रमाणे काही कथावस्तू डोळ्यांपुढे ठेवून घेतलेल्या जाणवतात. काही कथा ललितनिबंधाकडे झुकलेल्या आहेत, तर काही कथांतून योगायोगांची रेलचेलही दिसते.

असे असले तरी दलित कथेच्या भावी वाटचालीच्या दृष्टीने या कथा आश्वासक आहेत असे वाटते. या कथांतून 'नियती'ची मानवी सुखदुःखावर प्रभाव पाडणारी भूमिका सतत जाणवत राहते. 'उष्टी पत्रावळ' ही श्री. के. व्ही. सरवदे यांची कथा मनोविश्लेषणाचे वैशिष्टय ठळकपणे साकार करते. तर 'दि व्हिक्टिम' ही श्री. भगवान हिरे यांची कथा राखीव जागांचा सतत ऐकू येणारा नारा व बेकारीपायी दलिताला स्वीकारावे लागणारे दलालाचे जीवन यांतील विरोधाभास प्रकट करते. श्री. आप्पासाहेब खोत यांची '-दसऱ्याची कडाकणी' ही कथा शिक्षणाने माणूस वडीलधाऱ्यांपासून कसा तुटून बाजूला पडतो व वडीलधाऱ्यांना जिवंतपणी कोणत्या मरणप्राय यातना भोगाव्या लागतात याचे दर्शन घडवते. 'जयंती' सारखी श्री. यशवंत खरातांची कथा जयंती म्हणजे जत्रा नव्हे हा भाव प्रकट करते. तर 'गर्भपात' ही चंद्रकांत देवकरांची कथा स्वयंरोजगार दलितांच्या दृष्टीने फोल आहे हे सांगते.

अभिव्यक्तीच्या दृष्टीने विचार केला तर या कथांतून पारंपरिकताच जाणवते. संवाद, वाक्प्रचार बोलीभाषेची कलात्मक योजना या दृष्टीने अभिव्यक्तीचे नावीन्य फारसे आढळले नाही. तरी पण श्री. म. वा. जोशी यांच्या 'गोवरगॅस' या कथेत व श्री. उज्ज्वल कुलकर्णी यांच्या 'प्रमोशन' या कथेत अभिव्यक्तीतील नावीन्याच्या काही खुणा दिसतात.

या कथा वर्तमानकाळाच्या आव्हानाशी नाते काही प्रमाणात जोडण्याचा प्रयत्न करतात. पण बहुतेक कथा कथानायकाच्या बालपणाचा, त्याच्या नजीकच्या भूतकाळाचाच अधिक विचार करतात. असे असले तरी आपल्याला जाणवते की, दलितांवरील अन्याय–अत्याचाराच्या बाबतीत वर्तमानकाळात व भूतकाळात फारसा फरक पडलेला नाही. या कथा विद्रोह ते आत्मपरीक्षण, आत्मचिंतन असा धगधगत्या वास्तवापासून–मनोविश्लेषणाकडे प्रवास करीत आहेत.

□ □





अनुक्रमणिका

# दलित कथास्पर्धा-निर्णय

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके' च्या दिवाळी अंकासाठी एक दलित कथास्पर्धा आयोजित करण्यात आली होती. प्रा. विजयकुमार फरांदे, डॉ. सौ. नीलम हातेकर, डॉ. पंडित टापरे हे या स्पर्धेचे परीक्षक होते. परीक्षकांचा अभिप्राय पुढे दिलेला आहे. कथा स्पर्धेतील यशस्वी कथा पुढीलप्रमाणे आहेत :

पहिले बक्षिस रु. १०० उष्टीपत्रावळ : श्री. के. व्ही. सरवदे
दुसरे बक्षिस रु. ६० दि व्हिक्टिम : श्री. भगवान हिरे
तिसरे बक्षिस रु. ४० दसऱ्याची कडाकणी : श्री. आप्पासाहेब खोत

**उत्तेजनार्ह कथा**

१. जयंती : श्री. यशवंत वामन खरात
२. गर्भपात : श्री. चंद्रकांत देवकर

वरील पाचही कथा या अंकात प्रसिद्ध केल्या आहेत. यशस्वी कथाकारांचे हार्दिक अभिनंदन !

– संपादक

---

## परीक्षकांचा अभिप्राय

प्रा. विजयकुमार फरांदे / डॉ. पंडित टापरे / डॉ. सौ. नीलम हातेकर



'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'ने आयोजित केलेल्या दलित कथा स्पर्धेत एकूण ४३ लेखकांनी सहभाग घेतलेला होता. सर्व लेखक नवोदितच होते. या नव्या प्रतिभावंतांपैकी सातवी पास झालेली एक स्त्री, आठवी पास झालेला एक युवक तर उच्च माध्यमिक वर्गात शिकणारे तिघेजण आहेत. २–कॉलेज विद्यार्थी, ४ प्राथमिक शिक्षक, ६ माध्यमिक शिक्षक, १ प्राध्यापक, १ डॉक्टर, १ शेतकरी, १ पत्रकार, ६ कामगार, ३ बँक कर्मचारी, ५ गृहिणी व इतर ८ जण आहेत. एकूण स्पर्धकांपैकी ८ लेखिका आहेत. चार दलितेतर लेखकही या स्पर्धेत सहभागी आहेत.

हे कथाकार वेगवेगळ्या परिसरांतून आलेले आहेत. शेवगाव (अहमदनगर); कदेर, (उस्मानाबाद); वरणगाव (जळगाव); जाखले, कुर्डू, सांगरूळ, बालिंगा, रेन्दाळ, आळते (कोल्हापूर); ओझर, नासिक रोड, कंधाणे, मालेगाव (नासिक); मोशी, राजगुरूनगर, निमसाखर (पुणे); कराड, खराडे (सातारा); अंबेजोगाई (बीड); नंदुरबार (धुळे); दर्यापूर (अमरावती); माडगुळे (सांगली); माळशिरस (सोलापूर); राजापूर (रत्नागिरी); औरंगाबाद; कल्याण (ठाणे); मुंबई, तसेच बिदर (कर्नाटक) व डिचोली, नवेवाडे वास्को (गोवा) या महाराष्ट्राबाहेरील प्रदेशातील लेखकांनी कथास्पर्धेत भाग घेतला होता.

या कथाकारांनी जे कथाविषय हाताळलेले आहेत, त्याचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येईल : दारिद्र्य, विषमता व अगतिकता आणि अंधश्रद्धा– १०, शेतमजुरांच्या व्यथा– २, विकास योजनांचे विडंबन व वंचना– २, दलितांमधील परस्पर जिव्हाळा– १, दलितांची क्षमाशीलता व उदारता– ४, बेकारी– ३, दलितांचा उत्कर्ष– ३, दलितांवरील अत्याचार– ७, आदर्शवादी जीवनदर्शन– ५, विद्रोह– २, संसारकथा– ३, निवडणुकांतील राजकारण– १.

बहुतेक कथाकारांनी आपल्या कथेबरोबर आपली भूमिका स्पष्ट करणारी पत्रे दिलेली आहेत.

आता वादळून जाऊ दे आमचा लाचार जन्म
सूर्योत्सव उजळू देत या विझलेल्या नेत्री
त्यांनी मांडलाय लिलाव तुझ्या कर्तृत्वाचा
इथल्या मायावी बाजारात बेशरमपणे
पण मला थांबवायचा आहे तुझा करुण विक्रय
माझे काळीज तुझ्या चरणांवर वाहून
नाहीतर, उद्या उगवणारे तारे
कशी करतील क्षमा, मावळतीच्या गुन्हेगार चंद्राला

ही शतकांची दु:खयात्रा संपवायलाच हवी
मानवतेच्या सादाची तुझी तेजस्वी निमंत्रणे
धाडली आहेत, प्रत्येक संवेदनशील हृदयाला
तुझ्या क्रांतिगीताचा पडघम आता
वाजू लागलाय आभाळाच्या नगाऱ्यावर.

□ □

# कै. भीमराव कुलकर्णी स्मारक निधी

## सभासदांना आवाहन

प्रसिद्ध साहित्यिक आणि मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष डॉ. भीमराव कुलकर्णी यांचे दि. २७–९–१९८७ रोजी शोचनीय निधन झाले. डॉ. भीमराव कुलकर्णी यांचा साहित्य परिषदेशी गेली पंचवीस वर्षे अतिशय जवळचा संबंध होता. साहित्य परिषदेचे कार्यवाह, कार्याध्यक्ष आणि साहित्य पत्रिकेचे संपादक म्हणून त्यांनी साहित्य परिषदेची प्रदीर्घ आणि बहुमोल सेवा केलेली आहे. म्हणून साहित्य परिषदेने त्यांचे स्मारक करण्याचा निर्णय घेतला असून त्यासाठी निधी जमविण्याचे ठरविले आहे. साहित्य परिषदेच्या सभासदांनी या स्मारकनिधीसाठी देणग्या पाठवाव्या आणि हा निधी उभारण्यात सहकार्य द्यावे, अशी विनंती आहे. निधीसाठी रक्कम पाठविण्याची **शेवटची तारीख** ३१-३-१९८८ ही आहे. आपल्या देणग्या रोख, चेक किंवा ड्राफ्टने **'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे'** या नावाने **कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०** यांच्याकडे पाठवाव्या. देणगीदारांची नावे साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील. साहित्य परिषदेचे सभासद या स्मारकनिधीला भरघोस प्रतिसाद देतील अशी आशा आहे.

आपले

**शंकर पाटील**
अध्यक्ष

**राजेन्द्र बनहट्टी**
कार्याध्यक्ष

**गं. ना. जोगळेकर**
कोषाध्यक्ष

**राजा फडणीस, म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे**
कार्यवाह



अनुक्रमणिका

त्यालाही जातो तडा...
...नि कोसळतो आपोआप काळधाकभिन्न
पाषाणावर...
म्हणून मला–
तुला विसरता येणे शक्य नाही...
तुला बेइमान होणे तर मुळीच शक्य नाही.
गर्भश्रीमंत होवो.
नृप पायाशी लोळण घेवो.
उरात आनंद फुटो...
दाही दिशांतून.
कीर्ती पसरत राहो...
काहीही होवो...
तरीही,
तुझ्या नावाला कलंक लागेल असं मी करणार नाही...
मद्याच्या बाटलीत,
मी मला बुडवून, तुझ्या जन्मदिवशी
नाचणार नाही...
भरलेल्या ताटावरून
कुणालाही उठवणार नाही...
गर्भश्रीमंतीचा आव आणून
समाजाचा पुढारी समजून–
समाजाच्या माणसांचा केसाने गळा
कापणार नाही...
कलंक लागेल असं मी करणार नाही...
माझ्या प्रतिज्ञेला फुटतील फुलं
सुगंधमय होईल माझे विश्व...

*

## ब ! उन्हातलं झाड ! : भगवान भोईर

[ टीप : बा = वडील. ब = आई.]

कोंबडा आरवला, नि
बाने फळी मांडली
रापीला धार लावली निसण्यावर.

कुंडावर गेला
चामडं साफ केलं

च्या प्याल्यावर
पुन्हा फळी मांडली.
चामडं घेतलं, कापलं.

पाटलाच्या पोराचं लगीन.
नक्षीबाज जोडा बनवायला घेतला.
बाने अकराच्या आत
पालिसबिलिस लावून
चमकावून जोडा बनवला.
बच्या पाशी दिला.
मटणाची पंगत मिळंल म्हणून
बच्या पाठीपाठी मी निघालो.
आग्नीचे दिस ते !
सूर्यबापा सकाळपासनंच आग ओकायचा !
रस्त्याची धूळ लय गरम झालेली
नस्ती कुत्र्यावानी चावा घ्यायची !
मी म्हटलं
"ब, पाय लय लासत्यात ग."
ब म्हणाली,
"पलसाच्या पानांचा बूट बनव."
मी म्हटलं,
"काय ग ब, आपुन दुसऱ्यांना पायताण देणार
पर आपलेच पाय उघडेवोडके."
ब माझी लय शानी
म्हणते कशी,
"झाडांनी सवता तापायचं उन्हात,
पर दुसऱ्यांना सावली द्यायची !
आपुन म्हंजे झाडच की,
सदाचं उन्हात असलेलं ! !"

*

## सूर्योत्सव उजळू देत : हिरा बनसोडे

जिथे जिथे सांडलेत
तुझ्या रक्ताचे थेंब
तिथल्या मंगल भूमीत
मी लावीन एकेक कविता
तुझ्या मुक्ती-लढयाची
तिचा फुलगंध सांगेल दरवळून
तुझ्या झुंजार जखमांची कहाणी

किती दिवस ढाळायचे वांझ आंसू
तुझ्या पुण्याच्या सावलीत वसून
किती वर्षे चालायचे तुझ्या कुबडयांवर

ते अमर झाले...
इतिहासाच्या शुभ्र पडद्यावर,
नाव कोरून गेले...
तुझ्या आठवणींची ' चमक '
मी विव्हळतो,
भूतकाळातल्या ठिकऱ्या ठिकऱ्या झालेल्या
मेंदूच्या काचेतून...
भोगलेल्या यातनांच्या वरसातीतून...
तुझ्या आठवणींची ' चमक '
मी विव्हळतो...
प्रकाशाच्या खांद्यावर बसून,
शुभ्र कबूतरं उडवीत चालतो...
तुझ्या तेजाने,
तुझ्या तेजाने काय झाले
बहिऱ्याला कर्ण आले आणि
आंधळ्याला दृष्टी
जिभेतून सांडू लागले भराभर शब्द...
सम्यक विचारांचे ग्रंथ...
विझू लागला अहंकाराचा वणवा...
ढासळू लागले अंधाराचे बुरूज...
स्फोट होऊ लागला,
स्वार्थी, दांभिक, ढोंगी प्रवृत्तींचा...
तुझ्या तेजाने...
तुझ्या तेजाने,
दीन-दुबळ्यांना, पतितांना,
मिळाली संजीवनी...
जल्लोष...
गाऊ लागले,
स्वातंत्र्याची गाणी...
आत्मप्रतिष्ठा...आत्मज्ञान...संघर्ष...
रोमारोमात...!
तुला काय म्हणावे–
अथांग ज्ञानसागराचा महासागर
तळागाळातल्यांचा उद्धारकर्ता
सडक्या कुजक्या जीवनात संजीवनी भरणारा,
माणूसपण बहाल करणारा...
अभिजात डॉक्टर.
समाजसंजीवक.
तू आहेस विचार-मेरूचा महामेरू...
महाकवींचा महाकवी.
विश्वसूर्य...प्रज्ञासूर्य.
विशाल, झुंजार व्यक्तिमत्त्व लाभलेला तू एक
सामर्थ्यशाली पूर्णपुरुष...महापुरुष...
युगकर्ता...युगंधर...
महान द्रष्टा...
माणसांचा शिल्पकार...
कलावंतांचे प्रेरणास्थान तू.
पतितांचे अढळ श्रद्धास्थान तू.
म्हणूनच...
मीदेखील गातो तुझ्या तेजोवलयाचे गीत.
झपाटल्यागत करतो तुझ्या नावाचा जयजयकार
उद्घोष.
तुझ्या १४ एप्रिलचा उद्घोष...
तुझ्या असामान्य कर्तृत्वाचा गौरव.
तू एक डोळस.
भविष्याचे अंजन डोळ्यांत घालून चालणारा...
तुझ्या अंजनाचे गातो गीत.
सूर्य प्यालेली तुझी प्रज्ञा–
गातो गीत तुझ्या प्रज्ञेचे.
मनसोक्त करतो विवरण,
तुझ्या भव्य विशाल सावलीचे...
ज्या तुझ्या सावलीत
विसावला तुझा समाज आणिक मी.
माझा अणूरेणू घेतोय विसावा
स्वच्छंद स्वैरपणे...आनंदाने.
केवळ तुझ्या नावानेच
मला मिळाले अवीट मिष्टान्न...
चिरंतन वास्तू
म्हणूनच मला स्वस्थ बसू देत नाही,
माझे पंख...
उत्तुंग शिखराचे गीत गायिले नाहीतर–
मीच मला मारतो डंख...!
तरीही–कधीकधी...
फुलू लागतात स्वार्थाची फुलं
पडतो विसर तुझ्या उत्तुंग कार्याचा.
सापडतो बेइमानीच्या भोवऱ्यात.
तू हात धरून शिकविले...
मला सुंदर केले...

म्हणून मागू शकता तुम्ही
जे आहे माझे काही !'
कोणी मागितले पेन
...तर कोणी घड्याळ
एकाने घेतली
पुस्तकावर स्वाक्षरी !
उभा राहिला
पॅन्थर एकलव्या
त्याने मागितला
द्रोणसरांचा
उजव्या हाताचा आंगठा !

आंगठा देत
म्हणाले, द्रोणसर
'मागितले असते माझे शीर
तर तेही दिले असते तुला !'
यावर म्हणतो कसा
पॅन्थर एकलव्या
उजव्या हाताएवढाच
महत्त्वाचा आहे डावा हात
हे लक्षात ठेवावे
या देशातील वैचारिक अन्
सांस्कृतिक नेतृत्व करणाऱ्यांनी...

म्हणून मागितला
आपल्या उजव्या हाताचा आंगठा !'

*

**प्रज्ञासूर्य : नीलकान्त चव्हाण**

तुझ्या आठवणींची 'चमक'
मी विव्हळतो,
भूतकाळातल्या ठिकऱ्या ठिकऱ्या झालेल्या
मेंदूच्या काचेतून...
असंख्य विव्हळणे
मी पितोय माझ्या असंख्य नजरेने
अकाळ विकाळ होऊन
तू मात्र एकमेव
माणसांच्या काळ्या विषारी भूतकाळाला
डंख मारलास...
नि गळून पडले तोंडापुढचे गाडगे... !

शब्दांना फुटले इमानदारीचे किरण...
ज्ञानकिरणांनी सताड पाडले,
कर्णदरवाजे !
थंडावल्या...मंदावल्या उष्णलोहशलाका
तुझ्या तेजाने...
तुझ्या तेजाने,
वर्णव्यवस्थेचा काळासूर्य पळू लागला
गाव सोडून.
मनुजवैरी जातिव्यवस्थेच्या जमिनीला फोडून
काळघाकभिन्न गलिच्छ संस्कृतीला चिरून
'स्व' पथाने जाऊन सांगू लागला...
तुझ्या तेजाची महती...
मनूचे मन...बुद्धी जाळल्याची माहिती...
धर्मग्रंथांना ग्लानी,
तुझ्या तेजाने...
तुझ्या तेजाने,
घडली समाजक्रांती...
चवदार तळ्यातील पाण्याचे थेंब
गाऊ लागले, मुक्ततेची गाणी...
जे कधीपासून बंधनात होते,
केविलवाणे
तुझ्या तेजाने पेरली इथे
माणुसकी...
समानता, स्वातंत्र्य, बंधुभाव,
गाडली जोहारकी
जसा पेरला वर्तमानकाळ तुझ्या तेजाने,
तसाच भविष्यकाळ
म्हणूनच तू...
अन् तुझे...
माणसांसाठी सांगितलेले तत्त्वज्ञान असत्य वाटत नाही...
माणसांच्या मुक्तीचे तू गायिलेले गाणे
भेसूर वाटत नाही...
ज्यांनी ज्यांनी हात राखून सत्य सजवले
ते सारे,
धुक्याच्या भितीखाली सापडून,
विनदिक्कत चेंगरून मेले...
जातीच्या हवेने शेष थोडे उरले...
ज्यांनी मुक्तपणे, निःस्वार्थीपणे,
तळागाळातल्या माणसांचे 'मुक्तिगीत' गायिले,

पाटीभर नवास केलं
तवा तूं झालायस मला
नागमलाच्या बगाडावरनं
म्याच अलगद झेललाय तुला
पटापटा, पटापटा
किती मुकं घियाची
धुळीमध्ये खेळून आलो
तरी पाय चुंबायची... ॥१॥

मी जरासा शिकलो की
उमान्या घामान्या हुयाची
म्हाकूबायच्या नावानं
भाक बांधून ठेवायची
मीठ, मिरच्या, मोहरी आणि
कशा, कशानं ओवाळायची
दृष्ट मला लागू नये
म्हणून तीट लावायची... ॥२॥

खानावळचांची, मुंग्यावाणी
घरात रीघ लागायची
लालभडक तव्यावरती
एकटी भाकऱ्या भाजायची
घामाने निथळलेला
देह पुशीत उठायची
पाटी दप्तर घेऊन माझं
शाळेत मला पोचवायची... ॥३॥

दुसऱ्याच्या घरामधली
धुणीभांडी करायची
महिना पाच रुपयांसाठी
मसालावी वाटायची
दिलंच कुणी जुन्यार, तर,
दंड घालून नेसायची
फाटलेल्या आभाळाला
ठिगळं लावीत बसायची... ॥४॥

असं कष्ट करीत, करीत
आई झाली म्हातारी
चार बुकं शिकून सवरून
मीही झालो अधिकारी
पूर्वीपेक्षा परिस्थिती
तशी खूपच बरी होती

सणासुदीसाठी घरात
नवी कापडं येत होती
टोप पदराच्या लुगड्यालाही
आई दंड घालायची
चांगलं, चुंगलं वाढलं तरी,
शिळं–पाकं मागायची... ॥५॥

असं शिळंपाकं खाऊन
आई पडली आजारी
सर्दी, ताप, दमा, खोकला
देह अस्थिपंजरी,
अंथरुणाला खिळली तरी
डाग्तर नको म्हणायची
कर्जबाजारी होऊ नकोस
म्हणून मलाच भांडायची... ॥६॥

त्या दिवशी आई माझी
कुण्णा कुण्णाशी बोलली नाही
संध्याकाळी घरी आलो,
तेव्हा आई राहिली नाही.
देहावरती घडी होती
नव्या कोऱ्या लुगड्याची
नजर होती रोखलेली
आभाळ भरल्या मायेची...॥७॥

घरावरती नजर आहे
जोवर माझ्या आईची
काय कुणाची बिशाद आहे
घरटं माझं मोडण्याची.
माझीबी आई होती
चार आयाबायांसारखी
फाटक्या पदराआड झाकून
दूध मला पाजायची...॥८॥

*

## पॅन्थर एकलव्या : त्र्यंबक सपकाळे

निरोप समारंभाच्या वेळी
द्रोण सरांनी घोषणा केली
'विद्यार्थी मित्रांनो,
आठवण असावी माझी



अनुक्रमणिका

त्याचा एम. बी. बी. एस. नंतरचा इंटर्नशिपचा अभ्यास आणि आपली सुजाता यापेक्षा त्याला अधिक विश्व नाही !"

"खरं ना !" वसुधाबाई म्हणाल्या, "मग बरं आहे बाई ! तेवढं तरी बरं आहे."

वसुधाबाईंचा जीव थोडासा मोकळा झाला.

"मी आता बनसोड गुरुजींना सरळ पत्र लिहितो." केशवराव म्हणाले, "पहिल्या पत्राचं उत्तरही त्यांनी ठीकपणे दिलंय ! त्यांना लिहितो, तुमच्या मिलिंदला आमची सुजाता द्यायला तयार आहोत. रीतसर लग्नच करू या त्यांचं ! रविवारी बोलणी करण्यासाठी 'सिंह-गड'ने येतोय ! तू पण येशील ना ?"

"मी कशाला उगीच ?" वसुधाबाई म्हणाल्या, "तुम्ही ठरवाल ते मान्य आहे मला !"

हे सगळं वसुधाबाईंच्या मनाविरुद्ध चाललं होतं. आपल्या एकुलत्या एक मुलीने, एका महार मुलाबरोबर प्रेम करावं आणि लग्न करण्याइतपत तिची मजल जावी, ह्यामुळं त्या धास्तावल्या होत्या. तो एम. बी. बी. एस. चा असला म्हणून काय झालं ! जात-पात, धर्म, संस्कार ह्याचं कसलंच भान कसं राहिलं नाही ह्या कार्टीला? सुजाताचं कॉमर्सचं शेवटचं वर्ष ! बी. कॉम. झाल्यावर कुठंतरी चार-दोन वर्षं नोकरी तरी करायची होती. कशा, कशाचा म्हणून सुजातानं विचार केला नाही. मिलिंद बनसोड तिचा वर्गमित्र होता अशातलाही भाग नव्हता. केवळ येता-जाताच्या गप्पागोष्टी आणि घरासमोर असलेलं त्याचं वसतिगृह एवढ्या भांडवलावर सुजाताचं प्रेम जुळावं, ह्याचं वसुधाबाईंनाच मोठं आश्चर्य वाटत होतं. समजावून सांगणं, धाकदपटशा दाखवणं सगळे प्रकार झाले; पण कशाचा उपयोग होत नव्हता. 'मी मिलिंदबरोबर लग्न करणारच !' ह्या निश्चयापासून माघार घ्यायला सुजाता तयारच नव्हती. त्यामुळेच केशवराव आणि वसुधाबाई तिचं रीतसर लग्न करावे, ह्या विचारापर्यंत येऊन पोचले. त्यांचा इलाज नव्हता. केशवराव कुलकर्ण्यांनी त्यासाठीच बनसोड गुरुजींना पत्र लिहिलं ! "रविवारी बोलणी करायला येत आहोत !"

.........

"अग, हे पाहिलंस का ?" बनसोड गुरुजींनी आपल्या पत्नीला म्हटलं, "पुण्याहून दुसरं पत्र आलंय कुलकर्णींचं ! ते !"

"व्हय ! ते दुपारच्याच टपालानं आलंय !" गुरुजींच्या पत्नीनं जनाबाईंनी म्हटलं, "मला कुठं वाचायला येतंय ? मी का शिकलेली हाय तुमच्यासारखी !"

गोष्ट खरी होती. जनाबाईंना अक्षरओळखही नव्हती. लक्ष्मण बनराज बनसोड. जुन्यातली व्ह. फा. पास करून पी. टी. सी. झालेले. गेली तीस-एकतीस वर्षं मुंबई महापालिकेच्या प्राथमिक विभागात शिक्षक होते. गेल्या पाच वर्षांपासून ते डेप्युटी हेडमास्तर म्हणून सिद्धार्थनगरातल्या प्राथमिक शाळेत काम करीत होते. बनसोड गुरुजी एक उत्तम शिक्षक होते. सर्व शाळांमध्ये ते लोकप्रिय होते. इतर सर्व शिक्षक त्यांना 'लव' गुरुजी असेच म्हणायचे. मोठा उमदा माणूस ! डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा त्यांना खूप अभिमान होता. समाजकार्य, धार्मिक चळवळ यात लव गुरुजींना विशेष आवड होती.

"काय लिवलंय पत्रात ?" जनाबाईंनी पुन: विचारलं.

"अग, काही नाही !" लव गुरुजी म्हणाले, "सुजाता आणि मिलिंदचं रीतसर लग्न करू या म्हणतात. रविवारी बोलणी करायला येतोय म्हणून कळवलंय त्यांनी !"

"पण गुर्जी, हे धड आन् नीट-नेटकं हुईल का वं ?" जनाबाईंनी विचारलं.सगळेच म्हणतात म्हणून जनाबाईही त्यांना 'गुर्जी' असं म्हणायच्या ! हाक मारायलाही ते बरं पडायचं !

"नीट न व्हायला काय झालं ?" गुरुजी म्हणाले, "घोषणाच आहे तशी !"

"कसली म्हन्ता ?" जनाबाईंनी विचारलं.

"आंतरजातीय विवाह करा, फुले–आंबेडकरांच्या मार्गाने चला !" लव गुरुजींनी घोषणा सांगितली, "समाजपरिवर्तनासाठी हे आवश्यकच आहे."

"ते खरं वं ! पन त्या कुलकर्ण्यांस्नी काय वाटत असंल ?" जनाबाई कुलकर्ण्यांचा विचार करू लागल्या.

"त्यांना काय वाटणार आहे ?" लव गुरुजी म्हणाले, "उलट हुंडा वाचणार म्हणून आनंदात असतील !"

"असं कसं म्हन्ता ? लेकरासाठी खर्च करायला आय-बा तयार असत्यातच की ?" जनाबाई म्हणाली, "पन खालच्या जातीच्या घरात लेक जायची मंजे जिवाला घोरच की ! वंगाळ वाटायजोगंच हाय की



अनुक्रमणिका

" ते सगळं झूट आहे गं. संपूर्ण मानव तेवढा एकच आहे." लव गुरुजी म्हणाले, " कसली जात–पात घेऊन बसली आहेस ?"

" आता बोलू का गुर्जी ?" असं म्हणून जनाबाई बोलू लागली, " आपल्या लेकीनं तिला आवडलेल्या पोराबरोबर लगीन केलं त्या गोष्टीला दीड वर्ष सरून गेलं. आजून बोलता का लेकीसंगं ? तरी बरं; पोरगा बुद्ध समाजातलाच हुता. खालच्या जातीच्या पोरासंगं लगीन केलं असतं तर तुमी काय केलं असतं कुणाला ठाऊक !"

" तुझं शहाणपण आम्हांला शिकवू नको !" आपल्या मुलीचा विषय निघताच गुरुजी भडकले, " ती बोलली असती तर मी स्वतः लग्न करून दिलं असतं तिचं ! शेवटपर्यंत तिनं पत्ता लागू दिला नाही. त्याला मी काय करू ?"

लव गुरुजींच्या मोठ्या मुलीनं प्रेमविवाह परंतु सजातीय विवाह केला होता. तिनं विश्वासघात केला म्हणून ते रागात होते. मुलीचा विषय निघाला की ते भडकायचे.

गुरुजींना शांत करीत जनाबाई म्हणाली, " मी म्हन्तेय गुर्जी, परजातीतली पोर घरात यायची तर तिला नीट सांभाळली पायजे. आगीतनं उठून फुपाट्यात पडलो असं तिला वाटायला नगो, एवढंच माजं म्हननं हाय !"

" तुझा विचारही खरा आहे !" गंभीर होत लव गुरुजी म्हणाले, " चिंता करू नको तू ! कुलकर्णी आले की आम्ही दोघे सगळं काही ठीक करू."

.........

सिद्धार्थ–नगर बस स्टॉपवर केशवराव उतरले. थोडे तिथं उभे राहिले. सिद्धार्थनगर ही महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळाची एक चांगली आणि प्रचंड विस्तृत अशी वसाहत होती. नगराच्या मधोमध भव्य असा एक नव्वद-फुटी रस्ता होता. रस्त्यांच्या दुतर्फा विविध प्रकारची झाडे होती. नगरातल्या सर्व इमारती शिस्तशीर उभ्या होत्या. बस आणि रिक्षांची धावाधाव सतत सुरूच असायची.

केशवरावांच्या हातात गुरुजींच्या पत्त्याचा एक छोटासा कागद होता. प्रवासात त्यांनी तो पत्ता खूपदा वाचला होता तरीही पुन्हा एकदा केशवरावांनी तो वाचला.

श्री. ल. व. बनसोड (गुरुजी) डेप्यु. हे. मा.
' आम्रपाली ' सहकारी गृहनिर्माण संस्था (मर्या.)
५०४/२३४० सिद्धार्थनगर– २, मुंबई–८१.

केशवराव एकेका इमारतीकडे रोखून पाहू लागले. ' सदासुख ', ' लोक-सेवक ', ' स्वेदबिंदू ', ' बहुजन हिताय ', ' युगप्रवर्तक ', ' राहुलभवन '– इमारतींची ही शीर्षकं वाचून केशवराव मोठे सुखावले. त्यांना बरं वाटलं. सगळं खरं; पण ही ' आम्रपाली ' इमारत का दिसत नाही ?" असं म्हणून केशवराव उजवीकडं वळले आणि. समोर मला मोठा बोर्ड दिसला– ' आम्रपाली ! '

मघाशी खुललेले केशवराव एकाएकी थबकले आणि अकारण उदास झाले. सुजाताच्या लग्नाची बोलणी करून झटपट सगळं ठरवू, असा उत्साह घेऊन आलेले केशवराव थोडे खिन्न झाले. त्यांच्या मनाला मरगळ आल्यासारखं झालं. मनाची चलबिचल झाली.

...पण केशवरावांनी पुन्हा एकदा स्वतःच स्वतःला धीर दिला. आता मन खिन्न व्हायला नको. त्यांनी स्वतःशीच हसून पाहिलं. चेहऱ्यावर हसू ठेवलं आणि ' आम्रपाली ' च्या कोपऱ्याला भेटलेल्या एका गृहस्थास त्यांनी विचारलं, " अहो, इथं बनसोड गुरुजी कुठं असतात ? कॉर्पोरेशनमध्ये डेप्युटी हेड–मास्तर आहेत..."

" कोण बनसोड ?" त्या गृहस्थानं चालता चालताच विचारलं.

इमारतीच्या पहिल्या गाळ्यासमोर एक माणूस उभा होता. गॅलरीच्या कठड्यावर त्यानं आपल्या हाताची चौकट ठेवली होती.

नीट उभं राहत त्यानं विचारलं, " कोण ? लव गुर्जी का ?"

" अं... हो... हो... बनसोड गुरुजी !" केशवराव गोंधळल्यासारखे बोलले.

" तेच ते ! लव गुर्जी ! हिथं ग्राउंडलाच... ती कोपऱ्याची खोली !" त्या गृहस्थानं माहिती दिली.

केशवराव चटकन हलले. त्यांच्या पायांना वेग आला. त्यांनी कोपऱ्यावरच्या खोलीवरची बेल दाबली.

दरवाजा घाईनं उघडला गेला.

समोर एक प्रौढ गृहस्थ उभे होते. त्यांच्या अंगावर नुकताच इस्त्री केलेला पायजमा आणि पांढरा नेहरू शर्ट होता. शर्टाच्या थोडघाशा डगळ खिशात एक डायरी आणि त्याच्या बाजूला दोन पेन्स लटकविलेले होते. हेच बनसोड गुरुजी असावेत अशी पक्की खात्री होऊन केशवराव म्हणाले, "नमस्कार गुरुजी, नमस्कार ! मी केशवराव माधवराव कुलकर्णी... पुणे !"

"नमस्कार साहेब, नमस्कार !" बनसोड गुरुजी म्हणाले, "या ना या, साहेब ! मी तुमचीच वाट बघत होतो. एवढा उशीर का ?"

"गाडी थोडी लेट झाली... अर्धा–पाऊण तास !" कुलकर्णींनी खुलासा केला.

"अहो, ऐकलं का ? कुलकर्णी आलेत !" गुरुजींनी जनाबाईला हाक मारली.

बनसोड गुरुजी जनाबाईंना आजवर– "अगं, ऐकलंस का ?" असं म्हणत असत. कुलकर्णी आलेत म्हटल्यावर त्यांनी 'अहो 'नं सुरवात केली.

केशवरावांनी घरावर नजर फिरविली. ती डबल रूम होती. तशी एकच मोठी खोली म्हणावं लागेल; पण मध्येच अर्धवट भिंत घालून आतल्या बाजूस स्वयंपाक खोली तयार केलेली होती एवढंच !

समोरच्या भिंतीवर तथागत भगवान बुद्ध आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांच्या तसबिरी होत्या. त्यांच्याभोवती चंदनाचे हार लटकत होते. बाजूच्या भिंतीला एक काचेचं कपाट होतं. त्या कपाटात बरीच पुस्तकं शिस्तीनं लावून ठेवली होती. त्यांत नव्या-जुन्या ग्रंथांचा भरणा दिसत होता. भिंतीवर एक मध्यम आकाराची दिनदर्शिका ! बस एवढंच ! बाकी सगळं घर फिकट निळ्या रंगानं चकचकीत दिसत होतं. ह्या टुमदार घरानं केशवराव प्रसन्न झाले. त्यांना बरं वाटलं.

"कुलकर्णी आलेत !"- असं ऐकूनही जनाबाई आतल्या खोलीतच होत्या. अकारण दडपण आल्यासारखं त्यांना वाटत होतं.

जनाबाई बाहेर येत नाहीसं पाहून गुरुजी पुनः ओरडले, "स्वच्छ तांब्या-भांड्यातून पाणी आणा पाहू ! तुम्हांला कितीदा सांगितलंय, कुणी घरी आलं म्हटलं की बाहेर येऊन प्रथम नमस्कार करावा !"

"असू द्या... असू द्या." केशवराव म्हणाले, "त्याने काही फरक पडत नाही."

नऊवारीतील जनाबाई बाहेर आल्या. हातातील पाण्याचा तांब्या त्यांनी टी-पॉयवर ठेवला.

गुरुजींनी ओळख करून दिली, "कुलकर्णीसाहेब, हे आमचं अर्धांग !"

"जयभीम, साहेब !" जनाबाईच्या तोंडून सरावाचे शब्द बाहेर पडले. आपण 'नमस्कार' कसं म्हणालो ? जनासारखं 'जयभीम' का म्हणालो नाही, ह्याचा गुरुजी विचार करू लागले. जनाबाई मात्र 'जयभीम!' म्हणाली. गुरुजी ओशाळल्यासारखे झाले.

"नमस्कार, नमस्कार !" केशवराव जनाबाईचा 'जयभीम' स्वीकारत मोकळेपणाने म्हणाले, "आणि जयभीमसुद्धा! जयभीम !"

मग तिघेही खळखळून हसले. पदरानं हसू लपवीत जनाबाई आत गेल्या.

"गुरुजी, तुमचं घर छान आहे, हं !" काहीतरी बोलत राहावं ह्या उद्देशानं केशवराव म्हणाले, "किती एरिया आहे ?"

"अगदी छोटं आहे." लव गुरुजी म्हणाले "आपण बसलोय ती बारा बाय दहाची खोली, आत बारा बाय आठची किचन आणि दहा चौरस फुटांची बाथरूम ! एकूण दोनशे सव्वीस चौ. फूट ! पण सेल्फ कन्टेन्ड आहे !'

वर्गात मुलांना क्षेत्रफळ शिकविताना संथ बोलावं तसं बनसोड गुरुजी बोलत होते.

"या आधी कुठं राहत होता ?" केशवरावांनी विचारलं.

"रावळी कॅम्पात !" गुरुजींनी सांगितलं.

"ती जागा कशी होती ?" केशवराव म्हणाले, "म्हणजे एरिया, सेल्फ कन्टेन्ड वगैरे ?"

"ती जागा बरीच मोठी पण कन्टेन्ड बाय सेल्फ ! अशी होती. सगळी झोपडपट्टीची वस्ती ! तियं वीस वर्ष काढली !"

"मग ही जागा केवढ्याला पडली ?" केशवराव.

"आमची झोपडपट्टी तोडली आणि शासनानं आम्हांला पर्यायी जागा म्हणून ही दिली !" बनसोड गुरुजींनी माहिती दिली, "आता आम्ही सोसायटी बनविली आहे एवढंच !"

जनाबाई चहा घेऊन आल्या.

चहाकडे पाहत बनसोड गुरुजी म्हणाले, "... आणि हे पहा... स्वयंपाकाला सुरवात करा !"

"नको, नको. मी दादरलाच 'पुरोहित' मध्ये जेवून घेतलं !" केशवराव म्हणाले, "त्यामुळंच मला थोडासा उशीर झाला; आणि मी 'सिंहगड' ने लगेच जाणार आहे !"

"कुलकर्णीसाहेब !" बनसोड गुरुजी म्हणाले.

मध्येच त्यांना थांबवून केशवराव म्हणाले, "कृपया मला कुलकर्णीसाहेब म्हणू नका !"

"ठीक आहे. फक्त केशवराव म्हणतो, मग तर चालेल ना ?" बनसोड म्हणाले, "आमच्याकडं सोयरा आला की उपाशी जात नसतो. तुम्ही भले म्हणत असाल, 'आमची जेवणं झालीत ! तुमच्यासाठी थोडा भात टाकायचा का ?' आमच्याकडं तसं नाही. जेवा आणि मग 'सिंहगड' ने जा, नाहीतर 'रायगड' ने 'विशाळगडा' वर जा ! बाकी काही न होऊ द्या पण जेवण झालंच पाहिजे !"

"चालेल, चालेल !" प्रेमळ आग्रहामुळे केशवरावांनी जेवण्याचं मान्य केलं.

मुख्य विषयावर येण्यासाठी अजून थोडया गप्पा करणं आवश्यक आहे, असं केशवरावांना वाटलं. म्हणून ते म्हणाले, "गुरुजी, तुम्ही बनसोड का बनसोडे ?"

"आता बघा," बनसोड गुरुजी सांगू लागले, "माझ्या आईचं माहेरचं नाव क्षीरसागर ! पण नोंद मात्र क्षीरसागरे अशी आहे. आमचं बनसोडचं बनसोडे ! हे सगळी नोंद करणारे ब्राम्हणच !"

केशवराव जरा नाराज झाले. आपल्यावर बनसोड गुरुजी हल्ला करणार ह्याचा अंदाज घेऊन ते म्हणाले, "ते कशाला करतील अशा नोंदी ?"

"पूर्वी पाटील-कुलकर्णी ही जोडी प्रत्येक गावात असायची. त्यातले पाटील न लिहिणारे. कुलकर्णी शिकलेले ! सगळ्या नोंदी त्यांच्याच हातात. जातीतला फरक कळावा म्हणून ते असा फरक करायचे." गुरुजी बोलू लागले, "आता तुमचं नावच बघा की ! केशवराव माधवराव ! आमचं असतं तर तेच नाव केसू म्हादू असं लिहिलं असतं ! येळीव गावचे माझे मामा त्यांचं आडनाव टिळक, पण नोंद मात्र टिळके अशी आहे. मला तर वाटतंय, टिळक आमच्यापैकीच असले पाहिजेत ! त्याचं संशोधन झालं पाहिजे !"

"मग बरंच झालं की !" केशवराव हसत म्हणाले, "आपण खूपच जवळ आलो म्हणायचं की !"

बनसोड गुरुजीही हसले.

जरासा विचार करत करत मूळ विषयाकडं येत केशवराव म्हणाले, "मग सुजाता-मिलिंदच्या लग्नाबद्दल कसं करू या ?"

"कसं म्हणजे लग्न करायचंच !" बनसोड गुरुजी म्हणाले.

"ते पक्कं आहे म्हणून तर मी इथवर आलोय !" केशवराव म्हणाले, "लग्नासाठी कसा काय खर्च करावा ?"

"कसा म्हणजे दोघांनी निम्मा निम्मा खर्च करायचा." बनसोड गुरुजी म्हणाले.

"नाही म्हणजे मिलिंदाचा शिक्षणाचा खर्च वगैरे..." केशवराव चाचपडत बोलले.

"ते काही नाही." बनसोड गुरुजी म्हणाले, "आमच्या पद्धतीप्रमाणं अर्धा-अर्धा खर्च करायचा ! वधू-वरांचा पोशाख, हॉलखर्च, मंडप आणि जेवणखर्च सगळा अर्धा-अर्धा करू !"

"आमच्याकडून फार माणसं येणार नाहीत." केशवराव म्हणाले.

"तरी पण किती येतील ?" गुरुजींनी विचारले.

"मी, माझी पत्नी आणि माझा भाऊ गणेशा आणि त्याची पत्नी वासंती !" केशवराव म्हणाले, "तुमच्याकडून किती येतील ?"

"आमची-दीड दोनशे माणसं असतील !" बनसोड गुरुजी म्हणाले, "आणि येतील ती सगळी जेवून जातील !"

"ठीक आहे. पण जेवणाचा बेत काय करायचा ?" केशवरावांनी विचारले.

"काय म्हणजे ?" गुरुजी म्हणाले, "चांगला भात करू आणि गोड बुंदी ! त्याशिवाय तोंडी लावायला तिखट म्हणून मटकी, वाटाणा अन् बटाटा टाकून उसळ करू ! झकास भोजन !"

"आपण असं करू !" केशवराव म्हणाले, "चांगलं भोजन देऊ. मी खर्च करीन !"

एकुलत्या एक मुलीला सुख लाभावं म्हणून केशवराव अधिक खर्चाची जबाबदारी उचलण्यास तयार होते. त्यांनी त्यासाठी नाहीतरी रक्कम राखून ठेवलेलीच होती.

" पण लग्नपत्रिका मात्र आमच्या पद्धतीनं काढू !" बनसोड गुरुजी म्हणाले.

"अहो चालेल !" केशवराव म्हणाले, "माझी मान्यता आहे."

" बरं, 'आपले नम्र' मध्ये तुमची कुणाकुणाची नावं टाकायची ? पुन: घोळ नको, अमक्याचं नाव राहिलं म्हणून !" बनसोड गुरुजी म्हणाले.

"कुणाची म्हणजे ?" केशवराव म्हणाले, " मी, वसुधा केशवराव, गणेश माधवराव आणि त्याची पत्नी वासंती माधवराव कुलकर्णी !"

" बस्स एवढीच !" बनसोड गुरुजींनी विचारलं, " का समस्त कुलकर्णी परिवार असं छापू ? आमची मात्र सगळ्या भावकीची नावं छापणार. एखादं नाव गळालं तर भांडणं करायला उठतील !"

" आमच्याकडून तसं काही होणार नाही !" केशवरावांनी आश्वासन दिलं.

आणखी सविस्तर बोलणी करून केशवराव पुण्याला निघून गेले...

.........

पाच मे तारीख बनसोड गुरुजींनी पक्की केली. केशवरावांना तसं कळविण्यात आलं. तीस एप्रिलला वडगाव जनरल हॉस्पिटलमध्ये मिलिंदची इंटर्नशिप पूर्ण होणार होती. बनसोड गुरुजींना मिलिंद आणि सुजाताच्या लग्नाची घाई झाली होती. मिलिंदाचा अभ्यासक्रम पुरा होताच पुढच्या आठवड्यातच लग्नाचा बार उडवून देण्याचे पक्के झाले.

उत्तम कागदावरच्या सुंदर छपाईच्या लग्नपत्रिकांचं एक बंडल गुरुजींनी केशवरावांकडे पाठविले.

पत्रिकेतील मजकूर असा होता–

॥ भवतु सब्ब मंगलम् ॥

सप्रेम जयभीम विनंती विशेष.

दारक : आयु० मिलिंद, एम. बी. बी. एस.

(आयु० लक्ष्मण वनराज बनसोड, मुंबई, यांचा सुपुत्र)

दारिका : सौ. कां. सुजाता, बी. कॉम. (फायनल) (आयु० केशवराव माधवराव कुलकर्णी, पुणे, यांची सुकन्या) यांचा मंगल परिणय

मानवी जीवन साफल्याचे सर्वस्वी एकमेव साधन अशा गृहस्थाश्रमात शुभसमयी पदार्पण करणाऱ्या आणि गर्द निळ्या आकाशातील पौर्णिमेच्या शीतल अन् तेजस्वी चंद्राप्रमाणे पृथ्वीतलावरील एकमेव साधन अशा विवाह–कुटिरामध्ये भावी आयुष्य उजळू इच्छिणाऱ्या या नव वधूवरांस आपण आपल्या शुभाशीर्वादाने उपकृत करावे, हीच विनंती.

आपले नम्र

आयु. ल. व. बनसोड — आयु. केशवराव माधवराव

डेप्यु. हे. मा. — कुलकर्णी

सौ. जनाबाई ल. बनसोड — सौ. वसुधाबाई के. कुलकर्णी

वरील विनंतीस मान देऊन अगत्य येण्याचे करावे, ह्याखाली आयु० गणेश मा. कुलकर्णी आणि सौ. वासन्ती ग. कुलकर्णी अशी वधूकडील नावे होती तर वराकडील पुरस्कार यादीमध्ये मोजून एकवीस जणांची नावे छापली होती. त्याशिवाय 'समस्त बनसोड परिवार' असेही न चुकता व बौद्धाचार्य एल. के. साळवे असा मजकूरही होता. पत्रिकेच्या डाव्या कोपऱ्यात विवाहस्थळ आणि वेळ याचा उल्लेख करण्यात आला होता.

केशवरावांनी मन लावून लग्नपत्रिकेतील मजकूर वाचला. आणि म्हणाले, " वसुधा, हे आयु. प्रकरण काय आहे ग ?"

" अहो, 'आयु.' मधला 'आ' म्हणजे 'आम्रपाली' असेल." वसुधाबाई अन्वयार्थ लावायचा प्रयत्न करू लागल्या.

" बरं." केशवराव म्हणाले, "आणि 'यु' म्हणजे?"

" 'यू' म्हणजे 'तू' किंवा 'तुम्ही'." वसुधाबाईंनी इंग्रजी शब्दाचा अर्थ सांगितला आणि हसता हसता दोघांनीही त्या शब्दाचा अर्थ लावण्याचा नाद सोडला. पुढे बनसोड गुरुजींकडूनच समजलं की, संपूर्ण हिंदु-संस्कृती नाकारण्यासाठी 'श्रीयुत' ऐवजी 'आयुष्यमान' हा शब्द वापरला होता.

.........

सुजाता आणि मिलिंदच्या लग्नासाठी मंगल कार्यालयात सर्व व्यवस्था केलेली होती. सिद्धार्थनगरमध्ये हा एकच चांगला असा हॉल होता. संपूर्ण कार्यालय विजेच्या रोषणाईने सुशोभित केले होते. लव गुरुजींचा मित्रपरिवार आणि गोतावळा मोठ्या संख्येने उपस्थित होता. केशव-

राव पति-पत्नी आणि गणेशपंत हे तिथेच उपस्थित होते. गणेशाची पत्नी मुद्दामच आली नव्हती. हे तिघे मात्र आनंदी होते.

हॉलमध्ये दोन लाउडस्पीकर होते. एक गुरुजींनी सांगितला होता. फक्त बाबा-बुद्धाची गाणीच तेवढी हलक्या आवाजात लावण्यास गुरुजींनी त्या ऑर्डरवाल्यास बजावले होते. त्यामुळे 'अंधाऱ्या झोपडीत, भीमानं लावलाय दिवा' हे गीत चालले होते तर दुसऱ्या स्पीकर-वर 'तवा नवीन पोपट हा, लागला मिठूमिठू बोलायला' हे गीत मारपीट संगीताने धडका उडवून देत होते. हा स्पीकर मिलिंदच्या दोस्तमंडळींनी ठरविला होता. गाण्याच्या तालावर तरुण मंडळी डिस्को करण्यात दंग होती.

हॉलमध्येही रोषणाई होती. नव्या कपड्यातील पाहुणेरावळे नीटपणे खुर्चीत बसून होते. तरुण मुलं उगीचच धावपळ करत होती. महिला वर्ग उजव्या बाजूच्या दालनात बसून होता. गळ्यातील दागिने दिसा-वेत म्हणून काही मुली मानेभोवतीचा पदर उगीचच सावरत होत्या. सगळे कसे आनंदात होते.

मध्यभागी एक व्यासपीठ तयार केले होते.

तथागत भगवान बुद्ध आणि डॉ. बाबासाहेब आंबेड-कर यांच्या प्रतिमा तिथे ठेवल्या होत्या. मध्येच एका टेबलावर एक कुंभ ठेवलेला होता. त्यात पाणी भरून एक चार-पाच पदरी दोरा सोडला होता. कुंभाला दोन-तीन वेढे देऊन दोऱ्याची दोन्ही टोके मुक्त सोडली होती.

भगव्या वस्त्रातील बौद्ध-भिक्कूही तिथे उपस्थित होते. त्यांनी इशारा करताच वधू-वर व्यासपीठावर आले. दोघेही शुभ्र वस्त्रे परिधान करून उभे होते.

पांढऱ्या शुभ्र वेशात मिलिंद तेजस्वी आणि प्रसन्न वाटत होता. उंचापुऱ्या मिलिंदाने ओठ भरून मिशा ठेवल्या होत्या. भरदार छाती आणि हसरा चेहरा! रंगानेही मिलिंद गोरा होता. व्यासपीठावर उभी असलेली सुजाता त्याच्याकडेच पाहत होती. तिला मागच्या एका प्रसंगाची आठवण झाली.

ती म्हणाली होती, "मिलिंद, तू आज खूपच सुंदर दिसतो आहेस."

"आणि तू?" मिलिंद म्हणाला होता, "तूही तशीच दिसतेस!"

"होय, पण तुझा हा देखणेपणा पाहून, तू दलित वर्गापैकी आहेस ह्यावर विश्वासच बसत नाही!" सुजाता बोलली.

त्यावर मिलिंद एकदम चिडला होता; म्हणाला, "काळीबेंद्री माणसं काही आमच्याच समाजात असतात का? सगळ्या मदनिका आणि मदन-पुतळ्यांचा मक्ता फक्त तुम्हांलाच दिलाय का? माझ्या माणसांना असं बोललेलं मला चालणार नाही!"

ह्या स्मृतीनं सुजाता स्वतःशीच थोडीशी हसली. तिची नजर खाली वळली. पांढऱ्या शुभ्र साडीत ती अधिकच तजेलदार दिसत होती. डोक्यावरून ती प्रथमच पदर घेत होती. डोईवरच्या पदर घेण्यामुळं ती अधिकच शालीन वाटत होती. मनात खळबळ असतानाही ती स्मित-वदनाने उभी होती.

"बौद्ध उपासक-उपासिकांनो!" बौद्धभिक्कू आपल्या धीरगंभीर आवाजात म्हणाले, "लग्नविधीची वेळ होत आली आहे. सर्वांनी शांत रहा. आता सामुदायिक वंदनेस सुरुवात होत आहे–

बुद्धं सरणं गच्छामि।
धम्मं सरणं गच्छामि।
संघं सरणं गच्छामि।

सर्व समुदाय वंदनेस साथ देत होता. कुलकर्णी परिवार गंभीरपणे बसून होता.

त्रिसरण-पंचशील म्हणून झाले.

भिक्कू म्हणाले, "आता मी लग्नविधीस आरंभ करतोय. सर्वांच्या सहकार्याची व शांततेची अपेक्षा करतो..."

लग्नविधी सुरू होणार इतक्यात कुठून तरी आवाज आला, "आदरणीय भन्ते, वधू हिंदुधर्मीय आहे; प्रथम तिला बौद्ध धर्माची दीक्षा द्या मगच लग्नविधीस सुरुवात करा." नागसेन बोलत होता.

"नागसेन कांबळेंच्या सूचनेस माझा पाठिंबा आहे." अशोक ननावरे म्हणाला, "वधूने दीक्षा घेणे आवश्यकच आहे. परंतु बुद्धधर्माची नव्हे तर बुद्धधम्माची दीक्षा द्या. कारण धर्म म्हणजे कर्मकांड तर धम्म म्हणजे जीवन-मार्ग!"

दोन्ही हातांनी इशारा देत भन्तेनी शांत राहण्यास सांगितले आणि ते सुजातास दीक्षा देऊ लागले.



अनुक्रमणिका

भन्ते म्हणाले, "त्रिसरण-पंचशील झालेले आहेच. आता मी वधूकडून बावीस प्रतिज्ञा वदवून घेत आहे. म्हण बाळ, मी ब्रम्हा, विष्णू, महेश यांना देव मानणार नाही, किंवा त्यांची उपासना करणार नाही..."

सुजाता गप्पच आहे हे पाहून भिक्कू पुन्हा म्हणाले, "म्हण... मी ब्रम्हा, विष्णू, महेश..."

सुजाता गप्पच होती. कुलकर्णी परिवार हवालदिल होऊन खाली पाहत होता.

भन्तेंनी पुन्हा एकदा सुजातास विचारले, "तुला दीक्षा घ्यावयाची आहे ना?"

"हंऽऽ." सुजाताने नुसताच हुंकार भरला.

"मग बोल तर..." भन्ते प्रतिज्ञा वदवून घेऊ लागले, "मी ब्रम्हा, विष्णू, महेश यांना देव मानणार नाही."

"मी ब्रम्हा, विष्णू, महेश यांना देव मानणार नाही."

सुजाता प्रतिज्ञा घेऊ लागली.

"मी राम व कृष्ण देव मानणार नाही, त्यांची उपासना करणार नाही." सुजाता प्रतिज्ञेचा उच्चार करीत होती.

"देवाने अवतार घेतले ह्यावर माझा विश्वास नाही."

सुजाता सुरुवातीस विचलीत झाली. परंतु नंतर मात्र खडया आवाजात बावीसच्या बावीस प्रतिज्ञा तिने ग्रहण केल्या.

पुन्हा एकदा नागसेन कांबळे उठले आणि म्हणाले, "भन्ते, आता वरालाही दीक्षा द्यावी. कारण तोही अजून हिंदू-महारच आहे. दीक्षा दिल्यावर त्यास प्रमाणपत्र द्या व त्याचे कॉलेज आणि इतर ठिकाणी 'बौद्ध' म्हणून नोंद करण्यास सांगा."

भन्तेनी मिलिंदासही दीक्षा दिली.

महामंगलसूक्त व जयमंगल अठ्ठगाथा म्हणून होताच उपस्थित जमावाने हातातील फुलांची वधू-वरांवर उधळण केली व टाळ्या वाजवून उभयतांचे स्वागत केले.

त्या गोंधळातच एक तरुण उभा राहिला.

त्याने भाषण सुरू केले, "महाकारुणिक भगवान गौतमबुद्ध, परमपूज्य नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा जोतिबा फुले, संत कबीर, आदरणीय भन्ते आणि बौद्ध उपासक-उपासिकांनो..."

तो तरुण ओरडत होता. लोकांचा गोंधळ चालूच होता.

तरीही तो बोलत होता, "नूतन वधू-वरास आशीर्वाद देण्यासाठी आपण सर्वजण उपस्थित राहिलात याबद्दल मी धन्यवाद देतो. ह्यानंतर सर्वांनी जेवण्यासाठी थांबावे, भोजनाची व्यवस्था केलेली आहे. जेवल्याशिवाय कुणीही जाऊ नये, ही घरमालकांच्या वतीने नम्र विनंती.

जय भीम! जय बुद्ध! जय भारत!"

.........

सुजाता-मिलिंद यांचा संसार सुखाने चालला होता. लवगुरुजी, जनाबाई आणि त्यांचे दोन लहान पुत्र, सगळेच सुजातावर खूश होते. ती समजूतदार व मनमिळाऊ होती. घरात आनंदी वातावरण होते. त्यातच एका महिन्याच्या आतच मिलिंदास महानगरपालिकेच्या हॉस्पिटलमध्ये 'ए. एम. ओ.' म्हणून अधिकाऱ्याची नोकरी मिळाली.

सुजाता लवगुरुजींच्या घरात चांगलीच रुळू लागली. सकाळी लवकर उठणे, घरातील आवराआवर करून स्नान करणे, दोघा दिरांचा अभ्यास घेणे ही कामे ती न सांगताच करत होती. घराची प्रसन्नता वाढत होती. सुजाताला जनाबाईंचा स्वभाव तर अत्यंत प्रेमळ वाटला. एक अक्षरही न शिकलेली जनाबाई, आपली सासू इतकी संस्कारक्षम आचरण कशी काय करते ह्याचं सुजाताला राहून राहून आश्चर्य वाटे. नव्या घरसंसारात सुजाता एकरूप झाली.

सुजाताचा बी.कॉम. परीक्षेचा निकाल जाहीर झाला होता तरीही आपण नोकरी करावी, त्या निमित्तानं घराबाहेर पडावं असं चुकूनही सुजाताच्या मनात येत नव्हतं. ती उत्तम गुणांनी उत्तीर्ण झाली होती. पुढं काय करावं, ह्याचाही सुजाता विचार करत नव्हती.

मिलिंद तिला म्हणाला, "सुजाता, तुला पुढं एम. कॉम. करायचं आहे का?"

"थांबा. आपण मामंजींना विचारू." असं म्हणून तिनं बनसोड गुरुजींना बाहेरच्या खोलीत बोलावलं. सासऱ्याला सुजाताही 'गुरुजी'च म्हणत होती.

गुरुजी कॉटवर बसले. समोर येऊन जनाबाईही बसल्या.

"काय म्हणतेस सुजाता?" गुरुजींनी विचारलं.

"ते डॉक्टरांनाच विचारा." असं म्हणून सुजातानं मिलिंदकडे पाहिलं.

"मी म्हणतो, गुरुजी," मिलिंद म्हणाला, "सुजातानं आता एम. कॉम. चा अभ्यासक्रम सुरू करावा."



अनुक्रमणिका

"मग आमी नगो म्हन्तोय का रं बाळा ?" जनाबाई मध्येच म्हणाल्या, "शिकू दे. सारीच लय शिका ! बाबांनीच सांगून ठिवलंय शिका, एकजुटीनं ऱ्हा आन् झगडत ऱ्हा. मी सारं काम बघत जाईन घरातलं."

"त्यापेक्षा कुठंतरी नोकरीचा प्रयत्न केला तर काय हरकत आहे ?" डॉ. मिलिंद म्हणाला.

"ते खरं; पण नोकरी लगेच कशी मिळेल ?" गुरुजींनी शंका व्यक्त केली.

"कशी मंजे ?" जनाबाईंनी विचारलं, "आपल्या मिलिंदाला कशी चटदिशी राखीव कोठ्यातनं नोकरी मिळाली. तशीच तिला पन मिळेल. आता ती आपल्यापैकीच ऱ्हाय का ?"

"अरे व्वा ! सासूबाईंनी पहा कसा वकिली मुद्दा पुढं केलाय." सुजाता हसत म्हणाली, "पण मला मात्र उत्तम गृहिणी म्हणूनच राहायला आवडतं !"

"सूनबाई, तू काळजी करू नको." गुरुजी म्हणाले, "काहीही असलं तरी तुला राखीव कोठ्यातून नोकरी मिळणार नाही."

"ते का ?" मिलिंदानं विचारलं.

"डॉक्टरसाहेब, ह्या बाबतीत तुमचा अभ्यास अजून अपुरा आहे." गुरुजी सांगू लागले, "ह्या देशातल्या माणसाची जात आंतरजातीय विवाह करून बदलत नसते. जन्माबरोबरच जात येत असते. मुंबई हायकोर्टानंच एका केसमध्ये तसा निकाल दिलेला आहे."

सुजाताला नोकरी मिळो अथवा न मिळो, परंतु ती घरात इतकी गुंतून राहू लागली ह्याचं मिलिंदला वैषम्य वाटू लागलं. त्यासाठी तो तिचा राग करू लागला. ह्या घरातच राहिलं तर आपल्याला 'प्रायव्हसी' कशी मिळणार ह्याचा तो विचार करीत होता.

एके दिवशी फिरायला गेल्यावर मिलिंदनं तिला विचारलं, "सुजाता, आपण स्वतंत्र असावं, असं वाटत नाही तुला ?"

"आता आपण कोणत्या पारतंत्र्यात आहोत ?" सुजातानं उत्तर दिलं.

"पण लग्नाआधी तूच म्हणत होतीस ना ? आपण ब्लॉक घेऊन स्वतंत्र राहायचं म्हणून !" मिलिंदानं आठवण करून दिली.

"होय...पण आहे ह्या घरात मला कसलाच त्रास नाही." सुजाता म्हणाली, "उलट मला इथंच 'सेफ' वाटतंय."

मिलिंदानं हे ऐकलं आणि त्याचं डोकं भडकलं, "म्हणजे माझ्याबरोबर राहणं तुला असुरक्षित वाटतं ? भीतिदायक वाटतं ? असं वाटत होतं तर लग्नच कशाला केलंस माझ्याशी ?"

"काय बोलताय हे तुम्ही डॉक्टर ? मी असं काहीतरी म्हणाले का ?" सुजाता म्हणाली, "तुमच्या मनानंच हवा तसा अर्थ लावताय ?"

"तुझ्या हिशोबाप्रमाणं मी रानटी आहे !" मिलिंद.

उगीच वाद नको म्हणून सुजातानंच बोलणं बंद केलं.

तिचं लग्न ठरणार होतं त्याआधीचं एक चित्र सुजाताच्या नजरेसमोर उभं राहिलं.

घरात धुण्याभांड्यासाठी येणाऱ्या रखमास सुजाताच्या आईनं विचारलं, "तू कोणत्या समाजातील ग रखमा ?"

"आई, तू तिला जात कधीच विचारली नाहीस." सुजाता म्हणाली, "आणि आजच का तसं विचारते आहेस ? गेल्या आठ-दहा वर्षात तू रखमाला हा प्रश्न कधीही विचारला नाहीस."

"अग, तीच सांगत असते ना, तिचा नवरा तिला सतत मारहाण करीत असतो म्हणून !" वासंतीबाई म्हणाल्या.

"मी बुद्ध समाजापैकी हाय बघा !" रखमा म्हणाली, "आमच्यात रगड मारझोड होते. त्येनं आमचंबी अंग जरा हलकं व्हतं. जरा तरारल्यागतबी वाटतं. आमच्यातलं शिकल्यालं नवरं मातुर वरान-भात खाल्यागत आजकाल आळणी वागायला लागल्यात ते निराळं !"

आणि रखमा पुढं म्हणाली, "माजा मालक मारतो, पन जीव लावायला नंबरी माणूस हाय हां ऽ."

सुजाताला रखमाची आठवण झाली. ती उगीचच गांगरून गेली आणि सुखावलीसुद्धा. रखमासारखीच.

एक गोष्ट खरी होती. डॉ. मिलिंद रागात होता. अलीकडे सुजाताला घेऊन पुण्याला जाणं, त्यानं बंद केलं होतं. साध्यासाध्या कारणावरून तो सुजाताला बोलत होता. तिचा राग राग करीत होता. काल तर त्यानं कहरच केला.

जेवता जेवता तो म्हणाला, "आई, हा स्वयंपाक कुणी केलाय ?"

"का रं डॉक्टर बाळा ! काय झालं ?" जनाबाईंनी विचारलं, "तुझ्या बायकोनंच केलाय !"

"काय झालं? ह्याला काही चव आहे का?" मिलिंद म्हणाला, "त्यापेक्षा आमच्या हॉस्पिटलमध्ये पेशंटना चांगलं जेवण देतात. एक तर शिकत असताना त्या होस्टेलमधलं बेचव, अळणी खाण्यात चार-सहा वर्षं गेली आणि घरातही आता तीच चव!"

"अरे, पण एवढं काही जेवण विघडलेलं नाही."

मिलिंद पुन्हा म्हणाला, "आई, तू तरी चांगलं आणि झणझणीत स्वयंपाक करायला शिकवत जा."

"अरे, मी सांगते-शिकवतेच की!" जनाबाई म्हणाली, "न्हाय जमत एखाद वक्ताला!"

"बघा बुवा, नाहीतर मी पुन्हा एखाद्या लॉजिंग-बोर्डिंगमध्ये जाईन!"

"जा ना मग?" सुजाता हसत म्हणाली, "तिथं कसं वाटतंय ते तरी पहा!"

ह्या सहज बोलण्यानं मिलिंद एकदम भडकला, "पाहिलंत? तुम्ही दोघांनी तिला लाडावून ठेवल्याचा हा परिणाम! मलाच माझ्या घरातून जायला सांगतेस? घर काय तुझ्या बापाचं आहे?"

असं म्हणून मिलिंदनं सुजाताच्या दोन थोबाडीत ठेवून दिल्या.

मागेही मिलिंदनं सुजाताला असंच केव्हातरी मारल्याचं गुरुजींच्या कानावर होतं. त्यांना राहवलं नाही.

"अकारण त्या पोरीवर हात टाकतोस आणि तेही माझ्यासमोर?" असं म्हणून गुरुजी मिलिंदच्या अंगावर धावून गेले. एक फटकाही त्यांनी ताणला.

जनाबाई मध्ये पडल्या आणि म्हणाल्या, "तुला सवतं व्हायाचं असलं तर खुशाल व्हा दोघं! रामाचं राज्य करा राजाराणीसारखं! पण फुका मारझोड कशासाठी?"

"मीही तेच म्हणतोय!" गुरुजीही उसळून बोलले; "नको असतील बाकीचे तर खुशाल निघून जा!"

"आत्ताच घर घ्यायला माझ्याकडं पुरेसे पैसे नाहीत." मिलिंद म्हणाला, "पण येत्या चार-सहा महिन्यांत मला हॉस्पिटलचीच एक क्वार्टर मिळणार आहे. थोडा दम धरा. चांगल्या पाच खोल्या आहेत."

हे ऐकून सुजाताला कसंतरीच वाटलं.

ती मनात विचार करू लागली.

ह्या घरातली माणसं आपली आहेत. गुरुजी अल्पशिक्षित असूनही विचारी आहेत. शिक्षणाचा गंध नसलेल्या सासूबाई प्रेमळ आहेत. दोन्ही दीर शांत आहेत. मग हे घर कशासाठी सोडायचं? आणि सोडलं तर तिथं आधार कुणाचा राहणार? ती खिन्न झाली.

सगळी खिन्नता, उदासीनता झटकून सुजाता म्हणाली, "तुम्हांला खरंच पाच खोल्यांचं घर मिळणार आहे?"

"मग मी खोटं बोलतोय का बढाई मारतोय!" मिलिंद म्हणाला, "मग तरी येशील ना माझ्याबरोबर?"

"हो...जरूर! का येणार नाही?" सुजाता म्हणाली, "मी एकटीच नाही. ह्या सगळ्यांसहित, गुरुजी, सासूबाई, दीर यांच्यासहितच तिथं जाऊ. एकूण पाच खोल्या असल्यामुळं आपल्याला 'प्रायव्हसी' साठी एक खोली राखून ठेवू. मग तर झालं?"

सुजाताचं बोलणं ऐकून गुरुजी व जनाबाई तिच्याकडे कौतुकानं पाहत राहिले. आणि मिलिंद सुजाताच्या ह्या 'सामुदायिक प्रायव्हसी' चा आपल्या मनाशीच अर्थ जुळवायला लागला.

□ □

**ही दिवाळी आणि नूतन वर्ष महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सर्व सदस्यांना आणि हितचिंतकांना सुखाचे आणि समृद्धीचे जावो, ही शुभेच्छा!**










दलित कथा स्पर्धा : पहिले बक्षिस

# उष्टी पत्रावळ

## के. व्ही. सरवदे



लाडा-कौतुकानं वाढत आपरुकानं नुकताच यौवनाच्या उंबरठ्यावर प्रवेश केला होता. आई-वापाच्या पोटी तो बऱ्याच वर्षांनी जन्मली होती. तिच्या पाठीवरची चार-पाच मुलं दगावली होती. अखेर वसंताचा जन्म होऊन तिच्या आईचा झाडा झाला होता !

अलीकडे बाप आक्षी वाजंतच खिळून राह्यचा. आतल्या गाठीचा तो, बायको-मुलाजवळ अगर अन्य कुणाजवळ काय झालंय, काय दुखतंय याचा अजिबात उलगडा करायचा नाही. त्याला भावकीच्या माणसाकडून विषबाधा झाली होती. कारण तसं मामुलीच होतं. भावकीचा माणूस बाहेर गावाला गेल्यामुळे पाटलानं त्याच्या मुलाच्या लग्नातील लाकडं फोडण्याचं काम आपरुकाच्या बापाला सांगितलं होतं. त्यानं गाड्या दोन गाड्या सरपण फोडलं होतं. लग्नातील बुक्ती-पुरीभाजी असे गोडधोड पदार्थ आपरुकाच्या बापानं टोपल्यानं भरून आणलेलं त्याच्या भावकीच्या माणसानं, गावाहून आल्यानंतर पाहिलं होतं.

"माज्या पाटलाचं काम त्यानं का केलं आन् टोपल्यानं वाढून कसं आणलं ? त्याला जे मिळालं ते मलावी मिळालं नसतं का ? चार घास माज्याबी लेकराच्या तोंडात गेली नसती का ?"असं म्हणून त्यानं मनात डूक धरली आणि त्याचा कायमचा काटा काढण्याचं ठरवून तसं केलं होतं. विष काही काळ राहणारं होतं. साऱ्या शरीरात ते भिनल्यावर तो 'अशाला असं झालं' म्हणाला. मोप जाणते दाखवले, क्षयरोग असेल, म्हणून आंब्याच्या दवाखान्यात नेले; परंतु इलाज होऊ शकला नाही.

एके दिवशी हातात 'जाड कागद घेऊन आनंदाने उड्या मारत आपरुका घरी आली.

"बाबा बाबा, मी पास झाले !" आनंदाची भरती येऊन खाटंमध्ये पडलेल्या बापाला ती सांगत होती, "हे बघा प्रगतिपत्रक दिलंया गुरुजीनं. आणखी मला म्हणाले की, तू पहिल्या नंबरमधी पास झालीस–"

"अरे वा वा ! बघू बघू–" उताणा पडलेला तो कानवडा होऊन उठण्याचा प्रयत्न करीत म्हणाला. प्रगतिपत्रकावर एक भावडी नजर त्याने फिरवली आणि तिच्या आनंदाला उत्तेजन देत तो पुढे म्हणाला,

"आता माजी वागीन कोणच्या वर्गात गेली मनावं ?"

"सातवी पास झाली नव्हं का ? सातवी पास झाल्यावर कोणत्या वर्गात जाईल ?"

"कोणत्या वर्गात जाशील ? आमा आडाण्याला काय कळालंय त्यातलं वा ?"

"सातवी पास झाल्यावर आठवीत जाणार नाही का ? एवढं सल्पं नाही कळत का तुमाली ?"

"हां, आस्सं का ? आलं ध्येनात आता." असं म्हणून तो खळाळून हसू लागला आणि हसता हसता म्हणाला, "तुमच्या सरकी साळ आमच्या कुटं बापानं शिकवली वं ते कळायला ?-न्हायलो आडाणी चोट, अंगुटा बहाद्दर !" तो किती तरी वेळ हसतच राहिला.त्याच्या हसण्या मागचा मतलब मात्र तिला कळू शकला नाही.

"बेटा आपरुका, जरा इकडं ये–" आईला ही बातमी सांगण्यासाठी व प्रगतिपुस्तक दाखवण्यासाठी ती त्याच्यापासून जरा दूर झाली होती. गंभीर होत तो तिला म्हणाला,

"ये इतं, माज्याजवळ वस जरा–तुजी माय गेली कैकी पाण्याला, यील आता–"

ती जवळ येऊन बसताच तो तिच्या डोक्या-पाठीवरून मायेनं हात फिरवू लागला. तिचे हरिणीसारखे डोळे, इंद्रधनुष्यासारख्या भुवईच्या कमानीत मोठे विलोभनीय दिसत होते. नाकातील चांदणी मुंडीच्या हालचालीसरशी चमचमा चमकत होती.

भुंग्यानं लाकूड पोखरून काढावं तसं त्याचं सर्वांग पोंग झालं होतं. तिचे निरागस अन् अल्लड वागणं पाहून तो मनाशीच म्हणाला, "वसंता का कसाबी



अनुक्रमणिका

वाढंल. त्याला कसला मनून ढका लागायचा नाही. पुरुषाच्या जातीला कसलं आलं भेव ? हिम्मतीनं जगंल वाढंल. पर माज्या परभारी माज्या या लाडकीचं कसं व्हईल ? मालकिनीला तर कुणाचा धुरा अगर शेत ठाव नाही की कुणाच्या धुऱ्याला ती कदी गेली नाही. पाठीवरच्या भल्या मठ्ठ्या आवाळूनं जेरबंद असतीया... आपरुका उपवर व्हवून नांदत्या घरी जाई पातोर तिला कोण वघंल ? आपून तर असे गारद झाल्याले, आज हावूत उंद्या नावूत..." भावनेचा कल्लोळ उसळी मारून वर आला, तेव्हा त्याने आपरुकाच्या लांबसडक वेणीचे झुपकेदार गोंडे हाताच्या ओंजळीत घेतले आणि त्याचे तो बेभानपणे पटापट मुके घेऊ लागला...एकेका अश्रूला वाट मोकळी करून देऊ लागला...

एके दिवशी वेदना असह्य झाल्यानं ठिसूळ झालेल्या त्याच्या कुडीतून प्राण केव्हा निघून गेला हे कळाले देखील नाही--

पोट हातावर आल्यानं आपरुकाची शाळा सुटली. रोजीरोटीसाठी तिला निंदणी, कापूस, शेंगा तोडणी, ऊस साळणी, यांसारखी कामे करावी लागत. प्रसंगी विहिरीच्या खोदकामासाठी गड्यांच्या हाताखालची कामेही ती नाकारत नसे. कामाच्या रगाड्यामुळं तिच्या अंगाची रतिमा काळपट पडत चालली असली तरी यौवनाचा अंमल कालक्रमाने तिच्यात निसर्गत: वाढत होता, त्याची कळत नकळत जाणीव तिला होत होती.

अशाच आघाताने आपरुकाच्या सर्वस्वाचा नाश झाला होता. तो प्रसंग आठवला म्हणजे तिच्या जिवाचा थरकाप उठत असे. त्या दिवशी सोमवार होता. मायीला बाजाराला जायचं होतं. जाताना ती आपरुकाला म्हणाली,

"आपरुक माय, त्या नारायण वापूच्या मिरच्या खुरपायचं गुत्त म्या घेतलेवा. बाजाराला घा रुपयं उचलबी घेतलीया. तू आन् वसंत्या मिळूनशान जेवढं व्हईल तेवढं खुरपा--बरं का रं वसंत्या, म्या काय सांगालेव ते आयकालास का ?"

"हं आयकालाव सांग, काय सांगतीस ते--" वसंता विळधानं लाकूड तासीत बोलला.

"आक्कासंगं जायचं. तिला हां हूं करून खुरपू लागायचं--म्या गेले की लगुलग परततेच. येताना माज्या बाबाला ह्याव-भजं झालं तर फुटाणंबी आणते खायाला--"

"आन् मटन नाही का आणणार ?" वसंताने मुद्दाम आठवण दिली.

"उरलं पैसं तर ते बी आणीन--"

"नाही बाबा, आपणाला ह्याव भजं आन् फुटाणं का टटाणं नग. ते नाही आणलं तर चालंल, पर मटन आणतु मन्लीच, तरच आक्कासंगं जाईन हां ! नसता जाणार मनून नाही. तुला सांगून ठिवतु आदीच--"

"बगीन बगीन--" मोटार आली म्हटल्यानं तिन बोचकं उचलत उत्तरं दिलं.

"बगीन नव्हं, इतं आणावंच लागतया न--" त्यानं आग्रह धरला, "किती दिवस झालं बरं तू मटन आणून ? लोक जर बाजाराला आणत्यात, तू कवा तरी उगं आणीत जा--"

"लोकांचीच बरुबरी आक्षी करतुयास बाबा तू ! लोकांच्या लेकरायला बाप हैत; करते सवरते भाऊ हैत, मिळवतेत, खातेत. त्यांची कशी बरुबरी करता येईल बरं आपल्याला ?" बोलत बोलत ती रस्त्याला लागली. जाताना पुन्हा पुन्हा जाण्याची ताकीद त्याला ती देत होती.

माय बाजाराला गेली. ही बहीण-भाऊ मिरचीच्या वावरात येऊन खुरपण्यात दंग झाली. संध्याकाळ होत आली होती. अचानक नारायणवापूचा भाऊ सखाराम बापू तेथे प्रगट झाला. तो शेतातील कसलंच काम न करता खुशाल चेंडूसारखा राह्याचा. गावात कुटाळक्या करायचा. नाही नाही त्याचं भांडण उपस्थित करायचा. एखाद्याची बाजू उचलून धरून खायला मिळेल तोवर तडीला न्यायचा आणि काही मिळेनासं झालं की त्याला वाऱ्यावर सोडून दुसरं एखादं बकरं गाठायचा ! पाटर्या झोडायचा, नाच गाणारिणीच्या फडात जायचा. दौलतजादा करायचा. धिप्पाड शरीराचा, तोंडावर देवीचे अनेक व्रण होते. त्याचे डोळे हमेशा लालबुंद दिसायचे. त्यामुळे त्याच्याकडे पाहणाऱ्याला तो अत्यंत आडदांड, उग्र आणि भेसूर दिसायचा. आपरुका एकेका धाटाला खरडा घालत, तासात कुठं गवत असेल तर उपटून काढत, हळूहळू पुढे सरकत होती. वसंता बराच मागं पडला होता. नोकरीचा गडी बैलांना चारण्यास वरच्या खरबाला गेला होता.



अनुक्रमणिका

"काय गं आपरुके!" आपल्या नावानं अचानक आलेल्या हाकेनं ती दचकली.. किंचित भेलकंडत तो तिच्या रोखानं येत होता. त्याच्या डोळ्यांत एक प्रकारची धुंदी संचारली होती. त्याच्या आगमनानं तिची छाती फकफका उडत होती.

"अगं तुमी दोगंच कसं आलाव? माय कुटं गेली तुजी?" अगदी समोर येत त्यानं तिला प्रश्न केला.

"राजूरला गेली बाजाराला—" एकाच जागी बसून खुरपं न चालवता ती तुटक बोलली.

"आरंऽ ए पोऽरा. ये इकडी. न्हावू दे तुजं खुरपणं—" वसंताला त्यानं हुकूम फर्मावला. वसंता भीत भीत दवकत जवळ येऊन उभा राहिला.

"आरं, हुरडा भाजून खाऊत आपून. त्याऽ तिथं खरबाला सावळ्या वैलं राकतुया; त्याच्याकडं इस्तू असंल तर घेऊन ये. जा पळ—"

त्याच्या भीतीमुळं म्हणा, अगर आज्ञापालनामुळं म्हणा, तो तेथून सटकला. तो दूर गेला असं पाहून आपरुकाला म्हणाला,

"आगेऽ ए टवळे, न्हावू दे खुरपणं तुजं! दिवसभर खुरपून खुरपून हात दुकत असतील! जरा इश्रांत घे— चल कोटयात—"

"कशाला?" त्याचा मतलबी डाव ओळखून ती म्हणाली. खरं तर त्याच्या तावडीतून कसं निसटावं अन् पळून जावं याचा ती विचार करीत होती.

"अगं, तिथं बसून आपून मऊचा हुरडा खाऊत. वाटलं तर निजूत. मन्ता तुजा-माजा शीणवी उतरंल!" हा हा करून तो प्रचंड हसला.

ती काहीच न बोलता जागच्या जागी हिव आल्याप्रमाणे लटलट कापत होती. तो खांबासारखे पाय रोवून उभा होता.

"चल की गं फोकणे! उधळ भवाने!" ती हालत नसल्यानं तो तडकला, "तुला मी गोडीनं सांगालाव, तर समजंना कसं झालं मनावं? नाही तर बळजबरीनं उचलून न्यावं लागंल मला—" त्यानं तिच्या दोन्ही खांद्याला गदगदा हालवून आक्रमक पवित्रा घेतला.

"मला ते साफ जमायचं नाही बगा बापू—" त्याचे हात झिजाडत ती फणकारली, "सांगून ठिवते— मी तुमच्या लेकीच्या वयाची. असं वागणं तुमाला शोभतं का?"

"तुज्या मायीचा...आतां पस्तोर या बापूला कुण्याच छिनाल रंडीनं नाकारलं नाही, आन् तू दीडदमडीच्या घेडाची कार्टी असून, तुजी ही मिजास! बोल, तुला आखिरीचं निक्षून सांगतो, तू बऱ्या बोलाणं येणारायचं का नाही?"

"नाही—" तितक्याच कठोरपणे तिने प्रतिकार केला. बऱ्या बोलानं ही मानत नाही हे दिसताच तो शेळीवर लांडगा पडावा तसा तुटून पडला. ती जीव तोडून त्याचा प्रतिकार करीत होती. दोघांचीही झटापट चालली. त्याने खसकन् तिचा पोलका ओढून फाडला. तिनं लज्जेनं दोन्ही हातानं आपली छाती झाकण्याचा प्रयत्न केला. त्याचा हात कासोटयाकडे गेला. तोही ओढून बाहेर काढत होता. पण तिने आडीपाय देऊन सारं शरीर घोरपडीसारखं घट्ट दावलं. त्यानं तिला अलगद वर उचललं. ती हातपाय झाडू लागली. त्याच्या छातीवर बुक्क्या देऊ लागली. एक जोराचा कडकडून चावा घेतल्यानं त्याने तिला खाली टाकले. ती ठो ठो बोंबलत शेताशेतानं पळू लागली. त्याने तिच्यामागे धाव घेतली. धाप लागताच त्यानं तिला पुन्हा पकडलं. खाली पाडून तो तिच्या उरावर बसला. ती त्याच्या जबरदस्त मगर मिठीत गलितगात्र झाल्यानं त्यानं त्याचा अघोरी आनंद पुरा केला...बऱ्याच वेळानं ती कण्हत उठली. उठून बसताच तिनं इकडं-तिकडं पाहिलं. जवळ कुणीच नव्हतं. त्याचं काम संपताच तो तेव्हाच तिथून पसार झाला होता. रक्तानं तिचं चिंध्या झालेलं लुगडं भिजून गेलं होतं. एखाद्या वादळानं गलबताचं शीड फाटावं त्याप्रमाणे तिचं लोटकं फुटून चुराडा झालं होतं. उठता येत नसतानाही ती धडपडून उभी राहिली. मांड्यापिढऱ्या आणि पायावर रक्त ओघळत खाली आलं... झावळ पडत चालली होती. थोड्या वेळानं वसंता बाजाराहून येणाऱ्या माईला घऊन तिथं आला होता—

...त्या वेळपासून आपरुकाची काया सुकून गेलेल्या फुलासारखी झाली. तिचा सारा आनंद खुडून नेला होता— ती झोपेतून जागी झाली; तरी बराच वेळ अंथरुणावर पडून होती. तिच्या नजरेसमोर सारखा तिचा बाप दिसत होता. तो जर का आज असता, तर मी कशाला त्या उचल्याच्या शेतात गेले असते? अन् शरीर भ्रष्ट का झालं असतं?...बेअब्रू झाली नसती, अगर खाली मुंडी घालायची वेळ आली नसती. खरं तर टुचभर

पोटाच्या आगीनंच आपणांला दगा दिला...माणसातून उठविलं...नासलेलं शरीर का आता घुतलं जाईल ?...

"आगं वाई आपरुका, उठणार हायीस का नाही मनाव आज ?" मायीच्या ओरडण्यानं तिची तंद्री भंगली.

"उठावं, आण-पाणी पोटात घालावं, जरा हिंडावं, बोलावं वसावं–" माय समजावणीच्या सुरात बोलत होती, "कुटवर अशी चितागती वसून झुरत ऱ्हाणाराहीस?"

"माय माजे, कशी पोटात आण ढकलू मन्तीस ? पोटात नुस्ता डोंब उसळलाय..." अत्यंत विव्हळ होऊन ती पुढे म्हणाली, "माजा वाप असता, तर तू रांडेनं कशाला त्या सैतानाच्या शेतात मला धाडली असतीस? आन् त्यानं तरी कशाला माज्या जीवनाचा सत्यानास केला असता ? लागल्याला डाग आता कसा घालवू ?"

"बाई, तुजं कायी मला कळत नाही का ? परी भोग लागलाय इस्वामित्रासरका पाठीमागं, त्याला काय करावं ? ते कायी चुकणाराय का ? ऊठ. दोन घास घाल पोटात. किती दिवस झाले गं आणाचा कणवी नाही की पोटात..."

"आ मना भाऽभी ! काय करती आपरुका ?" तेवढ्यात बाळातात्या ओरडत आला.

"हिंग या वंऽय् भावजी, इकडी. तेवका अजून उठलीच नाही झोपेतून–"

बाळातात्या आला म्हणताच मोठ्या मुस्कीलीनं ती उठून वसली. तो आत येऊन वसला.

"काय मन्तीया आपरुका ?"

"अवं ही आणाला मनून शिवनाच झाली की. आक्सी डोस्क्यात तेच येड घेऊन बसल्याय–"

"त्याच्या सात पिढ्याला ध्यान राहील असं म्या केलाव. उंद्या बग तू त्याला हातकड्या घालून नाही साऱ्या गावातून वरात काढली तर माजं नाव बदलून ठिव !"

"ते व्हईल न व्हईल, पण माजी गेल्याली आब्रू का परतून येईल ?"

"एवढं मनांला लावून का घेतीस तू, आपरुका ? त्या हरामखोरानं तुज्यावर अत्याचार केला, त्यात तुजा कायी दोष तर नाही ना ? हां, तुजी त्याला साथ असती, तर आमच्या तोंडाला काळिमा फासली असती. तू निरदोष हायीस. बेगुनागार हायीस– आता तुजी मिडीकल तपासणी तर झालीयाच, केस कोरटात घालू आन् सरकारी वकील मागू, तवा त्याची फ्यॉ फ्यॉ उडंल !"

निकाल लागेल तेव्हा लागेल, मात्र सखारामबापू पाण्यासारखा पैसा ओतून जामिनावर सुटला आणि ढाण्या वाघासारखा फिरत होता. आपरुकाची इज्जत वेशीवर टांगल्यानं त्या टापूत तिच्या नावाचा चांगलाच बोलबाला झाला होता. सुखासुखी कुठं सोयीरसंबंध जुळेल अन् तिच्या संसाराचा गाडा व्यवस्थित चालेल, याची सुतराम शक्यता नव्हती. तिचं तिला शरीर फिद फिद नासून आत किडे हासाडघा पडल्याची तिला जाणीव होत होती. जीवनातला खरा अर्थ संपल्यानं ती जिवंत असून नसल्याप्रमाणे राहत होती. कधी कधी तर तिचा तिला इतका वैताग येत होता की, एका झटक्यात जिवाचा अंत करून थंडगार पडावं असं वाटायचं...

...चौदा एप्रिलचा तो दिवस. कांचन इतर पाहुण्यांबरोबर स्टेजवर लोडाला टेकून बसला होता. बाळघातात्यानं मुद्दाम या पाहुण्याला-व्याख्यानाला बोलावले होते. एक तर या नेत्यामुळे गावावर वचक बसावा आणि भोळघाभावड्या अज्ञजनांच्या कानी दोन चांगले शब्द पडावेत, असा त्यामागील बाळातात्याचा मनसुबा होता. बाळातात्यानं आपरुकाला स्वागताला आणि प्रार्थनेला पुढे केले होते. प्रार्थना धीरगंभीर स्वरात गात असताना आपरुकाच्या चेहऱ्यावर निर्मळ, सतेज आणि सात्विक भाव विलसत होते. तिच्या चढउताराच्या आलापाची विलक्षण छाप पाहुण्यांवर पडली होती. विशेषत: तिचा नितळ, शांत अन् सोज्ज्वळ स्वभाव कांचनच्या नजरेत भरला होता. सभा संपताच खाजगीत आपरुकाबद्दलचा विषय निघाला. ओघानेच बाळातात्यानं तिची कर्मकहाणी त्यांच्यापुढे कथन केली.

"मंडळी, ती आता बेसारा, परदेशी, निरलाजरं जिणं जगती–" नि:श्वास टाकून बाळातात्या म्हणाला, "त्या हरामखोरानं तिला जीवनातूनच उठविलं. ही कसल्या आपत्तीची कुऱ्हाड कोसळली मनून ती आतल्या आत रोऽज कुडती. तिला लगीन करून घ्यायला कुणीवी बिचकतं बघा ! पोरीचं लईच वाटुळं झालं–"

"विकास, मला एक कल्पना सुचली आहे–" बाळातात्याचं बोलणं संपताच कांचन आपल्या साथीदारांना उद्देशून म्हणाला, "टु बी मोअर फ्रँक, अगदी स्पष्टपणेच

बोलतो. हा नाना सोडला, तर आपण तिघं-चौघंही अविवाहितच आहोत ना?" हा प्रश्न टाकून तो उत्तराची वाट पाहू लागला–

"हं, बोल ना रे. थांबलास का?"

"–तर माझं म्हणणं असं की, आपणांपैकी कुणीही एकानं तिच्याशी विवाह करावा– आहात का राजी?"

"वा! कांचनसाव वा! आपून मानलं बुवा तुम्हांला!" बाळातात्या त्याच्या कल्पनेला उचलून धरत उत्स्फूर्तपणे उद्गारला, "हरेकांनी तिच्यात आपली बहीण बघावी. उंद्या आपल्या बहिणीवर मना, अगर लेकीवर मना अशीच वेळ आली समजा तर तिला आपून टाकून दिऊत का? मायीच्या मांडीवर लेकरू मुततय् हागतंय् तवा मायीनं का मांडी कापून बाजूला करावी? इथं तिनं तसंबी केलं नाही. परिस्थितीची शिकार झालीया. आता आपल्याच माणसानं कुणीतरी धीर करून तिला माणसात बसविलं फायजेल– तिला जगण्याची आशा दिऊन तिच्या जीवनात सुगंध पेरला फायजेल–"

कांचनखेरीज इतरांच्या चेहऱ्यावर तिरस्काराचे भाव प्रदर्शित होत होते. कांचनच्या डोक्यात मात्र खळबळ माजली होती. तो याच विचारात गढून गेला होता.

"काय कांचनसाव, तुमीच इषय काढला आन् आता गप गुमान का बसलाव? बोला ना?"

"ऑं?" तो भानावर येत पण निर्धारानं म्हणाला, "सर्वांचीं याला ना असेल तर माझी याला तयारी आहे–"

"आपरुका, एऽऽ आपऽरुक, वेटा आपरुऽका. अवो मनाभाऽभी इकडं या–" हर्षवायू झाल्याप्रमाणे बाळातात्या ओरडला, "अवो, आदी च्याला आदन ठिवा आन् त्याच्यापाठुपाठ पुरणालांबी आदन ठिवा–"

मतलब न कळाल्यानं मनाबाईनंच बाळातात्याला बैठकीतून बाहेर बोलावलं आणि त्याच्या बोलण्याचा उलगडा करून घेताना ती त्याला म्हणाली,

"अवं तिनं लगनाचा मनून इषय काढू देत नाही, त्याचं कसं?"

"अहो भाभी, तुमी येड्या का खुळ्या हाव? तेचं कसं पुना पुना रिकार्ड लावून बसलाव हो? इनासायासं स्थळ चालून आलंया मदीच पाचवा पाय काढू नका वरं– हूंन जाऊ द्या–"

"नाही, तवा जळून बायकू मेली व्हती, त्यो बात्रा नव्हता का आला? त्यानं राजी झाल्ता, परी कुणं त्याच्या डोस्क्यात भरविलं की, तयार झाल्याला गडी त्योबी गेला बिगडून. तवापसून तिनं लगनाचा नाद सोडून दिलाया, त्याचं कसं म्या मन्ते?"

"तिची वायला, काय करावं बावा ह्या पोरीला? तेच पालुपद हाय का तिचं अजून?" कपाळावर हात हाणून घेत वाळातात्या उद्गारला, "सोन्यासरके सोयरं आपून व्हवून गोष्ट काडतेत, तर काय जातंया आपलं? कायबी करा भाभी, तिला फिस्कून एक वसू देऊ नका. कसंबी करून राजी करा– अहो, समदा उलगडा म्या करून त्यांना सांगलोया–"

"वगा माय तुमी चुलते–पुतणी. चांगलं झालं, तर बरंच झालं की वं. नकु मनून कसं चालंल?"

...पुढे कांचन येत जात राहिला. घसट वाढत गेली. पण तिचा ताठरपणा काही लवकर विरघळला नाही. तिला वाटायचं हा मजेखातर हो म्हणील आन् मजा निवली म्हंजी भिरकावून दिल्यास त्या आपादादाचं काय घ्यावं?...

"आपरुक, मी तुझी इतकी आळवणी करीत असतानाही तू माझी मागणी का ठोकरतेस? का? तुझा मतलबच मला कळत नाही–" त्याने तिला एकांतात विचारले, "का माझ्यावर तुझा विश्वास वसत नाही? हे सारं का खोटंखोटंच वाटतंय तुला?"

"तसं नाही वं–"

"तसं नाही तर मग कसं? काय म्हणणं आहे तुझं ते अखेर कळू तर दे ना."

"........................"

"हे बघ, तुला मी वचन देतो–" त्याने तिच्या हातावर हात मारत म्हटले, "तुझा पूर्व इतिहास– म्हणजे झालं गेलं ते सारं चक्क विसरायला मी तयार आहे– तुला कोणत्या शब्दांत सांगू आपरुक? मी माझ्या आपल्या बाबासाहेब आंबेडकरांची शपथ घेऊन तुला हे सांगतो, तुझी मी कधीच फसगत करणार नाही, की कधी म्हणून अंतर देणार नाही. आलं का घ्यानात?"

"खरं सांगायचं म्हंजी, मला लगीनच करायची इच्छाच व्हत नाही वं– तुमीच काय, परी मी कुणा कुणासंगबी लगन करायाला धजणार नाही. नाही बगा!"



अनुक्रमणिका

"हत् वेडे ! एवढा जीव तोडून बोलतोय; तरी तुझं दगडासारखं कठोर मन पाझरायला थोडंदेखील तयार नाही ! काय म्हणावं बावा तुझ्या वागण्याला ? अगं, मी बाबासाहेबांची शपथ, अद्याप कुठंही घेतलेली नाही, ती तुझ्या-माझ्या भल्यासाठी घेतली. ती का तुला फालतूच वाटते ?...तुझ्या दुर्मुखलेल्या जीवनात साऱ्या विश्वाच्या सुखाचं राज्य पेरायला आलो आहे मी आपरूक ! खोटं नाही सांगत तुला. अगं वेडे, तू एका प्रहारानं एवढी उदास झालीस. आजपर्यंत असे हजारो वादळाचे तडाके आपल्या पूर्वजाने खाल्लेले आहेत. त्यांनी कधीच असा निराशेचा सूर काढला नाही. त्याचा प्रतिकार करूनच ती जगत आली ना ?"

...यथावकाश त्या खुरटलेल्या खोडावर स्फुल्लिंग पेटवीत गेल्यानं त्याला अंकुर फुटले. ती हसू खेळू-बोलू लागली. अखेर ती लग्नाला राजी झाली. लग्न साध्या पद्धतीनं पार पडले...

या लग्नाच्या उलट-सुलट प्रतिक्रिया उमटल्या. कांचन आणि आपल्का सुखावली. मात्र एकांतात त्याला वेगळाच अनुभव आला. तिनं त्याला जितकं उत्तेजन द्यावयास हवे तितकं तिच्याकडून मिळत नव्हतं. तो चिडून तिचा कडकडून चावा तर घेई, बोचकारे काढी अथवा जोराची ढुसणी देई. मार लागलेल्या जागेतून बारीक कळ निघू लागली म्हणजे कळवळून ती ओरडत, बोंबलत,

"अग माऽय मेले मेलेऽगऽय...आता कसं कऽरू ?"

त्याचा राग अनावर होऊन वदावद जे हाती लागेल त्यांनी तिला तो बडवी, लाथा झाडून तिला दूर करीत म्हणे,

"तुझ्या अंगावर पेट्रोल ओतून पेटवलं, तरच तू पेटशील भडकशील. अन्यथा निव्वळ थंडगार बर्फासारखं शरीर तुझं ! कुठून मला ही बुद्धी सुचली अन् तुला पत्करलं–"

"कुणी गूळखोबरं घेऊन आलं नव्हतं, आन् करून घ्याच मनून कुणी गळ घातली नव्हती–"

"चल हो माझ्या घराच्या वाहेर–जा कुठंही बोंबलत. क्षणभरही थांबू नको या घरात. अशी थंड रक्ताची आहेस म्हणून मला तरी काय ठाऊक ?" तिला घराबाहेर ढकलण्याचा तो प्रयत्न करायचा. ती खुतून दरवाज्याजवळ बसायची आणि विलाप करायची, म्हणायची,

"वाफ जिरल्यानं मला आता नाव बोटं ठिवतुया. याच्या करताच बावाला नकु मनत व्हते, तर मठ्ठा लाळ घोटू घोटू पुढी सरकत व्हता. मला रांडंला कळालं नाही, ह्याला होकार देऊन बसले. नासका–कुजका देह आपला उष्टया खरकटया पतरावळी सरका...कुठंबी वाऱ्यावर उडत गेले असते, तर परवडलं असतं, परी या वाघाच्या जाचात आडकायाला नकु व्हतं...अवघड जागी कुटं लागलं आन् कायी मन्ता कायी झालं तर तुजं काय घ्यायचं व्हतं बावा ! माजं दुःख कोण वाटून घेईल आता ? कुठं जावू मन्ता थंड गारवा मिळंल मला ?" ती अश्रूंच्या पाटाला मोकळी करून दुःखसागरात बुडायची. तिच्या दुःखाची जागा हळूहळू त्याच्यातील करुणेची घ्यायची. तो तिला जवळ ओढायचा.

"सरक व्हय् तिकडी–" ती त्याला झटकून फणकाऱ्यानं म्हणायची,

"बावा, तुझी सारी कर्तुणूक गठुड्यात बांदून ठिवलेव मी. कुणा पुढी उघडून दावू आता ?"

बराच वेळ दुःख ओसरायचं नाही. ती जमिनीकडे सकून बघितल्याप्रमाणे विचारमग्न राह्याची. बसलेली जागा किती तरी वेळ सोडायची नाही की थोडीही हालचाल करायची नाही.

"अगं, चल पूस डोळे. वेडी का खुळी तू ? उगीच जीवाला लावून घेतेस. मी मेलो, तर तू मला मुकशील अन् तू मेलीस, तर मी तुला मुकेन. समजलीस ?"

हळूहळू ती ढेकळाप्रमाणे विरघळून जाई. ती स्वतः होऊन त्याच्या कुशीत शिरताच तिला थोपटीत तो म्हणायचा,

"शाब्बास शाब्बास, हुशार माझी राणी. अशी समजूतदार हो आन् मला फक्त साथ दे गं. मी तुझ्या खातर सारं जग विसरायला तयार आहे..."

"मला तरी तुमच्याखेरीज जगात कुणी कुणी नाही वं...व्हती माय तीबी पिकल्या पानासारकी गळून गेली. अंजाण भाऊ हाय, त्यो माजा कसा पाठीराखा व्हईल? तुमच्या–तुमच्याचसाठी फक्त मला जगायाचं हाय... मला असं दूर लोटू नका वं...सारं दोष माफ करून मला तुमच्या पोटात घ्या... मी धुतल्या तांदळासरकी हाय वं धुतल्या तांदळासरकी...आता झालं हे असं, त्याला मी तरी काय करू, काय करू ?"

असं किती तरी वेळा घडलेलं होतं. घडत होतं. त्यांच्या संसाराची गाडी रखडत रखडत चालली होती...

□ □

### महाराष्ट्र साहित्य परिषद

## साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी सांप्रतच्या कार्यकारी मंडळाने साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना यावर्षी हाती घेतली आहे. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता साहित्यप्रेमी जनतेने व्यक्त करावी, असे आवाहन यापूर्वीच करण्यात आले आहे. या आवाहनाला उत्तम प्रतिसाद मिळत आहे, हे नमूद करण्यास आनंद होतो.

दि. १३–१०–१९८७ पर्यंत साहित्य परिषदेकडे जमा झालेल्या देणग्यांचा तपशील याच अंकामध्ये देण्यात आला आहे.

या अपूर्व उपक्रमाचे महत्त्व आणि आवश्यकता ओळखून या निधीसाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी, अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल आणि देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

आपले

| शंकर पाटील | राजेंद्र बनहट्टी | गं. ना. जोगळेकर |
|---|---|---|
| अध्यक्ष | कार्याध्यक्ष | कोषाध्यक्ष |

राजा फडणीस, म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे
कार्यवाह



अनुक्रमणिका



दलित कथा स्पर्धा : दुसरे बक्षीस

# दि व्हिक्टिम

## भगवान कृष्णा हिरे



केबीनच्या दाराला हात लागताच झालेल्या आवाजाने तो क्षणभर भांबावला. गेली चार वर्षे अंथरुणावर पडून असणाऱ्या आपल्या बापाचे कण्हणे त्याच्या कानात घुमले. दार चार-सहा झटके देऊन शांत झाले.

"मे आय कम इन सर ?"

"हं. बसा."

"नो. थँक्यू सर." सर्टिफिकेट्स असलेली फाईल देण्यासाठी यंत्रासारखा हात पुढे झाला.

"नाव ?"—सर्टिफिकेट्सवर निष्काळजी नजर.

"गौतम रंगनाथ साळवे."

"शिक्षण ?"

"बी. कॉम."

"जात ?"—कपाळावर सूक्ष्म अठी.

"बौद्ध."—नको त्या प्रश्नाचे उत्तर.

"अनुभव ?"

"........."

"यू मे गो नाऊ."—बेलवर हात.

पुन्हा बाप कण्हल्यासारखा केबिनच्या दाराचा आवाज.

***

निराश झालेल्या पायाने तो रस्ता कापू लागला. बाजारात सोनं जरी महाग असलं तरीपण सूर्याने आपले सोनेरी कडक ऊन 'फ्री ऑफ चार्ज' ओकायला सुरवात केली होती. पण त्याचे त्याला भान नव्हते. तो पुढे चालला होता रस्ता मागे टाकीत. नेहमीप्रमाणे त्याने डाव्या हाताला वळण घेतले. थिएटरला वळसा देऊन तो शॉपिंग सेन्टरच्या बाजूने निघाला.

"गौतम, झालं कारे काम ?"—सायकलीच्या मागच्या चाकात हवा भरण्याचे थांबवून मोरेकाकांनी विचारले.

"नाही."—कोरडया ओठावरून जीभ फिरली. अन् तो चालू लागला.

"संध्याकाळी ये."—मोरेकाकांचा आवाज.

"हो."

"प्रयत्न चालू ठेव बाबा. आज ना उद्या..." तो दूर गेला होता. मोरेकाका कितीतरी वेळ त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहत होता.

"जरा जल्दी करो भाई."—गिन्हाइकाने आवाज दिला आणि तो पुन्हा हवा भरू लागला.

"चार वर्षे कॉलेज करूनही नोकरी मिळत नाही ह्या बिचाऱ्याला."

"नोकरी इतनी आसानीसे नहीं मिळती, चाचा."—गिन्हाइकाने दोन्ही चाकांची हवा तपासून पैसे दिले आणि सायकलवर टांग मारून निघून गेला.

रोज सकाळी किंवा संध्याकाळी तो मोरेकाकांच्या दुकानात येऊन त्यांना मदत करीत असे. मोरेकाका साठीकडे झुकलेले, हात भरभर चालत नव्हते. तो आला म्हणजे तेवढाच आराम मिळत असे. मोरेकाका त्याला नोकरी शोधण्यासाठी गाडीभाड्याला पैसे देत असे. कधी गिन्हाइकाची सायकल तर कधी चहापाणी. त्याला हे सारं नकोसं वाटायचं पण त्याचाही इलाज नव्हता. डांबरी रस्ता सोडून तो पाऊलवाटेने झोपडपट्टीत शिरला.

"क्यूं गौतम, आज भी नहीं मिली ना नोकरी ?" कचरूचा चिरका आवाज त्याच्या कानांत घुसला. त्याने फक्त नकारार्थी मान हलवली.

"सालं ! आपल्याला माहीत आहे. कितीही शिका पन जातीचं लेवल आपल्या आड येनार."

त्याने चमकून कचरूकडे पाहिलं.

"अरे ! आपल्याकडे पहा कसा पॉशमध्ये राहतो आपून. आय शप्पथ सांगतो तुला, आपल्याबरोबर ये. जिंदगी सुधारून टाकू. ह्या मतलबी दुनियेचा अनुभव आपून फार घेतलाय."

तो काहीच बोलत नाही. कचरू काय करतो म्हणून विचारावं, असं त्याला नेहमी वाटतं पण उगाचच तो आपल्याला चिकटेल ह्या हेतूने तो कचरूला टाळतो.

"पण मला कामाचा अनुभव नाही म्हणून कदाचित.."

"कामाचा अनुभव ?" सोडघाच्या बाटलीचं झाकण उघडावं तसं कचरू फसकन् हसला.

"कानाला जानवं बांधून मुतनाऱ्यांच्या जातीत जन्माला आला असतास ना तर विना अनुभवाचा तू साहेब झाला असतास."—कचरू.

इंटरव्ह्यू घेणाऱ्या साहेबाने 'जात' विचारताना त्याच्या कपाळावर पडलेली सूक्ष्म आठी त्याच्यासमोर विजेसारखी चमकून गेली.

"एक दिन जरूर आयेगा तू अपनेपास." कचरू पुढे गेला. कचरूच्या आत्मविश्वासावर तो भकास हसला. पण कचरू जाता जाता मात्र मनातल्या अनेक घड्यां-पैकी एक घडी कायमची उलगडून गेला.

तो झोपडीत शिरला तेव्हा बाप अस्ताव्यस्त कोपऱ्यात गाढ झोपला होता. नको तो भाग झोपेत उघडा पडला होता. त्याने पायाजवळ पडलेली गोधडी त्यांच्या अंगावर टाकली. आणि हातातली फाईल भिंतीवर असलेल्या डॉ. आंबेडकर आणि बुद्धाच्या फोटोमागे सरकवली. उकाड्यामुळं शर्टाचं ओझं वाटू लागलं होतं. त्याने शर्ट काढला. गार पाण्यानं आंघोळ करावी असं वाटूनसुद्धा त्याने तो विचार बाजूला सारला.

"भाऊ, ताई कुठाय रे ?"

"माहीत नाही."

धाकट्याने खांद्यावरचे दप्तर कोपऱ्यात फेकलं आणि चुलीजवळ जाऊन वाढून घेतलं. हात न धुता जेवायला बसलेल्या आपल्या धाकट्या भावाकडे पाहून त्याचा राग उफाळला.

"किती वेळा सांगितलंय, जेवताना हात धूत जा म्हणून."

"भाऊ, मला एक निबंध लिहून देशील ?" धाक-ट्याने सहज विषयांतर केले. त्याची ती हुशारी पाहून तो हसला.

"कुठला विषय ?"

"मोठं झाल्यावर कोण होणार ?"

"मी मोठा झाल्यावर डॉक्टर होऊन गोरगरिबांची विनामूल्य सेवा करीन." शालेय जीवनात लिहिलेल्या निबंधाच्या ओळी, मदाऱ्याच्या हातातली काठी पाहून नाचणाऱ्या माकडासारख्या त्याच्या डोळ्यांसमोर नाचू लागल्या. त्याचं त्यालाच हसू आलं. धाकट्याने जेवण आटपून ओला हात पॅन्टला पुशीत समोर पोरांत मिसळला.

"कधी आलास ?" वहीण धुतलेले कपडे घेऊन आत आली.

"आत्ताच."

"जेवलास ?"

"भूक नाही."

"का ? काम नाही झालं ?"

"नाही."—एक सुस्कारा.

"मी कपडे वाळत घालते मग तुला वाढून देते."

"नको."

"सकाळी एक कप चहावर गेला होतास. भूक लागली असेल."

त्याने कसंबसं अन्न गिळलं. घटाघटा पाणी प्याला. धाकटा पोरांत खेळण्यात गुंतला होता. चपला पायांत सरकवल्या आणि तो मोरेकाकांच्या दुकानाकडे चालू लागला. थकला होता तरी तो तिथं आला होता. दुकान बंद पाहून त्याच्या लक्षात आलं की मोरेकाका दुपारचं दुकान बंद ठेवतो. तो स्वतःशीच हसला. हल्ली वेळेचंसुद्धा भान राहत नाही. मग तो असाच इकडे तिकडे फिरत राहिला संध्याकाळ होईपर्यंत. घरी आला तेव्हा बाप उठला होता. त्याच्या खोकल्याने झोपडीच्या भिंती थरथरत असल्याचा भास त्याला झाला. चुलीजवळ आई, बहीण जणू शेकत बसल्यात असं त्याला वाटलं.

"सकाळचा गेलेला आत्ता येतोस व्हय ?"—बाप.

दुपारी आपण येऊन जेवण करून गेलो, तरी आपल्या बापाला त्याचा पत्ता नसावा ह्याचं त्याला दुःख झालं.

"नाही, दुपारीच आलो."

"मग."

"उद्या पुन्हा एका ठिकाणी जायचं आहे."

"कर बाबा काय तरी परयत्न, तुझ्या आयची कुतर-वढ मला न्हाय पाहवत."

"प्रयत्न ? मला काय हौस आहे अशी बेकार फिर-ण्याची?" का कोणास ठाऊक तो संतापला.

"नाय रं तसं नाय पन तू येवढा शिकलास..."

"तोच तर गुन्हा झाला." –पुन्हा संताप.

"आवं कशाला त्याला बोलताय. दमून भागून आलाय. दोन घास खाऊ द्या–" आईने प्रथम तोंड उघडले.

"आगं, मी तरी कुटं काय म्हनतोय..." खोकल्याची उबळ.

खरंच आपल्याला का नोकरी मिळत नाही? आपल्या जवळ कुणाचा वशिला नाही म्हणून, कामाचा अनुभव नाही म्हणून की आपल्या जातीमुळे? खरं तर भूक नसतेच पण आईला वाईट वाटू नये म्हणून तो जेवतो आणि आपलं अंथरूण झोपडीसमोरील अंगणात टाकून आकाशाकडे पाहत पडून राहतो. विचारांच्या जळवा त्याच्या डोक्यातलं तिळ तिळ रक्त शोषत असतात. बापाला टी. बी. झाला म्हणून नोकरीवरून काढून दिल्यापासून आई बंगल्यात जाऊन भांडी घुणं करते, घरात लग्नाला आलेली बहीण, धाकट्याचे शिक्षण. भकास नजरेने तो आकाशाकडे पाहत असतो. ढगांमध्ये फिरणारा चंद्रसुद्धा त्याला आपल्यासारखाच नोकरी शोधत फिरतोय, असं वाटू लागतं.

अंगावर पडणाऱ्या कोवळ्या सूर्यकिरणांनी त्याला जाग येते. रात्री आपण केव्हा झोपी गेलो हे त्याचं त्यालाच आठवत नाही. रात्री शांत असलेली झोपडपट्टीतली माणसं, पिठाच्या गिरणीत टाकलेलं धान्य भरभर जसं भरडण्यासाठी जात्यात जाऊ लागतं तशी तेथील माणसं त्याला सकाळी दिसू लागतात. आणि संध्याकाळी त्यांच्या शरीराचं पीठ झालेलं असतं.

.........

अनेक शंकांच्या भोवऱ्यात फिरत तो हातात फाईल घेऊन रस्त्याला लागलेला असतो.

"आज पुन्हा इंटरव्ह्यू का?" तो मागे वळून पाहतो. कचरू हसत पुढे होतो. "अरे! किती दिवस हेलपाटे मारत राहनार?"

"पण तुला कुणी सांगितलं की मी..."

"इंटरव्ह्यूला चाललोय म्हणून, असंच ना? अरे भिडू, हातातली फाईल बोंब मारते ना!" मोठ्याने हसतो.

तो संकोचून आपल्या हातातील फाइलीकडे पाहतो.

"छोड यार! आपून तेरे को आज भी बोलताय, आज नोकरी नाय मिळाली ना तर सरळ १०३ नंबरची बस धरून 'लालवत्ती' गल्लीत येऊन आपल्याला भेट."

"पण..."

"तिथं कुठल्याही पानवाल्याला आपलं नाव विचार. तो आपल्यापर्यंत पोहचण्याचा रस्ता सांगेल."

"पण आज आशा वाटते काम होईल म्हणून."

"फिर तो नो प्रॉब्लेम. लेकिन नहीं हुआ तो १०३ नंबरका बस और लालवत्ती स्टॉप नही भूलना." कचरू ज्या वेगाने बोलला त्याच वेगाने पुढे निघून गेला.

... .....

साहेब त्याचे सर्टिफिकेट्स पाहत होता.

"नाव."

सर्टिफिकेट्समध्ये नाव, शिक्षण, जात सर्वकाही लिहिलेलं असतानादेखील प्रत्येक जण तेच ते प्रश्न का विचारतात हे त्याला समजलं नाही. आता नाव विचारलं, मग शिक्षण, जात आणि अनुभव विचारतील, नंतर मग अनुभव नाही ना 'आपण जाऊ शकता' हे सारं त्याला पाठ झालं होतं.

"नाव?" पुन्हा तोच प्रश्न विचारल्याने तो विचारातून जागा झाला.

"गौतम रंगनाथ साळवे, शिक्षण– बी. कॉम., जात– बौद्ध, कामाचा अनुभव नाही." त्यानं एका दमात आपला परिचय करून दिला. साहेब त्याचा चेहरा न्याहाळीत होता.

"कामाचा अनुभव नाही मग..."

"पण सर, काम मिळाले तर अनुभव येईल ना?"

"दॅट आय डोन्ट नो, बट वुई रिक्वायर एक्सपीरियन्सड् हॅन्ड."

"कानाला जानवं बांधून मुतणाऱ्यांच्या जातीत जन्माला आला असतास ना तर विना अनुभवाचा तू साहेब झाला असतास," कचरूचे हे वाक्य त्याच्या कानांत घुमू लागले.

"विल यू प्लीज टेल मी व्हॉट एक्सपीरियन्स यू हॅड, व्हेन यू वेअर एम्प्लाईड फॉर दि फर्स्ट टाईम?"

"हे पहा, माझ्याजवळ एवढा वेळ नाही तुमच्याशी बोलायला."

"का? खरं बोललो म्हणून राग आला वाटतं?"

"मी तुम्हांला सांगितलं ना आम्हांला अनुभवी माणसं हवी म्हणून."

"अनुभव नसलेलीसुद्धा चालतील पण ती तुमच्या जातीतली, गोठ्यातली असायला हवी. सर! मी

तुम्हांला चालेल; पण माझी जात नाही चालणार–" त्याने झटक्यात आपली फाईल उचलली आणि पिसाळलेल्या कुत्र्यासारखा रस्त्याला लागला...

"कहां जाना है भाई?" कंडक्टरने विचारलेल्या प्रश्नाने तो भांबावला.

"लालबत्ती स्टॉप–" खिशातली दोन रुपयांची नोट पुढे करीत तो न कळत बोलून गेला. तिकीट आणि उरलेली रक्कम न मोजता त्याने खिशात घातली. काल मोरेकाकांनी दोन रुपये गाडीभाड्याला त्याला दिले होते. काल तो पायीच फिरला होता म्हणून ते आता कामी आले. आज आपण त्या साहेबांशी विनयाने बोललो असतो, तर कदाचित त्याने नोकरी दिली असती, असे त्याला उगाचच वाटू लागले. त्या ऑफिसमधून निघाल्यानंतर आपण बसमध्ये कसे आलो हेच त्याला कळाले नव्हते. त्याने डोळे मिटले आणि सीटवर मागे मान टाकली.

"लालबत्ती" बेलची दोरी ओढत कंडक्टर ओरडला. बस थांबली. त्या स्टॉपवर उतरणारा फक्त तोच होता. कुठे पानदुकान दिसतंय का म्हणून पाहू लागला पण कुठेही दिसेना म्हणून पुढे निघाला. रस्त्याच्या दोन्ही बाजूला दोन-चार मजली चाळी, तोंडाला रंग फासून दात काढीत गॅलरीत उभ्या असलेल्या पोरींचं ओझं सांभाळीत उभ्या होत्या. फक्त ब्लाऊज आणि परकरवर उभ्या असलेल्या मुली पाहून आपण कुठल्या गल्लीत आलोय हे कुणी सांगण्याची त्याला गरज नव्हती. त्या पोरींकडे पाहून त्याच्या घरातली रंगीबेरंगी ठिगळं असलेली गोधडी डोळ्यांसमोर दिसू लागली. चाळीच्या पायथ्याशी 'बजरंग गॅरेज', 'महंमद भंगारवाला', 'अरुण लॉंड्री' अशी किती तरी नावं असलेली बंद दुकानं होती. हॉटेल आणि पान दुकानं मात्र लोक जमवून गर्दीत भर घालण्याचे काम प्रामाणिकपणे पार पाडीत होती.

"काहो लालबत्ती गल्ली हीच ना?"

"हां." पानवाला त्याला खालीवर न्याहाळीत म्हणाला.

"क्यों साहब माल चाहिए क्या?" दुकानाच्या बाजूला विडी ओढीत उभा असलेल्या त्याच्याच वयाच्या मुलाने विचारले.

"नहीं."

"अरे! साहब ऐसा माल दिखाऊंगा. के आप जिंदगीभर याद करोगे–" विडीचा झुरका घेत पुढे आला.

"मुझे कचरूसे मिलना है."

"अरे! कचरू क्या माल दिखाएगा उससे बढिया माल आपून दिखाताय चलो." तोंडातली विडी टिचकीने दूर उडवीत पुढे सरसावला.

"मुझे माल नही, कचरू चाहिए" त्याच्या लोचटपणाची चीड येऊन तो उद्‌गारला.

"तो ऐसा बोल ना. ओ क्या सामने खडा है!" गल्लीच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या पानदुकानाकडे बोट करून पुन्हा आपल्या जागेवर गेला. त्याने सुन्न होऊन तिकडे पाहिले. कचरू एका इसमाशी बोलण्यात गुंतला होता. त्या इसमाला घेऊन कचरू निघाला आणि त्याची नजर ह्याच्यावर पडली.

"अरे! तू आनी इकडं?" कचरूचे आश्चर्य.

"हो, तुझ्याकडेच आलो होतो."

"एक मिनिट, सिर्फ एक मिनिट, मैं इनको इनकी मंजिलतक पहुंचाकर अभी आया." असं म्हणून कचरू त्या इसमाला घेऊन समोरच्या एका चाळीत बघता बघता नाहीसा झाला. परत आला तेव्हा मात्र खुशीत होता.

"बोल गौतम, मिळाली नोकरी?"

त्याने नकारार्थी मान हलवली.

"अरे! आपल्याला माहीत होतं नाय मिळनार म्हनून."

"पण..."

"बोल. करनार आपल्यासारखं काम?"

"म्हणजे?"

"दलाली."

"दलाली?"

"यस. दलाली."

त्याच्या काळजात चर्र झालं.

"भिडू ये एक पुन्यका काम है!"

"पुण्याचं?"

"नाही तर काय. दोन गरजवंतांना एकत्र आनतो आपून. तिला धंदा हवा असतो, त्याला खाज मिटवायची असते. आनी आपल्याला आपलं कमिशन पाहिजे असतं श्वास चालू ठेवण्यासाठी." कचरूने आपली फिलॉसॉफी सोपी करून सांगितली. परंतु त्याच्या मेंदूच्या

सुरकुत्यांना खटाखट गाठी बसू लागल्या आणि त्या गाठीत आई, वहीण. बाप, धाकट्याची मान करकचून आवळू लागली.

"अपनी जवान वहेनका सोच, कुंवारी बिठायेगा क्या घरमे ?" कचरूच्या ह्या खोचक प्रश्नाने तो भांवावला, समोर गॅलरीत उभ्या राहून अश्लील हातवारे करणाऱ्या पोरींमध्ये आपली लग्नाला आलेली बहीण त्याला दिसू लागली. आणि मेंदूच्या गाठी सटासट सुटू लागल्या.

"पण मला अनुभव नाही रे !" नकळत तो बोलून गेला. कचरू घोडा खिदळावा तसा खी: खी: हसत म्हणाला,

"फिर आपून किस मर्ज कि दवा है ? आपल्या सोबत चार दिवस रहा. सगळं शिकवून टाकू, काय?"

समोर बसलेली माशी टप्प्यात येताच पालीनं जीभ काढून जशी ती गिळंकृत करावी तसं त्याच्या लाचार मनाने त्याला गिळंकृत केलं.

"थांब, भिडू हे पुण्याचं काम करण्यापूर्वी हे एक काम मला पूर्ण करायलाच पाहिजे–" आणि तो हातातल्या फाईलमधलं एक एक सर्टिफिकेट काढून फाडू लागला आणि त्याच वेळी 'लालबत्ती' गल्लीत दलालाच्या यादीत एक नवीन दलालाचं नाव नोंदवलं जात होतं.

☐ ☐

**दलित कथा स्पर्धा : तिसरे बक्षीस**

# दसऱ्याची कडाकणी

## आप्पासाहेब खोत

❋ ❋

"गिरजामावशी, ए गिरजामावशी." सखू हाका घालत आत सोप्यात आली. सोप्यात गहू नीट करत नसलेल्या गिरजामावशीनं वरती पाहिलं आणि नुसतंच सखूकडं पाहिलं.

"काय करतीयास ग मावशे ?"

"गहू नीट करतो ग ! का आली होतीस ?"

"काय बी न्हाय. बगावं म्हटलं मावशी काय करतीया." कुडाला टेकून ती बसली.

"काय सांगू बाई. एवढा वानीतीनीचा दसरा झाला. माझ्या लेकाला कडाकणी मिळाली नाहीत. चार कडाकणी करून घेतो आणि जावं म्हनतूया मलकापूरला."

"वसूदादा मलकापूरला हाय न्हवं ?"

"न्हय. लगीन झाल्यावर तिकडंच बिऱ्हाड करून हाय. साताट म्हैनं झालं कारीटवी लिवलं न्हाय. त्यात तेची बायकूबी बाळंतपणाला गेलीया."

"मग तू का जाऊन ऱ्हात नाहीस वसूदादाकडं ?"

"आंऽऽ... ..." गिरजा नुसती सखूच्या तोंडाकड बघितच बसली आणि तिला उभा जलम आठवला.

जाखल्यांची पांढरी. तिचं लगीन झालं तवा ती नांदाय आली. सासू-सासरा-नवरा. घर भरल्यावाणी. सगळ्यांनी मिळून रोजगार करायचा. रोज एकाचा वांघ पुजायचा. पर कवा पोटाला कमी पडलं न्हाय. एकाला दोन, दोनीला तीन अशी अठरा वरसं संपली. सासू-सासरा हुत्याचं न्हवतं झालं. नवऱ्यानं सखा मोहित्याच्या मळ्यात चाकरी धरली. पडल्यालं घर सावरलं. पुन्हा सुखाचं दिवस आलं. सखा मोहिता दुर्जन नव्हता. सारा मळा सोद्यांनी केला. नवरा चाकरीला होता. चाकरीच्या गड्यावाणी रंगाला कवा वागिवला नाही. सारा मळा रंगाचा झाला. त्यानं घरच्यावाणी कामधंदा केला.

देवानं किरपा केली. गिरजाला दिस गेलं. आणि आठ नवसानं वसंता झाला. रंगाचा रागरंग बदलून गेला. सारा मळा फुलून यावा तसा रंगा फुलला. वसंता आता अंगाखांद्यावर खेळू लागला. बघताबघता पोरगं

साळंला जाऊ लागलं. रंगानं वसंताला दूध प्यायला एक शेळी घेतली. वसंता मोठा होऊ लागला. अभ्यासात नाव कमवू लागला. सातवी पास झाला. रंगानं थळूबाला नारळ फोडला आणि पाच पेढं देवापुढं ठेवलं. हात जोडून देवाला बोलला, "देवा ! परमेश्वरा !! मी जातीचा महार. माझा जलम चाकरीत गेला. बाचा जलम गावकीत गेला. तराळकी करून त्यो मेला. पर माझ्या लेकाला हे पाप नकं. आमी लई सोसलं थळूबा! लई सोसलं. पोरगं लई शिकूंदे. हापीसर हूंदे. हाडाचा काडा करीन. रक्ताचं पाणी करीन. पर पोराला शिकवीन."

रखरखीत उन्हाळा. ऊन मी म्हणत होतं. सखा मोहित्यानं हीर फोडाय काढल्याली. तोफा उडल्यागत सुरंग उडत होतं. आणि हिरीचं पाणी असल्या सरत्या उन्हाळ्यात वाढल्यालं. त्यामुळं सखा मोहित्यानं नेटानं हीर फोडायला जोर लावल्याला.

त्या दिवशी आमावशा. हिरीचं काम बंद करायचं ठरल्यालं. पर कुणी तरी आडिट काढलं–" काय हुतंया त्येला. सकाळच्या पारी नारळ फोडून काम करायचं म्हंजे झालं."

काम सुरू झालं. रंगासह सात गडी वळीनं सुरुंग घेत्यालं. सुरुंग घेऊन बारीक वळून सुरुंग बत्ती आणि दारू घालून भरलं. हळूहळू सगळं गडी वर गेलं. जाता जाता म्हादा रांगडा म्हणाला, "आरं रंगा, सुरांग चांगलं भरत्याल का ?"

"तर..."

"मग सगळ्यांच्या वाती चांगल्या फुलीव आणि बत्ती करून दे लावून."

"सगळं सातच्या सात लावू हुई गा."

"काय याडवीड लागलंय का काय तुला ?"

"मग...?"

"लेका, रंगा, वयल्या बाजूचं चार आगूदर लाव. मग तिकडं लावायचं."

"बरं..." एवढच रंगा बोलला आणि बत्तीचा फाकडा करून सुरुंग लावू लागला. एकाला दोन, दोनीला तीन सुरुंग लावून झालं. चौथा सुरुंग लवकर पेटला नाही. तो पेटायलाच उशीर झाला. तशात रंगानं एकदम सात सुरुंग लावायचा इरादा केल्याला. आणि हितंच त्याच्या आयुष्याला सुरुंग लागला.

सुरुंग लावून बराच वेळ झाला तरी रंगा विहिरीतून वरती आला नाही. सगळ्या गड्यांच्या काळजाचा थरकाप उडाला. सखा रांगडा, आणि म्हादा रांगडा यानं मोठ्यानं एकदम हाळी दिली.

"आरं रंगा..."

"ऱ्हाऊ दे, वर ये वर..." म्हादा.

आणि धाऽऽऽऽड धाऽऽऽऽड धाऽऽऽऽड आवाज झाला आणि उभं गडी एकदम खाली बसलं. काय उपयोग ?

सगळं सुरुंग उडालं. पण रंगा विहिरीतून वरती आला नव्हता.

सगळं गडी पळत येऊन विहिरीच्या काठावरून वाकून बघू लागली तर...

रक्ताच्या थारोळ्यात रंगाचा निर्जीव देह पडला होता. गिरजाच्या कुंकवाला धनी उरला नव्हता. आभाळ फाटलं होतं. ढग लोंबत होतं, तरीबी पाऊस पडल असं वाटत नव्हतं.

"गिरजा, अग कुठवर दुक करीत बसणार ? तू धीर टाकल्यावर पोरानं कुणाच्या तोंडाकडं बगायचं ?" येणाऱ्या-जाणाऱ्यांनी गिरजाला दिलासा दिला. रडून रडून तिच्या डोळ्याचं पाणी आटलं होतं. एक दिवस घोंडे-गुरुजी आले.

"तुम्ही वसंताचं काय करायचं ठरवलं आहे ?"

"काय करू मास्तर! मी रंडकी बाई. माझं पोट भरू का त्येला शिकवू ? कसं करू ?"

"माझं ऐकणार ?"

"......"

"त्याला आपण कोडोलीला चर्च कौन्सिलचं एक बोर्डिंग आहे तिथं ठेवू. शिक्षणाचा खर्च काहीही नाही. फक्त परवानगी द्या."

... ती उत्तर न देता फक्त पाहात राहिली.

"मी व्यवस्थित करतो."

"पर मास्तर..."

"काय उघड बोला. काय अडचण ?"

"ऱ्हवं, माझा पोरगा खिरीस्ती हुयाचा न्हाई नव्हं ?"

"नाही, नाही, त्याची काळजी करू नका."

"पर गुरुजी, पहिल्यांदा भरायला तर शंभर रुपये कुठलं आणू ?"

"होय, एक शंभर रुपये प्रथम भरावे लागतात. त्येच म्हणतूया मी. वसंता मला बोल्ला हुता."

...थोडा वेळ विचार करून तीच म्हणाली, " मग शेळी विकतो. दीन शंभर रुपय. प्वोरापरास मला शेळी जवळची न्हाई."

वसंता बोर्डिंगमध्ये दाखल झाला. दर गुरुवारच्या बाजारला गिरजा वसंताला बाजारातून शेव, पापडी, पाव घेऊन जात होती. एक लुगडं सात जागी शिवून दिवस काढत होती. वसंताला लागेल ते देत होती. दिवस सरत होते आणि गिरजा खंगत चालली होती. बोर्डिंगमधून तो अकरावी पास झाला. पुढे कोल्हापूरला रयत शिक्षण संस्थेच्या कीर्ती कॉलेजमध्ये ' कमवा आणि शिका ' योजनेतून बी. ए. झाला.

वसंता आता गिरजाला आभाळाएवढा मोठा दिसू लागला. कोडोलीला बोर्डिंगमध्ये शिकत असल्यापासून बी. ए. होईपर्यंत दसऱ्याची कडाकणी कवा त्येला चुकली नाहीत. कोल्हापूरला असताना तो बी. ए. च्या वर्गात शिकत होता. मी दसऱ्याला घरी येईन असंच त्यानं गिरजाला सांगितलेलं. पण तो आलाच नाही. दुसऱ्या दिवशी गिरजा जाखल्यापासून कोल्हापूरपर्यंत चालत गेली आणि लेकाला कडाकणी देऊन आली. वसंताला दसऱ्याची कडाकणी फार आवडायची.

एक दिवस तो धावतच आला आणि हमसून हमसून रडू लागला. त्याच्या हातात नोकरीची ऑर्डर होती.

" आई, मला एस. टी. मध्ये नोकरी लागली."

गिरजा नुसती पाहातच उभी राहिली. पावसाळ्यात घराची भिंत पडल्याली. तिला आधार म्हणून उसाच्या पाल्याचा कूड केल्याला. त्याला टेकून ती बसली आणि टपाटपा डोळ्यातलं पाणी खाली सांडलं. डोळ्यांपुढं होती सखा मोहित्याची हीर आणि विहिरीतलं लाल लाल रक्ताचं पाणी.

काळ सरत होता, दिवस जात होते, आणि वसंत कोल्हापूर एस. टी. डेपोमध्ये टेबलावर बसून आकडेमोड करीत होता. महिन्याच्या पगाराला शंभर रुपये आईला देत होता.

" आई, तू कोल्हापूरला चल की माझ्याबरोबर."

" न्हाई बाबा ! माझी पांढरीच मला... मला काय कळतंय त्ये शेरात ? आणि यला गमतंय व्हय तिथं ! उभं वारं सुटतंया."

त्यानंही जास्त आग्रह केला नाही. आईची इच्छा नाही तर राहू दे. पाहू लग्नानंतर. आणि एक दिवस त्यानं लग्नही केलं. तेही ' लव्ह मॅरेज '. एक दिवस आला. भाड्याची टॅक्सी करून. लगीन करून चार-पाच महिनं झालं तरी तो गावाकडं आला नाही. आणि याचा गिरजालाही पत्ता नव्हता. अवचित दसऱ्याच्या दिवशी दुपारी तो टॅक्सी करून आला, जोडीनं थळूबाच्या पाया पडली. दर्शन घेतलं. आणि ती घराच्या चौकटीतून कांबटाच्या दाराला ढकलून आत आली. गिरजानं दिलेल्या फाटक्या पोत्यावर कशी तरी आखडून बसली. तो कुडाजवळ बसला आणि बसल्याली शेळी उठली. वाकडी होऊन तिनं ओंजळभर लेंड्या टाकल्या आणि तिथंच वाकडी हून फळाकली.

" आई, ही शेळी विकून टाक. कशाला लागती आहे तुला ?"

...गिरजा गप्प.

" चार महिन्याला चारशे रुपये पाठवले. ही भिंत बांधून का घेतली नाहीस ?"

" न्हाय जमलं बाबा. लोकांचं रीण फेडलं."

" कसलं रीण...?"

" लेका, कसलं काय... तुला कोल्हापूरला शिकाय असताना काढल्यालं."

त्याचं मौन.

थोडा वेळ असाच गेला. कोणीच काय बोललं नाही.

" आरं वसंता... ह्या बाई कोण रं ?"

" अग आई, ही तुझी सून !"

" काय ?..." गिरजानं एकवार तिला पुरी पाहिली आणि तिच्या डोळ्यांतनं पाण्याच्या धारा लागल्या. परंतु वसंताला वाईट वाटेल म्हणून ती गप्पच बसली. पदर आडवा लावून तिनं चटकन् उठून जरमनचा तांब्या पाण्यानं भरला. वसंतापुढं ठेवला. वसंता तांब्या उचलून चूळ भरण्यास बाहेर गेला.

पुन्हा सूनबाईकडं पाहत बसली. तिला सून मनापासून आवडली. एव्हाना वसंता आत आला. तिनं वसंताकडं पाहिलं. त्यानं खूण केली तशी ती चटकन् उठली. खांद्यावरच्या पदराचा शेवट उजव्या हातातल्या रुमालाला धरत तिनं वाकून दुरूनच " सासूबाई ! नमस्कार करते !" असं म्हणून ती चटकन् मागे सरून बसली.

गिरजाला भडभडून आलं. उगळाचा पाऊस पडल्यावर काळ्या मातीनं जसं उमाळं सुटावं असं तिचं झालं. घळाघळा तिचं डोळं निथळू लागलं.

"माझी बया ग तू...!" म्हणून गिरजानं तिच्या गालावरून आपली तुरकाटी छाप बोटं फिरवली आणि तिला मिठीत घेतली. तसं सूनबाईला गुदमरलं. कित्येक दिवस डोक्याला तेलपाणी नसल्यानं आणि अंगावरच्या दाळकांडानं तिला गुदमरलं. नाकात वास भरला. तिनं कसंतरी ते सोसलं. स्वत:ची सोडवणूक करून घेऊन ती चटकन् उभी राहिली आणि डोळं फिरवून ती वसंताला म्हणाली, "येतोस ना ? चल !"

"थांब ! माझ्या हातची चार कडाकणी तरी खाऊन जावा."

"कडाकणी...!" वसंताच्या जिभेवर पाणी सुटलं.

तिनं कोपऱ्यातील काळाकुट्ट डबा काढला. जरमनची ताटली घेतली आणि काळपट तेलकट कडाकणी काढून ताटलीत ठेवली. गुळचट खमंग वास वसंताच्या नाकात घुसला. त्यानं दोन कडाकणी उचलून हातात घेतली.

"घे ! तुला एक..." त्याचा आग्रह.

"आरं लेका, तिला मी देतो. तू खा." गिरजानं कडाकण्यावरच्या माशा घालवून ती उभी असणाऱ्या दिशेकडं केली.

"शीऽऽ ! मला नको ! तू येतोस ना ?"

ती उभी होऊन रस्त्यावर गेलीसुद्धा आणि कडाकण्याचा घास वसंतानं घेतलेला तसाच परत ताटलीत ठेवला.

आली तशी गाडी घुरळा उडवीत गेली. कायमचीच गेली.

"वसंताची आई, वसंता आला होता ?" घोंडेमास्तर.

"........."

"वसंताच्या आई, बोलत का नाही ?" मास्तर आत आले. जरमनच्या ताटलीत कडाकणी तशीच पडली होती.

"वसंताच्या आई..."

"हाऽऽ होय. वसंता आला होता मास्तर. पण कडाकणी न खाताच गेला की वं वायकूसंगं !"

मास्तर काय समजायचं ते समजले. "हो ! हो !! हे मी ऐकून होतो. त्यानं प्रेमविवाह केला ते. वसंताच्या आईऽऽ"

.........

तिनं पदरानं नाक-डोळे पुसत मास्तरांकडं पाहिलं.

"तर त्याचं असंच आहे. पिढ्यान् पिढ्या गावकुसाची सेवा करण्यात आमच्या बापजाद्यांचा जलम गेला. आंबेडकर आमचा देव झाला. काळ बदलला वसंताच्या आई. तरुण पोरं शिकून मोठी झाली. भटा-बामणावानी नोकऱ्या करू लागली. सायबावानी वागू लागली. पर मागच्या पिढीला विसरली ही पोरं. पुढच्या पिढीला कवेत घेऊन मागच्या पिढीला लाथा घालू लागली."

"मास्तर... माझा वसंता..."

"तोही तसाच. आज बावीस वर्षं त्याला दसऱ्याची कडाकणी मिळाली नाही असं कधी झालं नाही. परंतु आज त्यानं आपणहून त्याचा धिक्कार केला."

"मास्तर...मास्तर...माझा वसंता तसा न्हाई... तसा न्हाई हो..."

या घटनेला चार-पाच वर्षं होऊन गेली. अजून वसंता इकडे आला नाही. चार ओळीचं पत्र नाही, की आईला मनीऑर्डर नाही. तेव्हापासून गिरजामावशी लोकांचा रोजगार करते. त्यातून पैसा पैसा साठवते आणि त्याचं गहू आणते. मग कोणी तरी विचारतं, "मावशी, काय करतीयास गं ?"

तिचं उत्तर ठरलेलं – गहू नीट करतो बाई. एवढ्या वाणीतिनीचा सण झाला. वसंताला कडाकणी मिळाली नाहीत. असंच आणि असंच काही तरी. कधी तो मलकापूरला आहे, तर कोल्हापूरला, तर कधी कागल, असं कोणत्याही गावाचं नाव घेते आणि तिकडं बदली झाली, लई दिवसात कारीट नाही, तर कधी वसंताला मुलगा झाला, तर कधी त्याची वायको बाळंतपणाला गेली, काहीही सांगते.

लोक म्हणतात, तिचं ते फॅड आहे. मग गहू नीट करत करत विचार करत वसायचं तिथं. समोरच्या सुपातील गहू कोंबड्या येऊन खाऊन जातात तरी तिची तंद्री भंग पावत नाही. मग केव्हा तिची तीच उठते. तिला उभा जलम आठवत राहातो.

"माझ्या हातची कडाकणी त्येला काय ग्वाड लागत्यात !" आणि सगळे गहू कोंबड्यांना बोलावून त्यांच्या समोर फेकते.

आताही तेच. ती गप्प. विचार करते. म्हणून सरकू म्हणते, "जातो ग मावशे."

"अंऽऽ जा !!" तिची तंद्री भंग पावते. तिच्या पाठोपाठ मावशीही उठते आणि सगळे गहू कोंबड्यांच्या समोर फेकत राहाते. फेकणाऱ्या प्रत्येक मुठीत पहिल्यापेक्षा जोर असतो. □ □

## महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दर वर्षी दिली जाणारी ग्रंथपारितोषिके

| | | |
|---|---|---|
| कादंबरी | – ह. ना. आपटे पारितोषिक | १०१–०० |
| | – वा. म. जोशी पारितोषिक | ... १,०००–०० |
| | – शंकर पाटील पारितोषिक | ... २,०००–०० |
| कविता | – ह. स. गोखले पारितोषिक | ३००–०० |
| | – कुसुमाग्रज पारितोषिक : कॉंटिनेंटल प्रकाशन | ... १,२००–०० |
| | – महाराष्ट्रकवी यशवंत पारितोषिक | ५००–०० |
| कथा | – नी. स. गोखले पारितोषिक | ३००–०० |
| विनोद | – चिं. वि. जोशी पारितोषिक कॉंटिनेंटल प्रकाशन | ... १,२००–०० |
| समीक्षा | – ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक | ५००–०० |
| संपादित ग्रंथ | – गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक | १००–०० |
| उत्कृष्ट प्रकाशन | – अ. स. गोखले पारितोषिक | ३००–०० |
| संत-वाङ्मयविषयक | – तुळशीराम वाघ पारितोषिक | २५०–०० |
| ऐतिहासिक, वैचारिक वा साहित्यविषयक | – म. म. द. वा. पोतदार पारितोषिक | २५१–०० |
| देशांतर्गत प्रवासवर्णन | – दि. वा. मोकाशी स्मृति पारितोषिक | ५००–०० |
| ललितेतर वैचारिक ग्रंथ | – शि. म. परांजपे पारितोषिक | २५०–०० |
| | – ना. गो. चापेकर पारितोषिक | २५०–०० |
| | – विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक | १५०–०० |
| | – गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक | ५००–०० |
| | – गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक | ४००–०० |
| वैचारिक संशोधनपर | – श्री. शा. हुणमंते पारितोषिक | ३५०–०० |
| विनोद व कविता | – कॉंटिनेंटल प्रकाशन पारितोषिकप्राप्त प्रत्येक प्रकाशकास | ... ९००–०० |

याशिवाय साहित्यक्षेत्रात भरीव कार्य करणाऱ्या व्यक्तीस महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी रु. ३,००० चे खास पारितोषिक व मानचिन्ह परिषदेच्या वर्धापन-दिनी (२७ मे) देण्यात येते.

दरवर्षी तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांना प्रत्येकी रु. १०१ ची पारितोषिके दिली जातात. दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखास कै. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २०० चे एक पारितोषिक दिले जाते.

लेखकांनी वा प्रकाशकांनी १९८७ च्या पारितोषिकांसाठी १–१–८७ ते ३१–१२–८७ या कालावधीत प्रकाशित झालेल्या पुस्तकांच्या दोन प्रती ५ जानेवारी १९८८ पर्यंत कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०, या पत्त्यावर पाठवाव्यात.

**राजा फडणीस**
कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

दलित कथा स्पर्धा : उत्तेजनार्ह

# जयंती

## यशवंत वामन खरात



" खरं म्हणजे आपण अशोकला बोलवायलाच नको होतं." जाधवमास्तर कुशीवर वळताना पुटपुटले. गेले दोन दिवस ते अतिशय अस्वस्थ झाले होते. आपण फार मोठा अपराध केलाय किंवा आयुष्यात कधीही निस्तरता येणार नाही अशी चूक केलीय असे त्यांना वाटत होते. अशोक जरी आपला विद्यार्थी असला तरी तो आता मोठा माणूस आहे. चार ठिकाणी गेला तर लोक त्याचे हार घालून स्वागत तर करतातच, परंतु त्याच्या ज्ञानाला आणि विद्वत्तेलाही मुजरा करतात. अशा अशोकचा अपमान म्हणजे भयंकरच !

जाधवमास्तरांची नोकरी सुरू झाली तेव्हा त्यांना पहिला भेटलेला विद्यार्थी म्हणजे हा अशोक. अभ्यासात हुशार आणि बुद्धिमत्ता तीक्ष्ण तर होतीच, परंतु अभ्यासापेक्षा इतर वाचन खूप. मराठी शाळा संपल्यावर तालुक्याच्या गावात गेला. पुढे कॉलेजही शिकला. मास्तरांना त्याची प्रगती कळत होती. पण त्याच्या घराची रया तसूभरही बदललेली नाही हे स्पष्ट दिसत होते. नंतर तो कोणत्या तरी कॉलेजात प्राध्यापकाची नोकरी करतोय हेदेखील त्यांना बाहेरूनच कळले.

गेल्या वर्षी तालुक्याच्या गावाला जयंती होती. त्याचे हँडबिल हातात पडले. मास्तरांनी सहज सर्वत्र नजर फिरविली. आणि एके ठिकाणी त्यांचे डोळे स्थिर झाले. तेथे लिहिले होते : ' प्रमुख वक्ते : डॉ. अशोक निकम, एम. ए., पीएच्. डी.' मास्तरांना दोन मिनिटे काही सुचेनाच. अशोकने पीएच. डी. कधी मिळविली ? खरं म्हणजे आपल्याला समजायला हवं होतं. त्यांनी तत्क्षणीच तालुक्याला जयंतीला जाण्याचा निर्णय घेतला. कोणत्याही परिस्थितीत अशोकचे भाषण ऐकायचेच.

मास्तर तालुक्याला गेले. जयंतीला सारा तालुका हजर झालाय असे वाटत होते. खूप गर्दी झाली होती. अशोक एखाद्या मोटारीतून येईल असे त्यांना वाटले. पण अचानक आरडाओरड झाली. पाहातात तर अशोक आलेला. त्याच्या भोवती स्थानिक कार्यकर्त्यांनी गराडा घातलेला. अशोकच्या गळयात लोकांनी हार घातले. त्या ओझ्यानं तो वाकलाय असं वाटत होतं. खांद्यावर तीच पूर्वीची झोळी होती. तोच हसरा आणि बोलका चेहरा. मास्तर ओठांच्या कोपऱ्यात हसले. तोपर्यंत... अशोक व्यासपीठावर चढला नि मास्तर समोरच्या गर्दीचा ठिपका झाले.

सुरुवातीला इतर लोकांची सटरफटर भाषणे झाली. एकाने मात्र अशोकविषयी संपूर्ण माहिती सांगितली. आणि मग अशोक बोलायला लागला. त्याने सुरुवातीलाच सांगितले, " आंबेडकरांविषयी एखाद्या तासात बोलायचे म्हणजे महासागरातील एखादा थेंब तळहातावर घेण्यासारखे आहे. मुळात तो थेंब हातात सापडण्याची शक्यता कमीच, आणि सापडलाच तर हात पोळण्याची शक्यता जास्त. " आणि अशोकचे व्याख्यान सुरू झाले. ' शिका, संघटित व्हा, संघर्ष करा.' या आंबेडकरांच्या संदेशावर तो बोलू लागला. आंबेडकरांच्या आयुष्यातल्या एकेक प्रसंगाचा दाखला देऊन तो पटवू लागला आणि मास्तरांची उत्सुकता वाढू लागली. किती ऐकू नि किती नको असे मास्तरांना झाले. अशोकचे व्याख्यान संपूच नये असे वाटत असतानाच टाळयांचा कडकडाट झाला नि त्या कडकडाटातच अशोक खाली बसला. नंतर गर्दी वाढली. माणसे एकमेकाला घासून जाऊ लागली. म्हणून मास्तर तेथून उठून एका घराच्या ओटयावर जाऊन बसले. दहा मिनिटातच ' जयभीम गुरुजी ' म्हणत अशोक समोर उभा ! मास्तर त्याला किती तरी वेळ डोळयात साठवीत होते.

गेली तीन वर्षे मास्तर निमगावात नोकरी करीत होते. शाळा तशी व्यवस्थित चालली होती. काही मुले तयार होत होती. पण वस्तीतल्या लोकांशी जमले नव्हते. जमले नव्हते तसे बिनसलेही नव्हते. एप्रिल महिन्यात

गावची जत्रा आली आणि बौद्धवस्ती फुलली. सगळे मुंबईकर जमले. क्वचित् रात्री गोंगाट ऐकू येई, परंतु मास्तर काही तिकडे ढुंकून पाहात नव्हते. जे दिसायचं ते पेलवण्याजोगं नव्हतं. जत्रेच्या रात्री तमाशा झाला दुसऱ्या दिवशी दुपारी मास्तर सहज झोपले होते आणि अचानक दार ठोठावले. मास्तरांनी चरफडत दार उघडले तर समोर पाचवीतला सहादू उभा· किंचित् त्रासिकपणे त्यांनी विचारले,

"काय रे ?"

"गुरुजी, त्या सुदामनानानं तुम्हाला बोलावलंय."

"कशाला ?"

"काय माहीत नाही बुवा." म्हणत सहादू चालू लागला.

इच्छा नसताना मास्तरांनी शर्ट चढवला. ते पाय ओढीत पाराजवळ आले. पारावर पाच-सहाजण बसले होते. सारेच मुंबईकर. लुंगी आणि बनियन घातलेले. पारावर एक गोधडी अंथरलेली. त्यावर त्यांचा रमीचा डाव रंगात आला होता. तेवढ्यात मास्तरांना पाहिल्याने सुदामाने पत्ते खाली टाकले आणि तो म्हणाला,

"या गुरुजी, या !"

"काय काम काढलंत माझ्याकडे ?"

"तुम्ही पारावर तर येवून बसा. का यायचं नाही वर ?"

"तसं नाही. येतो की." म्हणत मास्तर पारावर चढले. मंडळींनी आपापली बुडं हलवून जागा केली. मास्तर बसले.

"नाही, म्हणजे, मला थोडं विशेषच वाटलं, तुम्ही बोलावलं ते."

"वाटणारच! विषयच विशेष काढायचाय !" सुदामा.

"मग बोला ना." गुरुजी.

"सत्या, तू बोल रे." सुदामानं समोरच्याला म्हटलं.

"नको, तूच बोल सुदामा ! तुला विषय नीट हाताळता येतो."

सुदामाने पानाच्या डब्यातून पान काढले. चुन्याची डबी काढली. डबीतला चुना बोटाने काढून तो पानाला लावीत सुदामा बोलू लागला, "आता बघा, आपल्या आजूबाजूच्या गावात काय चाललंय ?"

"काय · चाललंय ?" गुरुजींचा चेहरा प्रश्नार्थक होता.

"अहो, सगळ्या आजूबाजूच्या गावांमध्ये आंबेडकर जयंती होतेय."

"खरं आहे ते."

"तशी आपल्या पन गावात जयंती करायची."

"काय म्हणता ?" गुरुजींच्या चेहऱ्यावर प्रसन्नता होती, पण विश्वासाचा लवलेश नव्हता. मे महिन्यातील बावीस तारखेला जयंती साजरी करायचीच असा निर्णय बसल्या बैठकीतच झाला. नि मास्तर म्हणाले, "वक्ता बोलवायचं काम माझ्यावर सोपवा." गुरुजींच्या डोळ्यांसमोर अशोकचे भाषण तरळले.

"छा ! छा !! त्या बाबी आम्ही बघतो. तुम्ही फक्त इथली व्यवस्था बघा. पैशाची काळजी नको. काय ?"

मास्तर नाराज झाले, परंतु त्यांनी चेहऱ्यावर ती नाराजी दिसू दिली नाही. येनकेन जयंती साजरी होतेय यातच त्यांना आनंद वाटू लागला नि ते तयारीला लागले.

पंधरा तारीख उलटून गेली, तरी हँडबिले येईनात, तेव्हा मास्तर अस्वस्थ झाले. जयंतीच्या कार्यक्रमाची साधी रूपरेषादेखील तयार नव्हती. शेवटी एकवीस तारखेला सारी बौद्धवस्ती जागी झाली. मुंबईकर उतरले. त्यांच्याबरोबर बाहेरची पाचसहा मुले होती. त्यांचे कपडे, त्यांची चालण्याची ढब पाहूनच मास्तर नाराज झाले. परंतु स्वभावानुसार त्यांनी चेहऱ्यावर नाराजी दिसू दिली नाही. फक्त चौकशी केली, तेव्हा समजले की, ती बँजो वाजवणारी मुले होती. मास्तरांनी सुदामाला गाठले.

"अहो काय सुदामराव, तुम्ही साधी हँडबिले छापली नाहीत. प्रमुख वक्ता तरी कोण बोलावलाय ?"

"कशाला पाहिजे वक्ता गुरुजी ? गावातल्या सरपंचाला नायतर पाटलाला बोलवू. त्यापेक्षा तुम्ही असंच करा ना – तुमच्याच पसतीचा वक्ता बोलवा एखादा." आणि परत सुदामा दुसरीकडे निघून गेला.

मास्तरांचं डोकं भणाणलं. रात्री जयंतीची सजावट सुरू झाली. गुरुजींनी वस्तीतल्याच मुलांकडून पताका लावून घेतल्या. गौतम बुद्ध आणि आंबेडकरांचे फोटो आणवले. ते स्वच्छ करून घेतले. मास्तर झोपायला घराकडे निघाले तेव्हा पारावर मुंबईकर मंडळी अस्ता-

व्यस्त पसरली होती. मास्तरांनी घड्याळावर नजर टाकली तेव्हा रात्रीचे तीन वाजले होते.

मास्तर सकाळी उठले तेच मुळी लाउडस्पीकरच्या भसाड्या आवाजाने. सकाळी गावात प्रभातफेरी काढली. बुद्धवंदना झाली आणि पुन्हा वस्ती ओस पडली. गुरुजी अकरा वाजता जेवायला बसले. तेवढ्यात मुरली वाघमारे आला. मास्तरांशी अस्ताव्यस्त गप्पा मारू लागला. गप्पा मारता मारता अशोक निकमचा विषय निघाला. ऐसपैस बसत मास्तर म्हणाले, "अरे, फार मोठा झालाय तो. मुळातच हुशार होता. पीएच. डी.-देखील मिळवली."

"सकाळीच आलाय ना मुंबईवरून? मला भेटला तो." मुरली.

"काय म्हणतोस? अशोक गावाला आलाय? कुठे तरी कार्यक्रम असेल त्याचा."

"कार्यक्रम वगैरे काही नाही. सहज आलो म्हणाला."

"काय म्हणतोस काय? यासारखी तर सुवर्णसंधी नाही." म्हणत मास्तर उठले. शर्ट अंगात घातला नि प्रथम सुदामरावकडे गेले. पारावरच तो कलंडला होता. त्याला उठवीत मास्तर म्हणाले, "सुदामराव, वडगावचा अशोक माहीत आहे ना? पीएच्. डी. आहे. त्याला बोलवावं म्हणतो प्रमुख वक्ता म्हणून! आंबेडकरांचा फार अभ्यास केलाय त्याने."

झोपमोड झाल्याचे सुदामरावांना आवडले नसावे. त्यातच तो बडबडला, "बोलवा कोणालाही!"

पडत्या फळाची आज्ञा घेऊन मास्तर निघाले. त्यांनी सायकलवर टांग मारली. निमगावपासून वडगाव म्हणजे चार मैलांचे अंतर. जाऊन-येऊन एक-दीड तासाचा प्रश्न. तिथे एखादा तासभर, म्हणजे साडेबारा-एक-पर्यंत परत येऊ. रात्रीचे जागरण नि दुपारचे जेवण झाल्याने त्यांच्या डोळ्यावर पेंग येत होती. त्यात दुपारचे ऊन. मास्तर कपाळावरचा घाम निपटीत पेडल मारीत होते. आज त्यांचाच विद्यार्थी जयंती गाजविणार होता.

अशोक नुकताच दुपारचे जेवण उरकून काही तरी वाचत पडला होता. मास्तरांना पाहाताच त्याने पुस्तक बाजूला ठेवले नि सामोरा गेला. पाणी प्यायल्यावर तोंड पुशीत मास्तर म्हणाले,

"अशोका, आमच्या निमगावात आज जयंती आहे."

"वा! चांगली बाब आहे की!"

"हो, पण आम्हाला वक्ताच मिळाला नाही."

"का वरं?"

"आता ते काय सांगू? पण एक कर, तू अनायासे येथे आलाच आहेस, तर तूच प्रमुख वक्ता हो."

"नाही पण, असं अचानक..."

"आता नाही म्हणू नकोस. मी शब्द देऊन आलोय. तूच जर माझा शब्द राखला नाहीस तर कोण राखणार?"

"बरं, येईन मी! पण किती वाजता येऊ?"

"हे बघ, चार वाजता मिरवणूक निघणार आहे. ती सहा वाजेपर्यंत तरी चालेल. तू बरोबर सहाला ये. तू आल्याशिवाय सभेला सुरुवात करीत नाही बघ." आणि मास्तर उठलेदेखील.

"अहो गुरुजी, कमीत कमी चहा तरी घेऊन जा."

"नको. फार कामे खोळंबलीत. जातो मी."

आणि मास्तर परत निमगावला आले. त्यांच्या उत्साहाला आता पारावार नव्हता. त्यांनी प्रमुख वक्त्याच्या नावाचा बोर्ड त्याच्या पदवीसह गावाच्या चौकात लावला. गावात प्रवेश करणाऱ्या दोन्ही रस्त्यांवरही त्यांनी अशोकच्या नावाचे बोर्ड लावून टाकले.

दुपारचे साडेचार वाजले तरी वस्तीला जाग आली नव्हती. मास्तरांनी पारावरच्या एकेकाला उठवायला सुरुवात केली. पाच वाजता बैलगाडी तयार झाली. आजूबाजूच्या गावातून वाजंत्री आलेले होतेच. संबळ-सनई-चौघडा सुरू झाला. मिरवणूक थोडीशी पुढे सरकली आणि बँजोचा आवाज घुमला. मास्तरांनी पाहिलं. काल दिसलेली मवाली पोरं आपली केसांची झुलपं सावरीत वाजवीत होती आणि सुदामराव व त्याची गँग अंगविक्षेप करीत नाचत होती. त्यांना नाचण्याचा कैफ चढला होता. मास्तरांनी घड्याळात नजर टाकली. साडेपाच वाजले होते. अजून अर्ध्या तासाने अशोक येणार होता. तेवढ्यात पगडीवाला मारुती आला. म्हणाला,

"गुरुजी, मला काय ह्ये पसंत नाय बघा."

"काय झालं?"

"आवो, ही ममयची माणसं, समदी दारू पेऊन तराट हायेत."

" काय, म्हणताय काय तुम्ही ?" मास्तरांच्या तोंडाचा आऽ वासला. तोपर्यंत संबळधारी शिवा समोर आला. म्हणाला, " गुरुजी, तुमीच सांगा, ह्ये व्यवहाराला धरून हाये का ?"

" का हो, काय झालं ?"

" आवो, आपल्या बाबांची जयंती म्हूनशान आमी पाच-पाच, धा-धा मैलांचं रान तुडवीत आलो. नुसतंच आलो नाय तर वाजवायला आलोय."

" अरे शिवा, तुमच्या प्रेमावर तर ही जयंती चाललीय."

" कशाचं गुरुजी ? पैसा दिऊन त्यो ममयचा बँजो आणलाय, पर त्ये काय आमाला वाजवूच देत नाय. हे ममयवालं सारखं बँजोच वाजवत्यात."

" तुम्हीही वाजवा ना."

" आवो, वाजवू देतील तर ना ? आमी वाजवाया लागलो का नुसतं ' स्टाप स्टाप ' वराडत्यात आन् त्यो बँजो वाजावणाऱ्यांना खुणावत्यात."

मास्तरांनी परत एकदा मिरवणुकीकडे पाहिले. हा ताफा काही वेगळंच सांगत होता. वाजवणारांना कैफ चढला होताच. अधिक नाचणारांची दारू नाचत होती. जवळजवळ पाच-दहा मिनिटे मास्तर एकटक त्या नाचणारांकडे पाहात होते. एकदम शिवाकडे वळून ते म्हणाले,

" शिवा, नेहमी मिरवणुकीत तुम्ही कोणती चाल वाजवता ?"

" लेझमाची."

" खरंच. गावातला लेझीम का नाही आला ?" मास्तर.

" आला अस्ता वो. पर ह्यांनी गावातल्या कोणालाच काही सांगितलं नाही."

मास्तर पुन्हा दोन-चार मिनिटे विचारात गढले आणि एकदम शिवाकडे वळत म्हणाले,

" समजा, लेझीम नसले... तर काय वाजवता ?"

" रागदारी."

" मग करा सुरुवात इथं."

आणि शिवाने संबळ सावरला. संबळ, सनई, ताशा वाजू लागले. सनईच्या तालावर संबळ डोलू लागला. तेवढ्यात गळ्यातली झोळी सावरीत अशोक आला. त्याने मास्तरांना जयभीम केला. मास्तर घोळक्यातून बाहेर आले. म्हणाले,

" खूप वेळ झाला का तुला येऊन ?"

" नाही. हे काय नुकताच येतोय."

मास्तर पुढे जाऊन ओटयावर बसले. त्यांच्या बाजूलाच अशोक टेकला. म्हणाला, " गावाबाहेरच जयंतीचा बोर्ड पाहिला. गंमत वाटली.

" का बुवा गंमत वाटली ?"

" गंमत वाटेल नाही तर काय हो ? जयंती करताय आंबेडकरांची आणि रात्री पिक्चर कोणते दाखविणार तर ' नगीना ' आणि ' जय संतोषी माँ !"

" चालायचंच. लोकं खूप येणार म्हणून आणलाय व्हिडिओ मुंबईवाल्यांनी. आपण का त्यांचा हिरमोड करायचा ? तो आपोआपच होत असतो. तो बघ त्यांच्या पायातला जोर !"

अशोक आणि मास्तरांनी एकदमच समोर पाहिले. शिवाभोवती लोकांचा गराडा पडला होता नि तो जीव खाऊन वाजवीत होता तर बँजोवाले मघासारखेच तालात वाजवीत होते. सुदामराव आणि मंडळी नाचत होती, परंतु त्यांच्या बाजूला कुत्रेदेखील उभे नव्हते. आपल्या बाजूला कोणीच नाही याचे त्यांना भानही नव्हते. मास्तरांनी पुन्हा घड्याळाकडं पाहिलं – सात वाजत आले होते. ते तसेच नाचणाऱ्या सुदामाकडे गेले. त्याचं नाचणं थांबवीत म्हणाले, " सुदामराव, सात वाजले. आवरतं घ्या."

सुदामाने नाचणे बंद केले नाही. नाचतानाचनाच तो म्हणाला, " आवो गुऽऽरुऽऽजी ! आऽऽजऽऽचा मजेचा दिऽऽवस. नाऽऽचू द्या..."

" अहो पण सभा उरकली पाहिजे."

" सभा गेली खड्डयात !" आणि सुदामा नाचू लागला. मास्तर चरफडत पुढे गेले. आता सभा, मिरवणूक त्यांच्याच मनावर ठेवावी असा त्यांनी विचार केला.

चरफडत...कशीही होवो सभा– मिरवणूक असा विचार मास्तर करू लागले. तेवढ्यात पुन्हा त्यांच्या उद्योगी मनाने उसळी मारली आणि ते मिरवणुकीत रमले.

कशीवशी साडेआठ वाजता मिरवणूक संपली. वस्तीत माणसे जमली. घाईघाईने एक टेबल आणि चारपाच खुर्च्या मांडल्या. दोनतीन माणसे पटापट बसली. मास्तरांच्या नावाचा पुकारा झाला. मास्तर व्यासपीठाकडे गेले आणि अशोक समोरच्या दगडावर

बसला. नंतर गावच्या पाटलाच्या नावाने पुकारा झाला. त्यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी विनंती करण्यात आली. परंतु दहा मिनिटे ओरडूनही गावचे पाटील तिथे आले नाहीत. मग सरपंचाच्या नावाने पुकारा झाला. व्याख्यान न देता कार्यक्रम पाहून जात्रे असा विचार करून अशोक दगडावर आता ऐसपैस बसला. तेवढ्यात मघाशी नाचणाऱ्यांमधले दोघेजण अशोक-जवळ आले. समोर उभे राहून म्हणाले, "अहो, तुम्ही चला."

"नको. मी येथेच बरा आहे." अशोक नजर टाळीत म्हणाला.

"तुम्ही तिथे चला हो. तुम्हाला भाषण करायचंय."

"मला भाषण करायचे नाही. मी फक्त जयंतीला आलोय." अशोक पुन्हा म्हणाला.

"नाही...तुम्ही चला." अशोकला त्यांनी आग्रह केला.

"नको हो." अशोक डाफरला, तसे त्या दोघांनी अशोकचे दोन्ही हात धरून ओढायला सुरुवात केली. अशोकचा तोल जाऊ लागला. कसावसा स्वत:ला साव-रीत तो म्हणाला, "सोडा ! सोडा मला ! ! येतो मी."

अशोक समोरच्या खुर्चीत जाऊन बसला. वस्तीतल्याच एका वयोवृद्ध गृहस्थाला अध्यक्ष करण्यात आले. कशी-बशी सभा सुरू झाली आणि निवृत्ती खंडागळे याला भाषण करण्याविषयी सांगण्यात आले. निवृत्ती आपले पाय ओढीत टेबलाजवळ आला. कसावसा बोलू लागला.

"डॉ. आंबेडकरांविषयी माझा अभ्यास नसल्याने मी जास्त बोलू शकत नाही. पण वस्तीतल्या लोकांना विनंती करतो की, जी ज्योत आम्ही आणली आहे ती अशीच पुढे चालत ठेवावी."

इतर दोघे-चौघेही असेच सटरफटर बोलत राहिले. एकाने तर भगवान बुद्धाची व अश्वत्थाम्याचीदेखील भेट घडविली. ते एकमेकांना भेटले, त्यांच्यात विचा-रांची देवाणघेवाण झाली, असे काहीबाही सांगितले. अशोकने मनातल्या मनात कपाळावर हात मारून घेतला. कशीतरी सभा उरकणे चालले आहे हे लक्षात आले. ह्यांना समजेल अशा सोप्या आणि साध्या भाषेत चार गोष्टी सांगाव्यात असा विचार अशोक करू लागला. तेवढ्यात मास्तर बोलायला उठले. मास्तरांचा सारा मूडच गेला होता. ते म्हणाले, "बाबांनो ! जयंती म्हणजे जत्रा नव्हे. करायचीच असेल जयंती तर चांगली साजरी करा. पण तिची जत्रा नको. जत्रा करायचीच असेल तर त्याला जयंतीचे निमित्त न घेतलेले बरे..." आणि मास्तर चिडून बोलत राहिले.

सरतेशेवटी अशोक बोलायला उभा राहिला. त्याने सुरुवात केली. विषयाला प्रारंभ झाला आणि समोरची माणसे आपापसात कुजबूज करू लागली. त्यात टेबला-समोरच दोनतीन माणसे बसली होती. ती मोठमोठ्याने बोलू लागली. तसा अशोक थांबला. त्याने समोरच्यांना गप्प बसायला सांगितले. पुन्हा बोलायला सुरुवात केली. तेवढ्यात ती माणसे मोठमोठ्याने बोलू लागली. अशोकला त्याच्याच भाषणात संगती लागेना. तो थांबला. समोरच्या माणसांना म्हणाला, "अहो, एक तर तुमचं तरी बंद करा, नाही तर माझं तरी भाषण बंद करा."

समोरची माणसे थांबली. त्यातला एकजण म्हणाला, "करा."

"काय ? माझं भाषण बंद करू ?" अशोक संतापलाच.

"नाही. तुमचे भाषण चालू करा. आमचं बोलणं बंद करतो."

अशोकने पुन्हा संगती लावून बोलायला सुरुवात केली. तो एकेक मुद्दा सोपा करून सांगू लागला. समो-रच्या माणसांची बडबड थांबलीय म्हणून त्याने पाहिले तर ती माणसे जागेवरच नव्हती. चला, त्यामुळे आता चार शब्द तरी नीट बोलता येतील, असा विचार करून अशोक भाषणात प्राण ओतू लागला नि त्याच्या काना-वर आवाज आला,

"आरे, मी असा काय बोललो त्याला ? येवढा त्याला राग येण्याचं कारन काय ?"

प्रेक्षकांचं लक्ष विचलित झालं. अशोकचेही कान तीक्ष्ण झाले. जे ऐकायला मिळाले ते आपल्यालाच उद्देशून होतं हे त्याच्या लक्षात आलं आणि पाठीमागून शिवीगाळीचा आवाज. आपण येथे बोलणेच अयोग्य. अशोकने भाषण कसेबसे उरकते घेतले आणि तो खाली बसला. नंतर आभारप्रदर्शन झाले. अशोकला एक हार कसाबसा देण्यात आला आणि सभा संपली.

सभा संपल्याबरोबर जाधवमास्तरांपुढे उभा राहात अशोक म्हणाला, "गुरुजी, मी येतो."

"अरे, एवढ्या रात्रीचा कुठे जातोस ? थांब ना आजची रात्र."

"नका गुरुजी. नाही सहन होत हे. आता जाईन मी दोन तासात."

"अरे पण तू ऐकून तरी घे..."

मास्तर बोलायचा प्रयत्न करीत होते, परंतु तोपर्यंत अशोक त्या अंधारात गुडुप झाला होता. मास्तर मनात हसत म्हणाले, कशाला करायची त्या अंधाराची काळजी ? अशोकच्या आताच्या प्रकाशालाच तो अंधार घाबरेल. पण त्याचा अपमान व्हायला नको होता... कमीत कमी अशोकचा अपमान आपल्या गावात तरी व्हायला नको होता. पुटपुटत मास्तर पुन्हा दुसऱ्या कुशीवर वळले. त्या वेळी रात्र गडद झाली होती.

□ □

दलित कथा स्पर्धा : उत्तेजनार्ह

# गर्भपात

## चंद्रकांत देवकर



आज भिवा फारच खुषीत होता. त्या खुषीतच तो स्वतः रस्त्याच्या कामावर गेला नाही की बायकोला-पण जाऊ दिलं नाही. आज त्याचा मोठा मुलगा संपत संसाराला हातभार लावण्यास सुरुवात करणार होता. भिवा बायकोला सांगत होता, "अग पारबता, आज संपतनं आपल्या डोळ्याचं पारणं फेडलं. इक्ते दीस आपुन केलेल्या कस्टाचं चीज झालं. कसं अक्कलहुशारीनं त्यानं काम केलं वग. अगं त्यानं कोनाची तावेदारी ठिवली नाय. सिक्शान आसं थोडंच वाया जातंय !"

तसं पाहिलं तर काम करण्याचं, मिळवू लागण्याचं संपतचं हे वयच नव्हतं. पण म्हणतात ना, पाण्यात पडलं म्हणजे बुडू नये म्हणून माणूस हातपाय हलवतोच. त्यातलाच हा प्रकार. गेल्या वर्षीच तो १० वी पास झाला होता. पण उशीरा शाळेत घातल्यामुळे त्याला अठरावं वर्ष चालू होतं. मुळातच तो हुशार आणि चुणचुणीत. म्हणून त्याला पुढे शिकण्याची खूप इच्छा होती. त्याच्या मित्रांनी त्याला आग्रहही खूप केला होता की, आपण औरंगाबादला जाऊ...चांगलं शिकून ऑफिसर होऊ. पण संपत आपल्या घरची परिस्थिती चांगलीच जाणून होता. आईबाप दोघं खपूनसुद्धा घरात पोटभर अन्न अन् अंगभर कपडा मिळत नव्हता. त्याचा लहान भाऊ पाचवी शिकत होता. लग्नाची बहीण घरात होती. शिक्षणासाठी आणखी पाच वर्षं धीर काढणं शक्यच झालं नसतं. निदान पुढील वर्षी तरी बहिणीचं लग्न करायलाच पाहिजे. नाही तर लोक नावं ठेवतील याची त्याला पूर्ण जाणीव होती. परवाच हिरेअण्णांनी त्याच्या वडिलांना विचारलं होतं, "अरे भिवा, केवढी घोड-नवरी झाली तुझी पोर ! तुला काही काळजी आहे की नाही ?" यावर भिवाचा चेहरा किती पडला होता ! पण तोच "पाहिजे असेल तर हजार-पाचशे रुपये घेऊन जा अन् पोराला नोकरी लागल्यावर कर परत." ऐकून किती खुलला होता ! त्याच क्षणी संपतनं कॉलेजचा विचार मनातून काढून टाकला.

आता तो नोकरीच्या दृष्टीनं विचार करू लागला. पण नोकरी मिळणं हे आजकाल थोडंच सोपं राहिलंय? खूप खूप फिरूनसुद्धा त्याला नोकरी मिळाली नाही. आणि ती मिळणं शक्यही नव्हतं. कुठं वशिला, कुठं अनुभव, कुठं हातावर ठेवायला चिरीमिरी कमी पडली. यातच सहा महिने निघून गेले. आता शिक्षण घेत नसल्यामुळं त्याला आजकाल घरात फुकट खाणंसुद्धा अवघडल्यासारखं वाटू लागलं. कोणाच्या शेतावर अगर रस्त्याच्या कामावर जायला त्याचं मन धजेना. आणि शेवटी त्याला एक मार्ग दिसला.

दुसऱ्यावर अवलंबून राहाण्यापेक्षा स्वतःच स्वतःचा मार्ग तयार करण्याचं त्यानं ठरविलं. 'अत्त दीप भव' म्हणजे स्वतःच स्वयंप्रकाशित व्हा हे त्यानं कुठं तरी वाचलं होतं. त्यानुसार त्यानं सरळ बँकेला अर्ज केला. सुशिक्षित बेकार म्हणून कर्ज मिळवण्याचा त्याचा बेत होता. सर्व योजना तयार होती. याला दहा रुपये दे, त्याला वीस रुपये दे असं करता करता एकदाचं त्याचं कर्ज मंजूर झालं. बरेचसे कमिशनचे पैसे वजा जाता पैसेही हातात पडले.

कर्ज मिळालं तेव्हा संपत हवेतच तरंगत होता. दुकानाची योजना तयार होतीच. त्यानुसार तो कामाला लागला. सुदैवानं राहातं घर जरी मातीचं होतं तरी त्यात दोन खोल्या होत्या. भिवानं पुढच्या खोलीत दुकान थाटण्याची केव्हाच परवानगी दिली होती. कौतुकानं तो आपल्या लेकराची धडपड पाहात होता. सुताराला गाठून जरूर ते लाकडी सामान तयार करणं, निर-निराळ्या वस्तूंसाठी डबे तयार करणं, तराजू मिळवणं यात संपत पूर्ण गुरफटून गेला होता.

आणि एकदाचं किराणा मालाचं दुकान तयार झालं. 'समता प्रोव्हिजन स्टोअर्स'ची पाटी घरावर लागली. तशी गावात दोन दुकानं होतीच. त्यात बौद्धवाड्यातील हे तिसरं दुकान. अधिक टापटीप असलेलं. अधिक आकर्षक.





संपतचा होरा होता की, केवळ बौद्धवाड्यातील गिऱ्हाइकं जरी मिळाली तरी घरचा प्रपंच चालू शकेल. नंतर तो होजिअरी मालपण आणणार होताच. शहर या खेड्यापासून दहा-बारा मैल दूर असल्यामुळं प्रत्येकाला सर्व वस्तू शहरातून आणणं शक्य होत नव्हतं आणि खेड्यातील हातावर पोट भरणारी माणसं एवढे पैसे एकदम खर्चही करू शकत नव्हती.

सरळ मनानं केलेला हिशेब व्यवस्थित चालला होता. आईबाप बाहेर कामाला अन् दुकानात बहिणीची मदत. त्यामुळं त्याचं दुकान लवकरच भरभराटीस येईल अशी चिन्हं दिसू लागली होती. संपत मनातून खूष होता.

"ए संपत, २० पैशाच्या विड्या दे वरं."

"संपत, रुपयाचं गोडंतेल घाल."

"मला आठ आन्याची चहाची बुकनी दे बगू."

"आतपाव मुगाची दाळ दे. आन् हे वग, पैसं तुला आईतवारी दीन...राखुली आली म्हंजी."

असे संवाद संपतच्या कानी पडू लागले. तो भराभर पुड्या बांधून देत असे. कधीमधी त्याची वहीणपण जोडीला असायची. रास्त वजन, वाजवी भाव अन् जोडीला नम्रता या सर्वांचा संगम असल्यामुळं थोड्याच दिवसात बौद्धवाड्यातील गिऱ्हाइकं गावात जाईनाशी झाली.

आणि इकडं गावात बैठकी सुरू झाल्या. दोन्ही दुकानदार गावपाटील आणि सरपंच यांना भेटून काही-बाही सांगत होते. ग्रामपंचायतीच्या ऑफिसमध्ये संपतच्या दुकानाची चर्चा होऊ लागली. सगळ्यांच्या रागाचा पारा वर चढला होता. पण काय करावं यावर एकमत होत नव्हतं. एक तर गावातील दुकानांची विक्री कमी झाली होती आणि दुसरं म्हणजे एक बौद्ध मुलगा दुकान काढून कोणाचीही तावेदारी करायला नकार देत होता. प्रचलित समाज-व्यवस्थेवरच आघात झाला होता. यात उभ्या गावाची इज्जत पणाला लागली होती. बौद्धांनी कसं राहावं, कसं लाचारीनं जगावं आणि गावाची चाकरी करावी, हे सर्व ठरलेलं असताना आता हे एक विपरीतच घडलं होतं.

शेवटी ग्रामपंचायतीच्या ऑफिसमध्ये भिवाला बोलावणं आलं. भिवा घावरत घावरतच गेला. सर्व सभासद आपापल्या जागेवर वसलेले होते. भिवा बाहेरच उभा राहिला.

"आरं, भायेर उवा का? आत ये ना. आपुन समदी परमेसराची लेकरं! ये. आत ये." पाटील मधाळ आवाजात बोलले.

भिवा मनातून चरकला. हे मधाळ बोलणं त्याला नवीन होतं. तो अंग चोरून कोपऱ्यात उभा राहिला.

"काय भिवा, पोरानं दुकान काडलं म्हनं?" पाटलानं सहज चौकशी केल्याचं दाखवलं.

"व्हय पाटील. पोटापान्यासाठी विचारा करतोय काईतरी." भिवा बोलून गेला.

"आरं, पोरगा शिकला हाय. एवडुशा बुदवाड्यात काय दुकान टाकतो म्हनावं. इथं त्याचं काय भागंल?" पाटील वेरकीपणानं म्हणाले.

"आंधीच दोन दुकानं हायती गावात. रग्गड झाली तीच!" एक उद्गारला.

"म्हनून म्हंतो, शहरात जा. काई नऊकरी वग." पाटलानं खडा टाकून पाहिला.

"इथं काय खेड्यात कुजवतोस त्याला!" सरपंचानंही दुजोरा दिला.

"नगं नगं पाटील. लेकरू जवळच राहील म्हातारपनी. आन् पोटापुरतं मिळतं त्यावढं बास झालं." भिवा.

"मंग त्याला दुकान बंद करायला नाय सांगत?" पाटील सहजपणे बोलतात.

"आवो त्यानं गवरमेंटचं करज घेतलं. कोनाची ताबेदारी नको असं म्हणतोय तो." भिवा बोलून गेला.

"आरं, तुमचं दिवसच गुलामगिरीत गेलं. पायरीनं राहावा मान्सानं." एक न राहावून बोलतो.

"आता यात पायरीचा काय प्रस्न? आमी कुठं कोनाला तरास देतो?" भिवा.

"पन गावाला हे मंजूर हाय का?" पाटील.

"आता तर कोनीबी कोन्तावी धंदा करतो. बामन नाय बुटाचं दुकान चालवत?" भिवानं तिढा टाकला.

"वरं, वरं. चालू दे दुकान. तू ये आता." पाटलांनी हातानं खूण केली.

असं म्हणताच भिवा काळजीतच घराकडे निघतो.

"पाटील, हे काय केलं? त्याला आसंच सोडलं?" सर्वच पाटलांना विचारतात.

"हा समजूतदारपनानं नाय वठनीवर यायचा. ही जातच लय माजोर झाली. यांचा दानापानीच बंद करा–

(कॉंटिनेंटल प्रकाशन) गो. नी. दांडेकरांच्या 'कुणा एकाची भ्रमणगाथा' चे कन्नड रूपांतर. शिक्षिका, कन्याशाळा, सातारा

१९) प्रा. केशव मेश्राम– कथा, कविता, कादंबरी, समीक्षा इ. साहित्य प्रकारात ग्रंथलेखन. मराठीचे प्राध्यापक : ४ फुलराणी, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई ५१

२०) डॉ. यशवंत मनोहर– मराठीचे अधिव्याख्याता, कवी व 'समुचित' चे संपादक : नागपूर विद्यापीठ परिसर, अमरावती मार्ग, नागपूर १०

२१) श्री. वामन होवाळ– कथालेखक. १९९/७८८८ कन्नमवारनगर २, विक्रोळी (पूर्व), मुंबई ८३

२२) श्री. के. व्ही. सरवदे– आरा हिरालाल कसबे, लुंबिनी निवास, सरकारी धान्य भांडाराजवळ, कळंब (जि. उस्मानाबाद)

२३) श्री. भगवान हिरे– टाइप टू ए, ९३२ एच्. ए. एल्. ओझर टाउनशिप, ता. निफाड, जि. नासिक ४२२ २०७

२४) श्री. अप्पासाहेब खोत– मु. पो. जाखले, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर

२५) श्री. यशवंत वामन खरात– शिवाजी कॉलनी, जरीमरीनगर, पूना लिंकरोड, कल्याण (पूर्व), जि. ठाणे

२६) श्री. चंद्रकांत देवकर– टाइप थ्री बी/२२४ टाउनशिप ओझर, जि. नासिक ४२२ २०७

२७) श्री. भीमसेन देठे– ४०२ संध्या, ए, जनकल्याणनगर, मार्वे मार्ग, खारोडी, नं. १, मालाड (प.), मुंबई ९५

२८) सुरेखा भगत– टी. बी. सॅनिटोरिअम, बुल्ढाणा

२९) ज्योती लांजेवार– बी १७/२ रवीनगर, नागपूर १

३०) श्री. भुजंग मेश्राम– १७५५ शिवाजीनगर, अंबरनाथ (पूर्व), जि. ठाणे ४२१ ५०१

३१) श्री. माधव कोंडविलकर– मु. पो. देवरुख, ता. संगमनेर (जि. रत्नागिरी), ४१५८०४

३२) श्री. प्रल्हाद चेंदवणकर– वचूवाला बिल्डिंग, रूम नं. ५, हॉस्पिटल लेन, माझगाव, मुंबई १०

३३) श्री. त्र्यंबक सपकाळे– रेल्वे कॉलनी, पूर्णा (जं.), जि. परभणी

३४) डॉ. नीलकांत चव्हाण– ३१५२ चौक मंडई, बेळे गल्ली, नासिक १

३५) हिरा बनसोडे– ४०/४९ इसाक महंमद बिल्डिंग, पहिला मजला, भवानीशंकर रोड, दादर, मुंबई २८

३६) प्रा. भगवान भोईर– बी. एन्. एन्. कॉलेज, भिवंडी (जि. ठाणे) ४२१ ३०५ □□

## परिषदेचे नवीन आजीव सभासद

**पुणे विभाग :**

सदाशिव केशव कुलकर्णी, पांडुरंग कृ. गोवंडे, हेमंत ह. देवघर, उल्हास द. भावे, संगीता रा. गावडे, राम लालूजीराव कोत्तापल्ले, सौ. ज्योत्स्ना अनिल आफळे.

**पुण्याबाहेरील :**

श्री. संजय देशपांडे (इचलकरंजी), संजय शं. सुतार (इचलकरंजी), सौ. मीना मा. जगधने (श्रीरामपूर), सौ. शशिकला रा. शिंदे (श्रीरामपूर), प्रकाश रामराव निकमपाटील (श्रीरामपूर), दिनकर पोरवारापूरकर (श्रीरामपूर), रामचंद्र सुं. राऊत (श्रीरामपूर), मधुकर विष्णू भिडे (श्रीरामपूर), श्री. मुकुंद बापट (हैदराबाद), श्री. मधुकर पातकर (कोल्हापूर), श्री. जगन्नाथ वि. दुर्गुळे (नेर्ले-सांगली).

## परिषद-वार्ता

( १ सप्टेंबर ८७ ते १५ ऑक्टोबर ८७ अखेर )

**कै. बालकवी त्र्यंबक बापूजी ठोंबरे स्मृतिदिन :** कै.बालकवी स्मृतिदिनानिमित्त दि. १४ सप्टेंबर ८७ रोजी श्री. नारायण सुर्वे यांचे 'साठोत्तरी मराठी कविता' या विषयावर भाषण झाले.

**कै. सावित्रीबाई वार्लिगे स्मृत्यर्थ व्याख्यान :** दि. २९ सप्टेंबर ८७ रोजी कै. सावित्रीबाई वार्लिगे स्मृत्यर्थ श्री. यदुनाथ थत्ते यांचे 'नवी संस्कृती' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. म. म. प्रा. द. वा. पोतदार स्मृतिदिन :** म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचे स्मृतिदिनी दि. ६ ऑक्टोबर रोजी प्रा. राजा दीक्षित यांचे 'इतिहासाचे मारेकरी' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षपदी डॉ. अ. रा. कुलकर्णी हे होते.

या प्रसंगी पहिलेच 'म. म. प्रा. द. वा. पोतदार स्मृतिपारितोषिक' (रु. २५१।–) डॉ. जयसिंगराव पवार यांच्या 'सेनापती संताजी घोरपडे' या ग्रंथास अध्यक्षांच्या हस्ते देण्यात आले.

**६१ व्या ठाणे साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांचा सत्कार :** ठाणे येथे जानेवारी ८८ मध्ये होणाऱ्या ६१ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांचा परिषदेतर्फे जाहीर सत्कार समारंभ दि. १५ ऑक्टोबर ८७ रोजी परिषदेच्या सभागृहात पार पडला.

अध्यक्ष श्री. शंकर पाटील हे होते. प्रा. द. मा. मिरासदार, श्री. चित्तरंजन कोल्हटकर, प्रा. वीणा देव, डॉ. वि. भा. देशपांडे यांची याप्रसंगी भाषणे झाली. प्रा. कानेटकर यांचा हार, गुच्छ व परिषद प्रकाशने भेटीदाखल देऊन सत्कार करण्यात आला. इंदूर येथे होणाऱ्या अ. भा. मराठी नाट्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. चित्तरंजन कोल्हटकर यांचा याप्रसंगी हार, गुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

### श्रद्धांजली सभा :

**स्व. महादेवी वर्मा :** महाराष्ट्र साहित्य परिषद व महाराष्ट्र राष्ट्रभाषा प्रचार समिती यांच्या तर्फे सुप्रसिद्ध साहित्यिका स्व. महादेवी वर्मा यांच्या निधनाबद्दल दि. २५ सप्टेंबर रोजी शोकसभा आयोजित करण्यात आली होती. अध्यक्षा सौ. ज्योत्स्ना देवधर या होत्या. या सभेत डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. सिंधू भिंगारकर, डॉ. ह. श्री. साने, डॉ. चंद्रशेखर बर्वे यांची भाषणे झाली. शेवटी दुखवट्याचा ठराव संमत करण्यात आला.

**कै. डॉ. भीमराव कुलकर्णी :** परिषदेशी निष्ठावंत कार्यकर्ते, माजी कार्याध्यक्ष, कार्यवाह, पत्रिका संपादक अशा विविध नात्यांनी संबंधित डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या दुःखद निधनाबद्दल दि. ९ ऑक्टोबर ८७ रोजी शोकसभा आयोजित करण्यात आली होती. श्री. शंकर

पाटील सभेचे अध्यक्ष होते. याप्रसंगी श्री. राजेंद्र वनहट्टी, डॉ. द. दि. पुंडे, प्रा. शं. ना. नवलगुंदकर, डॉ. ललिता कुंभोजकर यांची भाषणे झाली. शेवटी दुखवटयाचा ठराव संमत करण्यात आला.

**कै. प्रा. म. वि. फाटक :** परिषदेच्या ठाणे शाखेचे प्रथमपासूनचे कार्यकर्ते, माजी उपाध्यक्ष, कार्यकारी मंडळ सदस्य इ. विविध नात्यांनी परिषदेशी संबद्ध असलेले प्रा. म. वि. फाटक यांच्या दुःखद निधनाबद्दल दि. ३ ऑक्टोबर ८७ रोजी शोकसभा आयोजित करण्यात आली होती. या सभेत डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रा. म. ना. अदवंत, प्रा. हृ. श्री. शेणोलीकर. श्री. म. श्री. दीक्षित यांची भाषणे झाली. शेवटी दुखवटयाचा ठराव संमत करण्यात आला.

## वार्षिक साधारण सभा :

परिषदेची वार्षिक साधारण सभा पूर्व सूचनेनुसार रविवार दि. २७-९-८७ रोजी दुपारी ४-३० वाजता परिषदेत झाली. पुरेशा गणसंख्येच्या अभावी घटनेनुसार सभा ४-४५ ला सुरू झाली. श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखाली सभेस सुरुवात झाली. ८६–८७ चे कार्यवृत्त, उत्पन्न खर्चपत्रक, ताळेबंद आणि ८७–८८ चा अर्थसंकल्प संमत करण्यात आला. सर्वश्री. वि. श्यं. शेटे, अरविंद पाटोळे, म. श्री दीक्षित, क. नी. किंकर, विश्वनाथ खैरे, वसंत गाडगीळ, पु. ए. कडूरकर इ. सदस्यांनी चर्चेत भाग घेतला व विधायक सूचना केल्या.

चालू कार्यकारी मंडळाच्या कारकीर्दीतील ही शेवटची सभा असल्याने या तीन वर्षांत कार्यकारिणीने जे नवे उपक्रम केले त्याबद्दल अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी गौरवोद्‌गार काढले. कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र वनहट्टी यांनी श्री. शंकर पाटील हे नामधारी अध्यक्ष म्हणून न राहाता कार्यकारी मंडळास सक्रीय सहकार्य देणारे क्रियाशील अध्यक्ष आहेत असे सांगून त्यांचे आभार मानले. नंतर परिषदेचे निष्ठावंत कार्यकर्ते व विविध पदे भूषविणारे डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या दुःखद निधनाबद्दल सभेने उभे राहून श्रद्धांजली वाहिली.

**राजा फडणीस, ज्योत्स्ना देवधर, प्रभाकर अत्रे (कार्यवाह)**

□ □

## परिषदवार्ता

**– म. सा. प. जळगाव जिल्हा शाखा वृत्तांत– १९८६–८७**

१) विचारवंत आणि साहित्यिक प्रा. अरविंद मंगरूळकर यांचे दि. २७ मे १९८६ रोजी निधन झाले. त्याचप्रमाणे मराठीतील ख्यातनाम विचारवंत, तत्त्वज्ञ, साहित्यिक, पत्रकार आणि माजी खासदार श्री. पु. य. देशपांडे यांचे दि. २६।७।८६ रोजी दीर्घ आजारानंतर निधन झाले. या दोघांना दि. ३१।८। ८६ च्या कार्यकारिणीच्या सभेत भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

२) दि. ३ ऑक्टो. ८६ रोजी मराठीतील प्रख्यात समीक्षक प्रा. स. शि. भावे यांचे दुःखद निधनाबद्दल त्यांना दि. ४।१०।८६ रोजी भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

३) दि. २ ऑक्टो. ८६ रोजी श्री. भागवत चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली 'हिंदी व्यंगछटा' या विषयावर जळगाव येथील हिंदी साहित्यातील लेखक डॉ. शंकर पुणतांबेकर यांचे व्याख्यान झाले.

४) पंजाबी साहित्यिक 'अमृता प्रीतम' यांनी लिहिलेल्या 'रसीदी टिकट' या आत्मचरित्रावर आधारित 'आत्मचरित्राच्या कसोटीवर रसीदी टिकट' या विषयावर धुळे येथील डॉ. मु. ब. शहा यांचे दि. ४ ऑक्टो. ८६ रोजी श्री. भागवत चौधरी यांचे अध्यक्षतेखाली अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले.





यला पायजे." असं म्हणून पाटलानं युसुफ गिरणीवाल्याला बोलावणं पाठवलं.

युसुफसुद्धा काळजीत पडला. त्याला कळेना की, पाटलाचं आपल्याशी काय एवढं अर्जंट काम अडलंय. युसुफ आल्यावरोबर पाटलानं हुकूम सोडला– –

"ये देक युसुफ, ये म्हारडे बौत माज गये. तुम कलसे त्यांचे दलन तुम्हारे चक्कीपर दलो मत."

"ऐसा कैसा पटेल ? ये तो मेरा धंदा हाय...आपबी पैसा देता, वोबी पैसा देता हाय." युसुफने युक्तिवाद केला.

"तेरा धंदेका नुकसान मी भरून देल. मंग तो हो गया ना ?" पाटील.

"पटेल, वो गरीव लोग हाय. मिहनत-मजदुरी करते और पेट भरते. मैं उनपर काहेको अन्याय करू?" युसुफ.

"तुम आयकनार हाय का नाय ?" पाटील.

"पटेल, उनकेपास ना गाडी ना घोडा. वो किधर जायेंगे पिसनेके वास्ते ? मैं ऐसा करूंगा तो मेरा अल्ला मुझे माफ नही करेगा." युसुफ.

"युसुफ, तुम इचार करो." पाटील.

"केला पटेल. तुमारे झगडेमे मुझे कायको बीचमे डालते ?" युसुफ.

युसुफ गेल्यावर पाटील वाघासारखा चवताळला. त्याने दोघांचीही खोड मोडण्याची प्रतिज्ञा केली. तिथल्या तिथंच विचार झाला. युसुफच्या गिरणीवर कोणीही दळायला जायचं नाही. गावातील सर्व दळणं शेजारच्या गावातून दळून आणायची. त्यासाठी पाटलानं आपला ट्रॅक्टर मोठ्या उदार मनानं देऊ केला आणि गावाची दळणं आठवडयातून दोन वेळा शेजारच्या गावातून दळून आणायचं ठरलं.

इकडे युसुफचा धंदा खाडकन् बसला. त्याला पाटलाची चाल कळते. पण तो माघार घ्यायचं नाव घेत नाही. पाटलाला वाटतं की, दोन आठवडयात युसुफ नाक घासत समोर येईल. पण युसुफ बौद्धवाडयात जातो. सर्व कहाणी ऐकवतो. काही हळहळतात. काही चिडतात. पण सर्वांच्या वतीनं त्याला वचन दिलं जातं की, "आमच्या बौद्धवाडयाला तुझं एक घर पोसणं काही जड नाही. तुला आम्ही आमच्या घासातील घास देऊ. पण तू काही केल्या पाटलाला शरण जाऊ नकोस."

असाच महिना जातो. शेवटी पाटील रघ्याला बोलावून घेतो...रघ्या ३०–३२ वर्षं वयाचा. शरीरानं भरलेला. पण डोक्यानं रिकामा. संपतच्या घराशेजारीच त्याचं घर असतं.

"रघ्या, तुजा बाप मेला. त्याच्या दिवसाला तू ५०० रुपये करजं घेतलं. आजून तू काय परत केलं नाय." पाटील.

"पाटील, या गव्हाच्या पिकावर देऊन टाकतो." रघ्या.

"पन तू मांगल्या सालचा वायदा केल्तास." पाटील.

"काय सांगू पाटील...कारभारनीला आजार झाला तव्हा तिला मुंबैला न्यावी लागली." रघ्या लाचारीनं बोलत होता – "लय पैका खरच झाला."

"तुज्या जमिनीचे कागुद माज्याकडंच हाय हे इसरलास जनू ! कोरटात गेलो तर ताबा मिळनं काय कठीन जानार नाय." पाटलानं रघ्याला भीती दाखविली.

"नाय पाटील, असं काही करू नका. पोरावाळांकडं तरी बगा." रघ्या काकुळतीला आला.

"बघितलं असतं, पन..." पाटील.

"पन...पन काय पाटील ?" रघ्या.

"एक काम केलं तर तुला पैक्याची सूट दील."

"काम तर सांगा..." रघ्याच्या आशा पल्लवित झाल्या.

"संपत्याचं दुकान बंद करायचं."

"आन् ते का बरं ?"

"तुजी जमीन जाऊ नये म्हनून. काम सादं हाय." पाटील.

"बगतो इचार करून."

"इचार कसला ? जमीन जानार नाय. पैक्याची सूटबी मिळल."

"ठरलं पाटील. तुमी उद्या पाहाच."

रघ्या लगेच घरी निघतो. रस्त्याने त्याच्या विश्वासातील चार टगे गाठतो. त्यांना सांगतो, "अरे, या संपत्यानं सगळा इस्कोट केला."

संपतचं चांगलं चाललेलं पाहून त्यांची माथी भडकली होती. टिचभर पोरगा आन् ही हुन्नर !

"आजपोत्तर कसं गुन्यागोविंदानं राहात व्हतो."

"गावात मान व्हता. विज्जत व्हतो."

"चार रुपये मागितले त कोनी नाय म्हनत नवते."

"आता तर कोनी बोलायलावी तयार नाय."

"अन् हा बसला बिनघोर दुकान चालवीत. ऊन नाय का तहान नाय."

"हे दुकान बंद केलं तरच आपल्याला मांगाल्ले दीस येतील."

"मंग आता उसीर कशाला ? चला दुकान फेकून देऊ. मोडून टाकू."

संपत साखरेचे १००–१०० ग्रॅमचे पुडे तयार करीत बसला होता. चार लोक आपल्या दुकानाकडे आलेले पाहून त्याची कळी खुलली.

"काय रघूजी, कारभारी, सखाराम, नरहरी... जयभीम...या. बसा. विडचा पाहिजे का तंबाखू ? आत्ताच शहरातून माल आणला." संपत त्यांचं आपुलकीनं स्वागत करतो.

"विडचा नको, तमाखूच दे. गाय छाप." रघ्या.

तंबाखूची पुडी घेण्यासाठी संपत मागे वळला. तीच संधी साधून रघ्याने संपतच्या डोक्यावर काठीचा दणका दिला. संपत तेव्हाच बेशुद्ध पडला. रघ्याच्या जोडीदारांनी दुकानातील सर्व सामान इकडे तिकडे अस्ता, व्यस्त फेकून दिला. साखरेत गोडतेल, डाळीत माती. खोबऱ्याचे तेल इतर मालावर ओतून बरण्या, डबे, काठचा मारून फोडून टाकले.

दोन महिन्यांनी एका संध्याकाळी संपत आपल्या बापाबरोबर बोलत होता.

"आपली केस इतकी मजबूत असताना अजूनही रघू मोकळाच आहे."

"अरं, त्याला पाटलाचं पाठवळ हाय. आपल्या गरीबाचं तिथं कोन आयकतं ?"

"तुमचं म्हणणं खरं आहे बाबा. कारण मी जेव्हा-जेव्हा चौकशीला पोलीस स्टेशनवर गेलो, तेव्हा तेव्हा मला उडवाउडवीची उत्तरं मिळाली."

"त्यानला पाटलाकडून मलिदा मिळाला असंल."

"पण आता सुशिक्षित बेकार म्हणून मी काढलेलं कर्ज डोक्यावर आहे त्याचं काय ? कर्ज तर फेडायलाच पाहिजे."

"माजं तर काय डोस्कं चालंना बग. तूच सांग काय करायचं ते. मी तुज्यासाठी कितीबी खपायला तयार हाय."

दुसऱ्या दिवशी सकाळच्या कोवळचा उन्हात संपत कुदळफावडे घेऊन आईबापाबरोबर सडकेच्या कामासाठी निघाला. वाडचाच्या खिडकीतून त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहाणारे पाटील गालातल्या गालात हसत होते.

□ □

# मराठी दलित साहित्याची सूची

**डॉ. हरिश्चंद्र निर्मळे**



**१. काव्यसंग्रह**

अमिताभ : तिन्गा
इंगळे अरुणकुमार : अवलाद
इब्राहीमखान : अस्तित्वरेषा
कदम सुरेश : अंतरा, काळा सूर्य
कपूर डब्ल्यू. : बंधमुक्त
कल्याणकर बा. ह. : जागल
कांबळे अर्जुन : अनादि
कांबळे अरुण : कविता १९७०–८३
कांबळे चोखा : पिंपळपान
कांबळे नरेश : अंगार
कांबळे नारायण : चितळाय
कांबळे बळवंत : निषेध, नापत
कांबळे बाबूराव : चैत्य
कांबळे रमेशचंद्र (संपा.) : बेदर्दी है हंगामा
कोकाटे अर्जुन : अस्वस्थ शतक

कोत्तापल्ले नागनाथ : मूडस्
खरात प्रकाश : निर्मितीचा प्रदेश
खरात ह. शि. : स्वप्नवास्तव
खंडारे देवीदास : विद्रोह
खैरमोडे चां. भ. : अमृतनाक
गायकवाड ज्ञा. का. : गीतगुंजन
गिमेकर परशुराम : वडारवाडी
गौतम प्रज्ञावंत : माझा द्वेप पोसलाय
चव्हाण नीलकांत : निखारा, माणूस झाड, वज्रमूठ (संपा.)
चहांदे ववन : उच्छेद
चेंदवणकर प्रल्हाद : ऑडिट
जगताप वापूराव : निळ्या पहाडाच्या कविता
जाधव प्रकाश : दस्तखत
जाधव प्रेमसिंग : वलय
जावळे वी. जी. : बुद्धांकुर
डहाळे माधव : उकंडा, हेलपाटा, दुःखाची चादर
डांगळे अर्जुन : छावणी हलते आहे
ढसाळ नामदेव : गोलपिठा, प्रियदर्शिनी, तुही इयत्ता कंची ?, मूर्ख म्हाताऱ्याने डोंगर हलवले
दुतोंडे राम : रापी जेव्हा लेखणी बनते
दुधलकर दे. शि. : पलिता
देठे भीमसेन : होरपळ
देशमुख शरद : ग्रासलेला सूर्य
निंवाळकर वामन : गावकुसावाहेरील कविता
परसावळे भ. मा. : आरोह
पवार ज. वि. : नाकेवंदी, उच्छ्वास युगंधराचे (संपा.)
पवार दया : कोंडवाडा
पाटील अशोक : बस्तान
पाटील–गोसावी : प्रहार (संपा.)
प्रातिनिधिक दलित कवी : विप्लव
बनसोडे भागवत : दळाकांडा
बनसोडे हरीश : हू विल डायग्नोझ इट ?
बनसोडे हिरा : फिर्याद
बसाखेत्रे राम : भावगंधा
बावस्कर उत्तम : विद्रोह
बोर्डेकर रमेश : क्रांतिधारा
बोन्हाडे शंकर : मरणगाथा
मनोहर यशवंत : उत्थानगुंफा
मेश्राम केशव : उत्खनन, जुगलबंदी, अकस्मात, विद्रोही कविता (संपा.)
मेश्राम भुजंग : मोहोळ (संपा.)
मोरे दामोदर : विमुक्त
रंगराव वी. : ईडिपस
लाळे नारायण : शंखध्वनी
लांजेवार ज्योती : दिशा
लिंवाळे शरणकुमार : उत्पात, दलित प्रेमकविता (संपा.)
लोणे दु. मो. : घुगऱ्या
वसेकर विश्वास : कोरस
वाघमारे घोंडीराम : हुंदका
वाघमारे वसंत : अक्षरे
शिगवण भाऊ : स्मृतिगंध
शिंदे फ. मुं. : सार्वमत, जुलूस, फकिराचे अभंग, दिल्ली ते दिल्ली
शिंदे विठ्ठल : निखारे फुलताहेत
शेवरे आ. सो. : गांधारीची फुले
सपकाळे त्र्यंबक : सुरुंग, सापळा
सातपुते भारत : जगणं माणसाचं
सावंत उषा : रक्तखुणांचं स्वस्तिक
सुर्वे नारायण : ऐसा गा मी ब्रह्म, माझे विद्यापीठ, जाहीरनामा, सनद, सर्व सुर्वे
सुर्वे श्रीरंग : शहर नग्न होताना
सूर्यवंशी गौतम : कुरुक्षेत्र
सोळुंके प्रल्हाद : मळवट
हडसनकर रविचंद्र : ठिणगी, देणगी
हाळमकर सोपान : आक्रोश
हिवराळे मुखराम : शब्दायन

## २. कथासंग्रह

अमिताभ : पड
आल्हाट वाळ : जन्मठेप
कांबळे तु. लि. : जळ
कोंडविलकर माधव : निर्मळ
कोत्तापल्ले नागनाथ : काफिला, कर्फ्यू

खरात शंकरराव : सांगावा, दौंडी, बारा बलुतेदार, तडीपार, गावशिव, सुटका, लिलाव, टिटवीचा फेरा, मुलाखत, आडगावचे पाणी, आज इथं उद्या तिथं
गज्वी प्रेमानंद : लागण
चंदनशिवे भास्कर : मरणकळा
जोंधळे महावीर : अक्कलकन्याची फुले, मूरलँडस्
डोळस अविनाश : महासंगर
डांगळे अर्जुन : ही बांधावरची माणसं
पवार दया : विटाळ
बंधुमाधव : आम्हीही माणसं आहोत, पेटलेले आकाश
बागूल बाबूराव : जेव्हा मी जात चोरली होती, मरण स्वस्त होत आहे, सूड, अघोरी
भोसले विश्वास : बहिष्कार
माटे श्री. म. : उपेक्षितांचे अंतरंग
मेश्राम केशव : पत्रावळ, खरवड, रुतलेली माणसे (व्यक्तिचित्रे)
मेश्राम योगेंद्र : रक्ताळलेली लक्तरे
वाघचौरे भीमराव : मरणावळ
वाघमारे योगीराज : उद्रेक, बेगड, गुडदाणी
हिरवाळे सुखराम : औंभाळ आणि जागरण
होवाळ वामन : बेनवाड, येळकोट

३. कादंबरी

कसबे माधव : नकुल
कांबळे उत्तम : श्राद्ध
कांबळे शांताराम : अपराध मुक्ती अपराध सावली, अघोरी योजना
कोंडविलकर माधव : वेध, छेद, अनाथ, झपाटलेला, अजून उजाडायचं आहे
कोत्तापल्ले नागनाथ : गांधारीचे डोळे
खरात शंकरराव : पारधी, झोपडपट्टी, मी मुक्त— मी मुक्त, टाउट, मी माझ्या गावाच्या शोधात, फूटपाथ नं. १
गवळे जयप्रकाश : वेदना
गायकवाड सुधाकर : शूद्र
जाधव कल्पना : उपेक्षिता
जाधव ना. ब. : राजाभाऊ, अपर्णा, डॉ. अंजना
ढसाळ नामदेव : हाडकी हाडवळा
तुपे उ. बं. : इंजाळ
देठे भीमसेन : इस्कोट
नेरूरकर प्र. श्री. : रस्ता (अनु.)
पगारे हरीभाऊ : युगप्रवर्तक
पवार ज. वि. : बलिदान
पुरोहित तुकाराम : प्रतिज्ञा
पोवार सुधीर : अस्मिता
प्रभुदेसाई बाळकृष्ण : नायक
बंधु माधव : बगसम्राट
बनसोडे हि. गो. : मुक्तिसंग्राम, उज्ज्वला, आभाळा-एवढी
भोसेकर मुरलीधर : सिद्धार्थाची यशोधरा
मूल सुशील : सम्बुद्ध
मेश्राम केशव : पोखरण, हकीकत आणि जटायु
व्हटकर अशोक : मेलेलं पाणी, बगाड, फॉक्सर
शिंदे भि. शि. : रायनाक, अमृतनाक
शेंडे ना. रा. : काजळी रात्र, अन्शुजा, तांबडा दगड, विलासिनी
शेंडे निशिकांत : कलंकमुक्ती
साठे अण्णाभाऊ : फकिरा, वैर, निखारा
साठे शंकरभाऊ : सूड, सुगंधा, घमंडी, एकच काडतूस
साधू अरुण : बहिष्कृत, शापित
सिरसट विजय : कुस्ती
सुर्वे नारायण : दादर पुलाकडची मुले
हाटे बा. स. : युगविधान

४. आत्मकथा

अचलखांब रुस्तुम : गावकी
अमरशेख मल्लिका : मला उद्ध्वस्त व्हायचंय
कांबळे शांताबाई : माज्या जल्माची चित्तरकथा
कोंडविलकर माधव : मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे
खरात शंकरराव : तराळ-अंतराळ
जाधव पा. ऊ. : मान्हुडा
जाधव मुरलीधर : कार्यकर्ता
झोगडे ना. सं. : फांजर
तुपे उत्तम बं. : काटयावरची पोटं
पवार दया : बलुतं
पावडे कुमुद : अंतःस्फोट
पोळके पार्थ : आभरान

भावे सुमित्रा : तवा चुल्यावर (संपा.)
माने लक्ष्मण : उपरा
मोरे दा. म. : गवाळ
लिंबाळे शरणकुमार : अक्करमाशी
वाघमोडे गुलाब : रानभैरी
व्हटकर नामदेव : कथा माझ्या जन्माची
संत ज. गो. : असा मी जगलो (संपा.)

## ५. नाटक/एकांकिका

अचलखांब रुस्तुम : कैफियत
कांबळे बाबूराव : न्याय
कांबळे मधुकर : शिवार माखलं रक्तानं
गज्वी प्रेमानंद : देवनगरी, घोटभर पाणी
गंगावणे प्रताप : सायंतारा
चव्हाण रामनाथ : साक्षीपुरम्, आधारस्तंभ, वायको मी देवाची
चिटणीस म. भि. : युगयात्रा, जिवंत झाल्या सावल्या
दुपारे प्रभाकर : उत्सव, जयक्रांती, साता समुद्रापलीकडे
पवार रमेश : उकिरडा
फडके भालचंद्र : दलित रंगभूमी (संपा.)
भगत दत्ता : आवर्त, चक्रव्यूह
व्हटकर नामदेव : डाग, वाट चुकली
शिंदे जगन्नाथ : आक्रोश
शिंदे भि. शि. : काळोखाच्या गर्भात, भिक्षुणी वासवदत्ता, भूमिपुत्र
साठे अण्णाभाऊ : इनामदार, नवे तमाशे
सावरकर वि. दा. : संगीत उःशाप

## ६. ललित/वैचारिक गद्य

कोत्तापल्ले नागनाथ : पापुद्रे
कोंडविलकर माधव : देवदासी
चित्रे पद्मनाभ : प्रिय बाबा
पवार दया : चावडी
माने लक्ष्मण : बंद दरवाजा
मेश्राम केशव : छायाबन, शब्दांगण, गाळ आणि आभाळ
वसेकर विश्वास : रेघोट्या
वाघमारे जनार्दन : हाक आणि आक्रोश

## ७. चरित्रे

अत्रे प्र. के. : दलितांचे बाबा
कांबळे वी. सी. : समग्र आंबेडकर चरित्र, खं. १ ते ८
कीर धनंजय : डॉ. बाबासाहेब आंबेडकर
कुलकर्णी भीमराव : डॉ. बाबासाहेब आंबेडकर
खैरमोडे चां. भ. : डॉ. भीमराव रामजी आंबेडकर चरित्र, खं. १ ते ८
घोरपडे एकनाथ : डॉ. बाबासाहेब आंबेडकर
पगारे तुलसी : भारतीय घटनेचे शिल्पकार
पवार दया : कल्लपा ढाले यांची दुर्मीळ डायरी (संपा.)
पेंडसे सु. चिं. : राष्ट्रोद्धारक डॉ. आंबेडकर
फडके भालचंद्र : डॉ. बाबासाहेब आंबेडकर
बागूल बाबूराव : आंबेडकर भारत
लिमये मधू : डॉ. आंबेडकर : एक चिंतन
साठे शंकरभाऊ : माझा भाऊ अण्णाभाऊ

## ८. समीक्षा

आडसूळ भाऊसाहेब : डॉ. आंबेडकर प्रेरणेचे साहित्य (संपा.)
कर्डक भीमराव : आंबेडकरी जलसे
कवठेकर बाळकृष्ण : दलित साहित्य : एक आकलन
कऱ्हाडे सदा : दलित साहित्याच्या निमित्ताने
कुंभोजकर ललिता : दलित कविता : एक दर्शन
कुरुंदकर नरहर : भजन
कुलकर्णी गो. ग. : साहित्य : दलित व ललित
कुलकर्णी गो. म. : दलित साहित्य : प्रवाह आणि प्रतिक्रिया
खरात शंकरराव : दलित वाङ्मय : प्रेरणा व प्रवृत्ती
डांगळे अर्जुन : दलित साहित्य : एक अभ्यास (संपा.)
निंबाळकर/मनोहर : दलितांचे विद्रोही वाङ्मय (संपा.)
निर्मळे हरिश्चंद्र : दलितांची नियतकालिके
पाटील म. सु. : दलित कविता
पाटील/लांजेवार : समकालीन साहित्य : प्रवृत्ती आणि प्रवाह
पाध्ये दिगंबर : नारायण सुर्वे यांची कविता
पानतावणे गंगाधर : मूल्यवेध, मूकनायक, विद्रोहाचे पाणी पेटले आहे, दलितांचे प्रबोधन, वादळाचे वंशज
पानतावणे/नलगे : दलित कथा (संपा.)
पोतदार माधव : अमरशेखांची कविता
फडके भालचंद्र : दलित साहित्याची प्रकाशयात्रा
दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह
बागूल बाबूराव : दलित साहित्य : आजचे क्रांतिविज्ञान
भागवत शोभा : दलित पुरुषांच्या आत्मचरित्रातील स्त्री प्रतिमा
मनोहर यशवंत : दलित साहित्य : सिद्धांत व स्वरूप
मांडे प्रभाकर : दलित साहित्याचे निराळेपण
मुलाटे वासुदेव : सहा दलित आत्मकथने
मेश्राम केशव : समन्वय
रणपिसे अप्पा : दलितांची वृत्तपत्रे
वानखडे म. ना. : दलितांचे विद्रोही वाङ्मय
सोनवणे विजय : दलित साहित्य का नको ?

९. संकीर्ण

अवचट अनिल : वाघ्यामुरळी
आढाव बाबा : एक गाव एक पाणवठा
इंगळे रामचंद्र : महारांचा सांस्कृतिक इतिहास
कसबे रावसाहेब झोत, आंबेडकरवाद,
आंबेडकर आणि मार्क्स;
आंबेडकर आणि भारतीय राज्यघटना
कांबळे अरुण : रामायणातील संस्कृतिसंघर्ष
कांबळे झुंबरलाल : महाडचा मुक्तिसंग्राम
कीर्ती विमल : धर्मांतर, प्रेरणा व प्रयोजन
कुबेर वा. ना. : आंबेडकर विचारमंथन,
कोसारे एच. एल. : विदर्भातील दलित
चळवळीचा इतिहास
खरात शंकरराव : अस्पृश्यांचा मुक्तिसंग्राम,
डॉ. आंबेडकरांचे धर्मांतर,
डॉ. आंबेडकरांच्या सहवासात,
डॉ. आंबेडकरांची पत्रे
खांडेकर ताराचंद्र : दलितांचे धर्मांतर : एक मीमांसा,
आंबेडकर तत्वज्ञान : प्रचीती व आविष्कार
खैरमोडे चां. भ. : महार लोक (अनु.)
शूद्र पूर्वी कोण होते ? (अनु.)
गडकरी जयंत : प्राचीन भारतीय समाजरचनेतील
शूद्रांचे स्थान
गणवीर रत्नाकर : डॉ. आंबेडकरांचे विचारधन,
डॉ. आंबेडकरांचे 'बहिष्कृत भारता'तील
अग्रलेख (संपा.),
डॉ. आंबेडकरांचे 'बहिष्कृत भारता'तील
स्फुटलेख. (संपा.),
डॉ. आंबेडकरांची विलायतेहून पत्रे (संपा.),
महाड समता संगर (संपा.)
गवळी पी. ए. : पेशवेकालीन गुलामगिरी व अस्पृश्यता
गांजरे मा. फ. : डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची
भाषणे, खं. १ ते ६ (संपा.),
गांधीवाद : अस्पृश्यांना एक अभिशाप
गाढवे शं. गु. : सातपुते घराण्याचा इतिहास
गोरे ना. ग. : महाराष्ट्रातील दलित : शोध आणि बोध
जाधव रा. ग. : निळे पाणी–निळी पहाट–निळी क्षितिजे
झेलियट एलिनार : डॉ. आंबेडकरांचे नेतृत्व
ताकसांडे मधुकर : मराठवाड्यातील दलित अत्याचार :
शोध आणि बोध
दादूमिया : दलितांचे राजकारण
दलितस्थान झालेच पाहिजे.
नलगे/पानतावणे : दलित आत्मकथन
निंबाळकर वामन : अस्मितादर्शची नऊ वर्षे
पगळेकर दि. मु. : हरिजनांच्या सहवासात
पंडित नलिनी : स्वातंत्र्योत्तर दलितांच्या समस्या.
बागल माधवराव : सामाजिक विचारमंथन
मून वसंत : आंबेडकरपूर्व दलित चळवळ
रणदिवे एम. व्ही. : ईश्वरशाहीविरुद्ध संघर्ष
राजभोज पां. ना. : अस्पृश्यांची मुक्तता, दलितांचा खलिता
लिहिणार त्र्यं. ना. : गांधीवादी रामराज्य की
आंबेडकरवादी अशोकराज्य ?
लोंढे उद्धव : दलित समस्या : सामाजिक विचारमंथन
शेंडे ना. रा. : दलितांचे जग : वेदना आणि शिष्टाई
साळवेकर मा. ह. : अस्पृश्यता आणि धर्म
क्षीरसागर/पवार : प्रबुद्ध भारतातील अग्रलेख (संपा.)

१०. नियतकालिके

अरुण
अस्तित्व
अस्मितादर्श
गरुड
जनता
जयभीम
जागृती
जातक
दलित निनाद
दलितबंधू
दलितसेवक
नजर
निकाय
निर्धार
पतितपावन
प्रभा
प्रबुद्ध भारत
प्रज्ञा
बहिष्कृत भारत
बोधिसत्त्व
भारतभूषण
भीमवाणी
भीमगर्जना
भीमयुग
मराठी हरिजन
मूकनायक
मुक्ती
लोकजागृती
समता
सारथी
सिद्धार्थ
सुगावा
सोमवंशीय मित्र इ.

□ □

## महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ
## 'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे ४११ ००४

# पाठ्येतर प्रकाशने

पाठ्यपुस्तक मंडळाने तयार केलेली पाठ्येतर प्रकाशने, साहित्य व अन्य साहित्य मंडळाच्या गोरेगाव (मुंबई), पुणे, नागपूर, औरंगाबाद येथील विभागीय भांडारात तसेच अमरावती, कोल्हापूर, नाशिक व लातूर येथील उपभांडारात उपलब्ध आहेत. या पाठ्येतर पुस्तकांमध्ये शारीरिक शिक्षणाची पुस्तके, शिक्षक मार्गदर्शिका, विद्यार्थ्यांसाठी इयत्ता ३ री व ४ थीच्या अभ्यासपुस्तिका (वर्कबुक्स), बालभारती शिक्षक मार्गदर्शिका, २ री ते ४ थीपर्यंतची संस्कार वाचनमाला (प्रत्येक इयत्तेसाठी दोन पुस्तके), इयत्ता १ ली व २ रीच्या (पाठांवर व कवितांवर आधारित) ध्वनिफिती इ. उपलब्ध आहेत. शैक्षणिक संस्था, जिल्हा परिषदा, शिक्षक, पालक व विद्यार्थी यांना आवाहन करण्यात येते की, त्यांनी हे साहित्य व पाठ्येतर प्रकाशने संबंधित भांडार व उपभांडारातून खरेदी केल्यास प्रत्येक प्रतीवर २० टक्के वटाव देण्यात येईल.

मंडळाचे अधिकृत पुस्तक विक्रेते तथा अन्य शैक्षणिक संस्था यांनी किमान पाच प्रतींची खरेदी केल्यास त्यांना २० टक्केऐवजी ३० टक्के वटावाची सवलत दिली जाईल.

तरी या योजनेचा सर्व संबंधितांनी लाभ घ्यावा.

वरील पाठ्येतर प्रकाशनांखेरीज मंडळाने आदर्श शिक्षकांची आत्मचरित्रे प्रकाशित केली आहेत. यात 'माझे जीवन माझी 'बाळं'' (कै. दादासाहेब रेगे यांचे आत्मचरित्र) व 'जीवनगाथा' (श्रीमती राधाबाई शेवडे यांचे आत्मचरित्र) मंडळाने प्रकाशित केली आहेत. शिवाय 'कथा स्वातंत्र्याची' व 'वंद्य वंदेमातरम्' यांसारखी दर्जेदार पुस्तकेही सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिली आहेत.

| क्र. | पुस्तकाचे नाव | मूळ किंमत | वटाव / सवलत |
|---|---|---|---|
| १. | माझे जीवन माझी 'बाळं' | रु. २२/– | प्रत्येक प्रतीवर २५ टक्के वटाव |
| २. | जीवनगाथा | रु. २६/– | प्रत्येक प्रतीवर २५ टक्के वटाव |
| ३. | आत्मकथा गांधीजी | रु. १२/– | प्रत्येक प्रतीवर रु. २/– वटाव |
| ४. | कथा स्वातंत्र्याची | रु. २३/– | प्रत्येक प्रतीवर २५ टक्के वटाव |
| ५. | वंद्य वंदेमातरम् | रु. २४/– | प्रत्येक प्रतीवर २५ टक्के वटाव |
| ६. | 'किशोर' | — | वार्षिक वर्गणी रुपये ३०/– |

# लेखक परिचय



१) प्रा. गो. म. कुलकर्णी– मराठीचे सेवानिवृत्त प्राध्यापक (विजय कॉलेज, विजापूर) आणि समीक्षक : ३०५ गंगापुरी, वाई (जि. सातारा.)

२) प्रा. मधू जामकर– मराठीचे प्राध्यापक व समीक्षक : 'दिलासा', स्नेहनगर, परळी वैजनाथ, ४१३ ५१५

३) डॉ. हरिश्चंद्र निर्मळे– मराठीचे प्राध्यापक (फर्ग्युसन कॉलेज, पुणे) बंगला क्र. १३, फर्ग्युसन कॉलेज आवार, पुणे ४

४) प्रा. दत्ता भगत– मराठीचे प्राध्यापक, पीपल्स कॉलेज, नांदेड

५) डॉ. गंगाधर पानतावणे– मराठीचे प्राध्यापक (मराठवाडा विद्यापीठ) संपादक अस्मितादर्श, ३७ लक्ष्मी कॉलनी, औरंगाबाद ४३१ ००२

६) प्रा. रा. ग. जाधव– समीक्षक व 'मराठी विश्वकोशा' चे प्रभारी संपादक, 'विश्वकोश कार्यालय', वाई (जि. सातारा)

७) प्रा. कृष्णा किरवळे– मराठीचे प्राध्यापक, मराठी विभाग, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

८) डॉ. शांतिनाथ देसाई–सुप्रसिद्ध कन्नड कथालेखक, कादंबरीकार व समीक्षक, इंग्लिश विभाग प्रमुख, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर ४

९) डॉ. प्रभाकर पाटील–इंग्लिशचे प्रपाठक, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर ४

१०) डॉ. पंडित आवळीकर– काव्य, संमीक्षा व संशोधनविषयक ग्रंथांचे लेखक, मराठी विभाग प्रमुख, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड ५८० ००३

११) श्री. गुलाबदास ब्रोकर– गुजरातीतील ख्यातनाम साहित्यिक, कथा, कविता, एकांकिका, चरित्र, नाटक आणि समीक्षाविषयक लेखन. पंचविसांहून अधिक ग्रंथ प्रसिद्ध. अनेक भाषात त्यांच्या कथा, नाटकांचे अनुवाद प्रसिद्ध. १९७४-७५ मध्ये गुजराती साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. अमेरिका, प. जर्मनी इ. देशांच्या आमंत्रणावरून दौरा. साहित्य अकादमीच्या गुजराती सल्लागार समितीचे सदस्य. मराठीमध्ये 'जीवनयात्रा' या नावाने एक कथासंग्रह प्रसिद्ध. साहित्यविषयक अनेक पारितोषिकांचे मानकरी. ३९७ स्वामी विवेकानंद मार्ग, विलेपार्ले (पश्चिम), मुंबई ४०० ०५६

१२) प्रा. यशवंत कळमकर– इंग्लिशचे प्राध्यापक, किसन वीर महाविद्यालय, वाई (जि. सातारा)

१३) डॉ. मु. व. शहा– धुळे येथील एस्. एस्. व्ही. पी. संस्थेच्या महाविद्यालयात हिंदी विभाग प्रमुख. हिंदी व मराठीत अनेक ग्रंथांचे व स्फुट लेखन : प्रोफेसर कॉलनी, देवपूर, धुळे ४२४ ००२

१४) सौ. वीणा आलासे– बंगाली व मराठी साहित्याचा व्यासंग व लेखन : 10/2, Michael M. Dutt Marg, Kidderpore, Calcutta 700 023

१५) सौ. धनश्री हळवे – कलकत्ता व कोचीन येथे नोकरीनिमित्त वास्तव्य. बंगाली व मल्याळम् भाषांचा उत्तम अभ्यास. मराठीत कथा व समीक्षात्मक लेखन. 'अंटार्क्टिका– एक रुपेरी स्वप्न', 'अग्निसाक्षी', 'ओरोरा', 'विषकन्या' इ. पुस्तके प्रसिद्ध. 29-879 Pulickal House, Kadaranthra, Cochin 682 020

१६) प्रा. म. द. हातकणंगलेकर– इंग्लिशचे सेवानिवृत्त प्राध्यापक (विलिंग्डन महाविद्यालय, सांगली) व समीक्षक : 'निर्वेद', ३१०/११ कुणवाड रस्ता, विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५

१७) डॉ. अ. रा. तोरो– मराठी व कन्नड भाषेचे तौलनिक अभ्यासक व समीक्षक, आजरा महाविद्यालयाचे सेवानिवृत्त प्राचार्य. सुप्रिया अपार्टमेंट्स, शिवाजी पार्क, कोल्हापूर ४१६ ००१

१८) सौ. श्यामलता काकडे– कन्नड भाषेत शालेय शिक्षण. मराठी व इंग्लिश भाषांवरही प्रभुत्व. 'चोमा महार' ही कादंबरी मराठीत आणली.

